# THE BOOK WAS DRENCHED

# दुसऱ्या आवृत्तीसाठीं दोन शब्द

'खग्रास प्रभाकर' ही माझी कादंबरी मी १९२८ सालीं लिहिली. ती माझे मित्र श्री. शंकर रामचंद्र दाते यांनीं स्नेहभावानें १९२९ सालीं छापून प्रसिद्ध केली. ती श्री. य. गो. जोशी व श्री. प्र. के. अत्रे अशा अगदीं दोन भिन्न अभिरुचीच्या साहित्यिकांना त्यावेळीं आवडली असें त्याचवेळीं त्यांनीं मला सांगितलें होतें. आणखी कांहीं लोकांनीं ती कादंबरी आपणांस आवडल्याचें मला सांगितलें.

माझें ललितलेखन फारच थोडें आहे. १९३७ सालीं पृथ्वीवर एक तारा कोसळणार अशी एक बातमी आली होती त्यावरून 'तो तारा पृथ्वीवर कोसळला' या मथळ्याची 'लोकशक्ती'चे पाच-सहा कॉलम भरतील एवढी एक लघुकथा मी लिहिली होती. लोकशक्तीसाठीं अगदीं वीस ओळींच्या अशा पंधरा-वीस लघुकथा मीं लिहिल्या होत्या. पण यांपैकीं कशाचीहि एकहि प्रत मजजवळ नाहीं.

ललितलेखक होण्याची महत्त्वाकांक्षा मी कधींच बाळगली नाहीं. मी नेहमीं विशिष्ट हेतूनेंच लिहितों. लेखनाची हौस अशी मला मुळींच नसून लिहिणें हा चरितार्थाचा व लौकिकाचा व्यवसाय असल्यामुळेंच मी लिहितों. माझ्या विचाराहून वेगळी अथवा अधिक अशी भाषाशैली मजजवळ मुळींच नाहीं. मी 'खग्रास प्रभाकर' ही कादंबरी कां लिहिली याचें मला त्यावेळेपासून आतांपर्यंत कोडेंच आहे.

या कादंबरींतील माझी भाषा ही संस्कृतप्रचुर आहे, याचें कारण मी ललितवाङ्मय विद्यार्थीदशेंत खूप मेहनतीनें वाचलें तें फक्त संस्कृतच वाचलें व त्यानंतर कोणतेंच ललितवाङ्मय मी फारसें वाचलें नाहीं. प्रचलित राजकीय, आर्थिक, सामाजिक जीवनाच्या इतिहासाचा पगडा माझ्या मनावर बसतो तोच ललितवाङ्मयासारखा बसतो, यामुळें ललितवाङ्मयापेक्षांहि प्रत्यक्ष प्रचलित जीवनांतच मला अधिक रस वाटतो. या कादंबरीनंतर माझी भाषा बदलली व तिला पूर्ण मराठी वळण लागलें.

कादंबरींतील कथा पूर्ण काल्पनिक आहे हें उघडच आहे. मी कुरुंदवाड संस्थानचा असल्यानें कुरुंदवाडचीं कांहीं वर्णनें यांत आहेत, पण पहिल्या विभागांतील दुष्कृत्याच्या कथेचा कुरुंदवाडशीं कांहींहि संबंध नाहीं. दक्षिणेंतील दुसऱ्या एक संस्थानांत असा प्रकार घडल्याची कथा तिकडे गेल्या दोन पिढ्या अनेकांच्या कानीं पडत आहे. कांहींशी तशी कथा येथें कल्पिली आहे.

या कादंबरींतील प्रभाकराचा स्वभाव हा मला पूर्ण ऐतिहासिक वाटतो. *प्रभाकराच्या जीवनांत शेवटीं प्रेम व सूडाचें कर्तव्य या दोन भावनांचा जो तीव्र झगडा झाला त्याची अमूर्त कल्पना माझ्या मनास पुष्कळ दिवस त्रस्त करीत* होती. ही कादंबरी लिहून हातावेगळी केल्यावर पुन्हा माझ्या मनांत हा प्रभाकर कधींच आला नाहीं व मीं अगदीं वेगळ्या वैचारिक जीवनांत प्रवेश केला. पण अजूनहि ही कादंबरी वाचतांना प्रभाकराच्या जिवंतपणाचा मला त्यावेळेसारखाच भास होतो व मन उदास व त्रस्त झाल्यावांचून राहात नाहीं.

त्यावेळीं ही कादंबरी खपून गेली. त्यानंतर दुसरी आवृत्ति काढण्याचा विचार आज वीस वर्षांनंतर शंकरराव कुलकर्ण्यांना सुचला व त्यांनींच तो तडीस नेला याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

मुंबई, ता. १८-९-४९ **पां. वा. गाडगीळ.**



: १ :

सह्याद्रीचे पहाडांत अहिल्यापुरी नांवाचें एक एतद्देशीय संस्थान होतें. सपाट प्रदेशालगतच्या सह्याद्रीच्या पायथ्यापासून डोंगराच्या अनेक उंच उंच रांगांच्या पलीकडे दूर पहाडांत हें संस्थान असल्यानें देशावर याची कोणास फारशी माहिती नव्हती. इंग्रजांनीं पेशवाई बुडविली तेव्हां महाराष्ट्र जिंकला. पण सह्याद्रीच्या अगाध उदरांतील कोपऱ्यांत वसलेल्या या संस्थानची कित्येक दिवसपर्यंत त्यांनाही वार्ता नव्हती. सह्याद्रीच्या कुहरांतील या संस्थानवासी-यांनाही उलट बाहेरच्या जगाची खबर नसे, व त्यावांचून त्यांचें कधीं अडलेंही नव्हतें. या प्रदेशांत मानवी आयुष्यक्रमास लागणाऱ्या सर्व वस्तु थोड्या श्रमानें पैदा होत असून मिठाखेरीज कांहींही जिन्नस पहाडाबाहेरून येत नसे.

आयुष्याच्या किमान गरजा इतक्या सहज भागल्यावर येथील लोक साहजिकच अल्पसंतुष्ट, भौतिकसुखविन्मुख व तत्त्वविचारप्रवण असत. भविष्य काळाकडे एकंदरींत निराशेच्या दृष्टीनें पहात. चोहोंकडे भ्रष्टाकार होऊन यवनराज्य होणार हें भविष्यपुराण सत्यप्राय मानून या अनिवार्य संकटाची ते निराशेच्या उत्सुकतेनें मार्गप्रतीक्षा करीत.

आहल्यापुरीच्या आसपासच्या खोऱ्यांत मिळून ५०।७५ खेडीं असून या शहरासह या ग्रामसमूहाचें हें एक मोठें संस्थान होतें. राजधानीचें शहर अहिल्यापुरी येथें गोसावी नामक राजवंश राज्य करी. जनप्रवाद असा आहे कीं संसारांत वैराग्य प्राप्त होऊन गोसावी झालेल्या कोणा ब्राह्मणानें जगांतील राज्यसंस्थांत होत असलेला भ्रष्टाकार बसल्याजागीं अंतर्ज्ञानानें जाणून जग-

दोद्धार करण्याकरितां एक नमुनेदार मनुष्यसंघ स्थापन करण्याचा निश्चय केला व हें राज्य स्थापिलें. या पूज्य संस्थापकाचें स्मरण म्हणून सिंहासनस्थ राजे प्रतिदिवशीं स्नानोत्तर स्वांगास चिताभस्म चर्चीत व मरणोत्तर राजशरीरास आपली शरीररक्षा लागल्यास आपणांस मोक्ष मिळेल अशी प्रत्येक मुमूर्षू-नागरिकाची श्रद्धा असे.

शिवाजी महाराजांचें मांडलिकत्व या संस्थानानें पत्करलें होतें । मराठी राज्याकडे यांची खंडणीही बिनतक्रार येत असे. मराठी राज्याच्या कलियुगांत वसूल कोणास द्यावयाचा याचाच भ्रम पडावा इतकी तेथें मालकांची गर्दी झाल्यामुळें तेव्हां कांहीं काळ अहिल्यापुरीहून वसूल जाणें बंद झालें होतें; पुढें इंग्रजांच्या दृष्टिपथांत हा देश आला तेव्हां हिंदी लोकांस पूर्ण पारखलेल्या इंग्रजांनीं " आपणच 'यवन' असून ईश्वरी संदेशाप्रमाणें येथें राज्य करण्यास आलों आहों, आम्हांस फक्त कारभार देऊन अंमल कबूल करा, आम्ही धर्म बुडविणार नाहीं. " असें आश्वासनपूर्वक सांगितल्यावर पूज्य पूर्वजांचें अतर्क्य भविष्य अचानक खरें ठरूं लागलेलें पाहून येथील लोक आश्चर्यानें थक्क होऊन गेले व साहजिकच ही गोष्ट मान्य करून सृष्टीच्या अनिवार क्रमास नम्र होण्याचें येथील संस्थानिकांनीं ठरविलें.

लोकांच्या परंपरागत श्रद्धेप्रमाणें अहिल्यापुरी हें या स्थलाचें अगदीं रामायणकालीन अभिधान. विश्वामित्रासमवेत प्रभु रामचंद्र जानकीपरिणयार्थ मिथिलेस जात असतां त्यांच्या पायास एक शिळा लागून अहिल्या झाली ती या ठिकाणीं. या प्रसंगानें येथें एक तीर्थ उत्पन्न झालें. लोकांना या तीर्थाची द्वापर युगाचे शेवटपर्यंत मुळींच माहिती नव्हती. पण वर सांगितलेल्या गोसावी बुवांना प्रभूंनीं स्वप्नः दृष्टांत देऊन हें फार दिवसांचें नवलवृत्त कथन केलें. व बुवाजींनीं देखील आनंदून आदर्श मानवसंघास हीच पुण्यभूमि निवडली. मिथिला कुठें, विश्वामित्राचा आश्रम कुठें व सह्याद्रि या दोहोंच्या वाटेवर कोठें कसा आला, असली पाखंडी शंका बुवाजींना कधींही आली नाहीं. प्रभूचा साक्षात्कारच तो. त्याची शंका कसली घ्यायची !

गोसावी बुवांनीं आदर्शसंघाला निवडलेली ही पुण्यस्थली सृष्टीसौंदर्यानें खूपच समृद्ध होती. शहराचे भोंवतालचे प्रदेशांत लहान मोठ्या उंच टेक-

ज्यांच्या पुष्कळ रांगा असून, पाऊस भरपूर पडत असल्यामुळें सर्व डोंगर पायथ्यापासून माथ्यापर्यंत हिरव्या गार गवतानें पावसाळाभर गच्च भरलेले असत. पावसाळ्याअखेर गवत पूर्ण वाढलें म्हणजे त्यावर येणाऱ्या लोंब्यांची तकाकी केवळ मनोहर ! डोंगरांच्या लांबच लांब उतरणीवर पसरलेल्या तृण-राजींचीं तीं चकचकीत मस्तकें वाऱ्याच्या झोताबरोबर सूर्यप्रकाशांत मैल मैल लांबपर्यंत एकसारखीं झोकें घेऊं लागलीं म्हणजे रात्रीं रजनीकरापुढें आकाशांत नृत्य करतांना शालीनतेमुळें लाजलेला तारागण दिवसास भूमातेकडे येऊन स्वैर नृत्य करीत आहे कीं काय असें वाटे. डोंगराच्या लहान मोठ्या मस्तकावरून वर्षाकालीं वाहणारे शुभ्र जलनिर्झर पर्वतास सर्वत्र जणूं रुप्याचे पाझर फुटले आहेत असा भास उत्पन्न करीत. बालनिर्झरांच्या या रम्य लीला त्यांच्या पित्याला—सागराला कळल्या तर त्यालासुद्धां आपलें गांभीर्य सोडून क्षणभर या बालकाबरोबर क्रीडा करावी असें वाटलें असतें. पण सागरपत्नी मेघमाला मुलांच्या लहानपणीं आपण एकटीच त्यांच्याशीं खेळे व मुलें मोठीं होत तसतशीं तीं पित्याकडे जात. वात्सल्याच्या आनंदांत पतीचा सुद्धा मत्सर वाटावा ना ! मनोविकार दुर्निवार खरेच ! शेकडों गाईम्हशींचीं खिल्लारें व त्यांचे मागून धावणारे गोप, गोपी व गोपबालक यांच्या हालचालीनें सगळा घाटमाथा जिवंत झालेला दिसे. निष्पाप गोपगोपींच्या मुरल्यांचे मधुरालाप ऐकून मत्सरानें विहंगम आपणही सदृशालाप काढूं पहात. आणि यामुळें मधुरतर स्वर उत्पन्न होई व एकसारखा तासन्‌तास तो सर्व वनप्रदेश मधुर गायन-निनादानें दुमदुमून गेलेला असे. सर्व ऋतूंत त्या त्या ऋतूस योग्य अशा फलांच्या भारांनीं वृक्ष नम्र झालेले असत. पुष्पवेली ऋतूंच्या स्वागतार्थ पुष्पांचा नुसता सडा करून सोडीत. कोणत्या एखाद्या ऋतूंत वनशोभा खुललेली नाहीं असें नसेच. प्रत्येक ऋतूची शोभा निरनिराळी व एकीहून एक सरस; दरेक ऋतूनें आपलें ऐश्वर्य घेऊन यावें व जातांना पुढच्याकरितां थोडें ठेवूनच जावें आणि नव्यानें जुन्यांत नव्याची भर घालून सौंदर्याची लयलूट करावी असा क्रम वर्षानुवर्ष चाले.

या सौंदर्ययुक्त वनप्रदेशाच्या मध्यभागांतून लहानशी अहिल्या नदी वहात असून तिच्या दक्षिण तीरावर आपली अहिल्यापुरी वसली होती. गांवाच्या

बाजूनें अहिल्येच्या दक्षिण तीरावर एक फार मोठा घाट बांधला असून त्याच्या लांब लांब पायऱ्या, विस्तृत पटांगणें व घाटदार बुरूज यांनीं नदीतीरास फार शोभा आली होती.

शहराच्या जुन्या रचनेचा अंदाज लागण्यास कांहीं साधन उरलेलें नव्हतें. ब्रिटिश अमलानंतर सर्व नवी रचना अमलांत आली होती. नदीतीराची चढण चढून वर जातांच रस्त्याच्या दुतर्फा अंतरा अंतरावर बंगले व त्या भोवतालच्या बागा दिसत. गांव नदीपासून अर्धा मैल दूर होता. नदीपासून गांवापर्यंत चांगली रुंद पक्की सडक होती. दोहो बाजूचे बंगले व प्लेगच्या लहान लहान मोठ्या झोंपड्या संपल्यानंतर एका बाजूस सरकारी तुरुंगाची भव्य व मजबूत इमारत दिसे व त्याचे समोरच रस्त्याचे दोहो बाजूस शोभिवंत बांधणीचें हायस्कूल दृष्टीस पडे. हायस्कूल व तुरुंग यापुढें प्राचीनत्वाच्या ठेवलेल्या अवशेषाची खूण अशी फार मोठी व मजबूत वेस लागे. वेशीपासून आंत गांवास सुरवात होई. पहिल्यानें निरनिराळ्या देवदेवतांची नवीं जुनीं मंदिरें लागत. एकंदर ग्रामरचना चांगल्यापैकींच होती. कोणत्याही जनपदाची मुख्य शोभा म्हणजे बाजारपेठ. ही शोभिवंत व संपन्न दिसे. एकंदर वस्ती सुमारें वीस हजार असावी गरीब व श्रीमंत स्त्रीपुरुष सुखी, सुदृढ, रूपसंपन्न, नीटनेटके व आदरशील दिसत. रस्त्यावरून जातां येतांना कुरूप, अमंगळ भिकारडा असा मनुष्य सहसा दृष्टीस न पडे. आगगाडीपासून दूर असल्यामुळें या भागांत अजून उद्योगशाही प्रवेशली नव्हती. यामुळें सांपत्तिक विषमता फारशी आढळत नसे. निरनिराळ्या धंद्याव्यवसायाप्रमाणें वस्ती विभागलेली असून बकालीपणा कोठेंही नव्हता.

गांवाच्या मध्यभागीं प्राचीन भव्य राजप्रासाद होता. त्यांत पांच प्रशस्त चौक, त्याचे वीस सोपे, तसेच १५।२० दिवाणखाने, इतर निरनिराळीं १५।२० दालनें असून सर्व वाड्याखालीं मोठमोठीं तळघरें होतीं. या तळघरांतही चोरवाटांनीं हवा व उजेड घेतला होता. तळघरांत प्रवेश अर्थात चोरदारांनींच असे.

येथील सिंहासनस्थ राजास ‘ अधिराज ’ म्हणत. वरील राजप्रासाद राजघराण्याचें परंपरागत निवासस्थान होता. या राजवंशांत फारसे शूर व कर्तृत्व-

संपन्न राजे झाले नाहींत, तरी पण ते धर्मशील व प्रजाहितदक्ष असे असल्याचा त्यांचा लौकिक होता. इंग्रजपूर्वकाळीं एकादा राजा स्वधर्मास सोडून वागे अथवा प्रजाहिताकडे दुर्लक्ष करी अशा वेळी प्रजा धाकानें त्यास ताळ्यावर आणी, असें कधीं कधीं घडलें होतें. यामुळें राजे कर्तव्यतत्पर राहात व प्रजा स्वहक्कास खबरदार राही. त्याबरोबरच राज्ययंत्र लोकधारणास अवश्य म्हणून धर्म्य मानून प्रजा कर्तव्यबुद्धीनें राजनिष्ठही असे.

पण इंग्रजी अमलांत राजा व प्रजा यांचें हें अन्योन्याकर्षण नष्ट झालें. ब्रिटिश सत्तेच्या पाचरीनें राजा व प्रजा यांमधील परस्परावलंबनाचे दुवे खळाखळ निखळून गेले. सुराज्याची जबाबदारी नाहींशी होऊन राजे उन्मत्त झाले. प्रजेचा छळ सुरू झाला. सज्जनांचा उपमर्द होऊन नीच खुशामत्यांचें राजदरबारीं प्रस्थ माजलें. राजांची राज्यनीति बिघडून अंमल दुःसह झाल्यास प्रजेचा अंतक्षोभ भडकून, अथवा परकीय राजांच्या स्वारीनें राज्यक्रांति होऊन राजकीय दुर्दिन मावळण्याचा संभव असतो. पण अंतःशत्रु व बहिःशत्रूपासून राज्याचें व राजांचें संरक्षण करण्याचा मक्ता इंग्रजांनीं घेतल्यामुळें उन्मत्त व बेजबाबदार राजांच्या अन्यायापुढें प्रजा हताश झाली. प्रजेस सर्वच बाजूंनीं कोणी त्राता म्हणून राहिला नाहीं.

प्रस्तुत कथाकाळीं वसुदेव नामक ' अधिराज ' येथें राज्य करीत होता. तो व्यसनी, नीतिभ्रष्ट व सदा विलासांत आणि शिकारींत दंग असे. त्यास दोन सुस्वरूप स्त्रिया असून त्या अत्यंत पतिव्रता होत्या. तरी पण अनीतीच्या व्यसनामुळें वसुदेवानें विलासाकरितां वारांगनांचा एक ताफाचा ताफा सांभाळला होता.

अशा राजाच्या हातचा राज्यकारभार सहज अनुमानितां येईल असाच होता. पुण्यास तयार कपडे मिळतात त्याप्रमाणें इंग्रजी राज्यांतील तयार कायदे संस्थानांत चालत—म्हणजे त्यास फक्त शाब्दिक मान्यता दिलेली असे. स्वतां राजेसाहेब कधीं कधीं न्यायासनावर बसत असत. इंग्रजांच्या वर्चस्वामुळें नाइलाज म्हणून आपणांस इंग्रजी कायदे घ्यावे लागतात असें ते म्हणत. त्यांच्या मतें ' कायदा म्हणजे जर सदसद्विवेकबुद्धी ' तर त्याला एवढा ग्रंथांचा परिवार कशास हवा ? दरबारची एखाद्यावर गैरमर्जी झाली कीं त्या मनुष्याचें

नांव पोलीस खात्यांत दाखल होई. आणि योगायोग असा घडे कीं, अशा मनुष्याकडून कांहीं गुन्हा घडलेला पोलीसास सापडायचाच. अपराधाच्या कमी-अधिकपणाचे धोरणानेंच शिक्षा होई. पण मौज अशी कीं, दरबारच्या गैर-मर्जीच्या कमीअधिकपणाप्रमाणेंच मूळ अपराधाचें स्वरूप कमी अधिक ठरत असे. गैरमर्जीच्या कोणत्या अंशावर कोणता गुन्हा बसतो याचा एकादा अधिकृत आलेखच गुप्त पोलीस खात्याच्या दप्तरांत असेल. खटल्याआधींच कैद्यास तुरुंगाचा पुष्कळ सराव मिळे. खटला सुरू झाला कीं निकाल झटपट होई. न्याय खरा, यापेक्षां आटोपशीर असेल तो मानला जाई. सत्याचाहि पक्षपात नसे. म्हणजे कोणताही पक्ष सत्यपक्ष आहे एवढ्यावरच भागत नसून अवांतर पुष्कळ गोष्टी विचारांत घेतल्या जात. एकदां एका फिर्यादीच्या घरचा गुप्त ठेवा त्यास न्यायाचें पारडें जड करण्यास उपयोगी पडला. व दुसऱ्या एका वेळीं एका वारयोषितेचें सौंदर्य वकीलाच्या सर्व पांडित्यापेक्षांही वजनदार ठरलें होतें. मुल्की खात्याचें काम मुळींच दगदगीचें नव्हतें. हिशेबाच्या बिनचुकीचा अत्याग्रह नसे. वक्तशीरपणाचा काटेरी लगाम वड्या अधिकाऱ्यांनीं स्वतःला कधीं लावून घेतला नाहीं हें सहजच; पण तो त्यांनीं हाताखालच्या नोकरांसही कधीं लावला नाहीं. पगार नियमित नाहीं तरी मधून मधून होत असत. सरकारी रकमा अधिकारी खाजगी रीतीनें वापरीत. प्रजेचा वसूल आधीं राजेसाहेबांच्या खाजगीकडे जाई आणि लोकही अधिकाऱ्यांचा खाजगी रीतीनें उपयोग करीत. अधिकारी, सरकार व प्रजा यांचा असा हा ‘ खाजगी ’ एकोप्याचा जिव्हाळा होता !

अधिराज वसुदेव यास एक पुत्र होता, याचें नांव बलदेव. हाच युवराज व गादीचा एकुलता एक वारस असल्यानें राजघराण्याचा सर्व आधारस्तंभ होता. राज्याचा जसा हा वारस तसा बापाच्या अंगच्या अवगुणांचाही वारसा त्यानें मिळविला होता. शिवाय बापाहून अधिक अवगुणांचीं यानें स्वतंत्रपणें पैदासही केली होती. युवराज नुकतेच विशीच्या उंबरठ्यावर चढले होते. शरीरानें ते चांगले स्थूल व ऐसपैस होते. व्यासंगेतर धनसाध्य साधनांनीं बी. ए. पदवी मिळेइतके दिवस त्यांच्या नांवानें शाळाकॉलेजाच्या हजेरीपटावर काढले होते. या शिक्षणाच्या सर्व काळांत पुण्यांत त्यांचें कायमचें बिऱ्हाड

होतें. युवराजही मधून मधून पुण्यास राहात व पुण्यास असतां केव्हां विद्यालयासही भेट देत. पुस्तकी विद्येपेक्षां इतर निरीक्षणांनीं मिळविलेली अक्कल प्रत्यक्षोपयोगी असते असें त्यांचें मत होतें. पुरुष वर्गापेक्षां स्त्री वर्ग त्यांच्या आदराचा व अवलोकनाचा अधिकतर विषय होता. पुण्यास लष्करांत युरोपियन स्त्रियांचा नाचरंग पहाण्यास ते वरचेवर जात. आपल्याकडे या रूढी नाहींत ही त्यांस फार मोठी उणीव वाटे. व स्वतां उदाहरण घालून देण्याकरितां नाचणाऱ्या कांहीं तरण्या पोरीही बलदेवानें पुण्यास ठेवण्याचा उपक्रम केला. अधिराजांस स्वतांचें आचरण दोषास्पद आहे हें कळे तरी. पण स्वतांस असंमत असलेल्या मोहास बळी पडण्याइतका दुबळेपणा मुळांत नव्हता. नीतिमत्तेच्या युवराजी कल्पनाच अधिराजाहून भिन्न होत्या. सुधारक पक्ष इंग्रजानुकूल असल्यानें स्वतांस सुधारक म्हणवून घेण्यांत त्यांना निर्धास्त व उच्च पदवीचें वाटे. वैयक्तिक नीतिमत्तेच्या कल्पना आजच्या सुलभ दळणवळणाच्या कालांत आमूलाग्र बदलल्या पाहिजेत असा सुधारकमताचा मार्मिक विपर्यास ते करीत.

स्वतां बलदेवांची बुद्धि कुशाच्या अग्रासारखी अणीदार नव्हती. यज्ञेश्वर दीक्षित नामक एक विद्वान्ब्रुव, बुद्धिमान्, तेजस्वी, धाडशी तरुण पुण्यास बलदेवाकरितां खाजगी शिक्षक म्हणून नेमिला होता संपत्तिमदोन्मत्त व सहजलब्धप्रतिष्ठ नरपशूंना कुटिल बुद्धीचें साहाय्य देऊन आपलें ऐहिक कल्याण साधणारे कर्तृत्ववान् पाजी सर्व जगांत सर्व काळीं आढळले आहेत. ' नृपांगणागतः खल ' अशी सुसंस्कृत पदवी भर्तृहरीनें ज्यांना दिली ते याच वर्गांतील लोक. अशापैकीं हा यज्ञेश्वर होता. इतर सोबत्यांपैकीं हसन नामक एक हलकट मुसलमान मित्र बलदेवास कॉलेजांत मिळाला होता. पहिल्याच मुलाखतींत उभयतांचें प्रेम जमलें व पुढें हसन बलदेवाकडेच राहूं लागला. सख्या नामक एक उलाढाली हुजऱ्या बलदेवाच्या लहानपणापासून त्याच्या दिमतीस असे. तसेंच बजी नांवाची वयस्क नायकीण सख्याच्या मदतीस होती. पुण्यास असतां बलदेवाचें हेंच मित्रमंडळ असे.

पुण्यास नाचणारणींचे नाच चाललेले अधिराजांचे कानीं जातांच झालेला अभ्यास पुरे असें समजून अधिराजांनीं युवराजास तावडतोब अहिल्यापुरीस

परत बोलावून घेतलें. व युवराज पुढें परस्परच मुंबईस परीक्षेस जाऊन बी. ए. झाले. पुण्याचे मित्रमंडळ अहिल्यापुरीस येऊन कायम झालें. बी ए. झाल्यानें बलदेवास कृतार्थता वाटली. त्यास आपल्या लायकीचा विश्वास उत्पन्न झाला. आतां तो राज्यकारभारांतही डोकें घालूं लागला. पण याच्या बुद्धिलीलेनें राज्यकारभार अधिक बिघडण्याचा बाकी राहिलाच नव्हता. हसनच्या संगतीनें बलदेव कांहीं नियमित 'पान'ही करी. वयोमानानें आतां तो 'ख्याल' करण्याकरितां बाहेरही जाऊं लागला. वडिलांजवळ जातिवंत वारांगनाच असत. पण याची अभिरुचि अधिक उन्नत असून कुलस्त्रियांवरही हा दुष्ट नजर टाकी. अधिराज वसुदेवास पुत्राचे हे सर्व गुण दिसत होते. पण स्वतां दुर्व्यसनवश झालेल्या अधिराजांस आपण उपदेशकार्यीं अनधिकारी आहों असें वाटे. तो विद्वानाकडून व सज्जनाकडून बलदेवास वरचेवर उपदेशामृत पाजी. पण कुटाळांच्या कवटाळांत रात्रंदिवस लोळणाऱ्या बलदेवावर सर्व उपदेशाचा विपरीतच परिणाम होत असे.

## : २ :

पहाडांतील या प्रदेशांत ग्रीष्मातपाचा ताप अगदीं कमी असे. वर्षाकाला-चा लवाजमा नुकताच नभोमंडळांत येऊन पडूं लागला होता. वासंतिक वनश्री अजून लोपली नव्हती. वसंत व वर्षा यांचा हा संगम, सौगंधिक तैलांनीं अंग मर्दून अभ्यंगस्नानास सिद्ध झालेल्या सुंदरीप्रमाणें मनोरम वाटे. आज वटपौर्णिमा होती. अहिल्यापुरींतील वेशीजवळच्या विशाल वटवृक्षाभों-वतीं सुवासिनींचा फार मोठा समुदाय मोठा गर्दींत असलेला दिसत होता. अगदीं सकाळपासून अत्याधिक मूल्यवान् वस्त्रालंकारांनीं भूषित असा वृद्ध व तरुण सुवासिनींचा संभार पूजासाहित्य घेऊन वटवृक्षाकडे एकसारखा ये-जा करतांना दृष्टीस पडे. कांहीं सुवासिनी वटवृक्षास गंधपुष्प वाहून पूजा करीत होत्या. कांहीं सुताचीं मोठमोठीं गुंडाळीं उकलून तीं परत वृक्षाभोंवतीं फिरून त्यास गुंडाळीत होत्या. कांहीं धूपदीप अथवा नैवद्य दाखवीत होत्या. कांहीं पूजेस गर्दी असल्यामुळें जागा नाहीं म्हणून समयप्रतीक्षा करीत उभ्या होत्या. तर दुसऱ्या कांहीं पूजा आटोपून घरीं परतण्याच्या तयारीस लागल्या होत्या. पांच सात उपाध्याय पूजामंत्र मोठमोठ्यानें व सुस्वर म्हणत होते, वटवृक्षाच्या पाराच्या फरशीवर सुवासिनींच्या नूपुरांचा मंजुळ ध्वनि होत होता, त्यांत स्त्रियांच्या मधुर संभाषणाची भर पडली. आपल्या स्वतंत्र वृक्षसाम्राज्यांत आज मानवांची ही अनपेक्षित गर्दी पाहून वृक्षस्थ विहंगमांनीं भीतीनें चिव-चिवाट करून सोडला होता. या सर्वांपासून उत्पन्न होणारा निर्वर्ण गुंजारव कर्णमधुर वाटे. घराबाहेर परिचितांची थोडाच वेळ पण मोकळेपणीं गांठ

पडल्यामुळें परस्परांचें कुशल विचारतांना तरुणींच्या मुखावर जें स्मित झळकें त्यामुळें दिवसास पांढऱ्या शुभ्र ढगांत वीज चमकल्याचा भास होई. घरच्या वडील माणसांचा धाक व घरीं ठेवलेल्या आवडत्या अर्भकांची ओढ यामुळें सर्व सुवासिनी लवकर परतण्याकरितां मोठ्या उत्सुक दिसत. पावित्र्य हें जात्याच रमणीय. शिवाय औत्सुक्यानें कोणतीही व्यक्ति किंवा कोणताही समारंभ रमणीयतर होत असतो. त्यांत येथें तर मानवकुलभूषण अशा स्त्रियांचा, त्यांतही सुवासिनींचा समुदाय. यामुळें हा सर्व देखावा अत्यंत मनोहर दिसत होता.

वटपूजेंत गुंग झालेल्या सुवासिनी-गणांत अगदीं लहान व उपवर कुमारिकाही मधें मधें करतांना दिसत उपवर कुमारिकांना विवाहितांचा हेवा वाटे, पण पूजनकार्यांत प्रमुख पद मिळणारें नसल्यानें सुवासिनींच्या हाताखालीं उमेदवारी करण्याखेरीज त्यांना गत्यंतर नव्हतें. लहान मुली पारावर नाचत बागडत वटवृक्षाच्या लोंबत्या पारंब्यांशीं लोंबकळून झोके घेत. अगदीं लहान मुलींच्या लीला जितक्या स्वैर असत तितक्या उपवर मुलींच्या नव्हत्या. स्त्रीशिक्षणांत पुण्याहून मागें असलेल्या भागांत उपवर मुलींची सचिंतता व गांभीर्य केव्हां केव्हां नवपरिणितांहून अधिक असल्याचें आढळतें. अशीच एक उपवर बाला कोणा सुवासिनीबरोबर कांहीं पूजासाहित्य घेऊन वटवृक्षाशीं आली. सुवासिनीनें तें साहित्य घेतलें व ती पूजेस लागली. मग ही बालिका पारावरील एका शिलातलावर एक पाय टेकून पदर चाळवीत उभी राहिली. ती पूजा समारंभाकडे पाही. केव्हां रस्त्याकडे पाही. केव्हां एखाद्या ओळखीच्या स्त्रीशीं बोले. मध्येंच इकडे तिकडे फिरूं लागे. तोंच बरोबरच्या सुवासिनीनें हटकल्यामुळें तिकडे जाऊन तिला कांहीं मदत करी. व मग केव्हां वृक्षाच्या पारंब्याशीं, ती पारंबी आपणांस मिळावी म्हणून आपसांत झोंबणाऱ्या मुलींमध्यें पडून पोक्तपणें त्यांचा तंटा तोडी, व पुन्हां पूर्वीच्या शिलातलाकडे परते. तिच्या एकंदर हालचालीवरून ती बाला विनोदी असून गंभीर व पोरवयांतही पोक्त, नम्र व तत्पर अशी दिसली. रूपानें ती असामान्य होती. तिचें वय १४ १५ वर्षांचें असेल तिचा वर्ण चांगला केतकीसारखा गौर होता. अगदीं सकाळीं न्हाऊन अर्धवट वाळलेले आपले विपुल काळेभोर केश तिनें वाळण्या-

करितां मानेवर साधारण सैलच बांधले होते. तिनें भांग किंचित वांकडा काढला असून, केशबंधावर ठेवलेलें एकच मोठें व टवटवीत गुलाबपुष्प उलट बाजूच्या मुखकमलापाशीं स्पर्धा करीत होतें. तिचा भालप्रदेश शुभ्र व विशाल असून त्यामुळें त्यावरील कुंकुमतिलकाला विशेषच शोभा आली होती. तिचे डोळे पाणीदार होते. दृष्टि शांत व निश्चल होती. तिची सरळ नासिका, पोवळ्यासारखे लाल ओठ, त्यांतून मध्येंच झळकणारी शुभ्र दन्तावली व गोल हनुवटी हा नैसर्गिक सौंदर्यसाज कोणत्याही शृंगारसाजापेक्षां मनोहर होता. ती गुलाबी पातळ नेसली असून त्यांतून तिच्या हिरव्या चोळीचा रंग प्रच्छन्न खुलावट देत होता. पदराखालून बाहेर आलेले तिचे हात कोटरांतून प्रथमच बाहेर येणाऱ्या शुकशावकाप्रमाणें नाजूक दिसत. तिनें अंगावर थोडेसेच अलंकार घातले होते. पण तिचे स्वतांचें सौंदर्यच इतकें पुष्कळ होतें कीं अलंकारच उलट तिच्या सुंदर शरीराच्या कोंदणांत शोभायमान दिसत. आणि याचकांचा संतोष केल्यामुळें जसा उदार धनिक समाधानानें शोभूं लागतो त्या प्रकारची सात्त्विक प्रभा अलंकारामुळें तिच्या मुखकमलावर विराजत होती.

या वेळीं शेजारील रस्त्यावरून दोन तरुण नदीस स्नानास जात असलेले तिनें पाहिलें. यापैकीं एक काळा सावळा, सडपातळ, देखणा साधारणच, पण बुद्धिवान दिसे. हा सुमारें पंचवीस वर्षांचा असेल. दुसरा याहून लहान म्हणजे २०।२१ वर्षांचा दिसला. हाही बुद्धिवान शिवाय अतिशय रूपसंपन्न दिसत होता. याचें शरीर चांगलें पुष्ट व कसलेलें होतें. पहिल्याचा मूळचा काळसर वर्ण तापसी स्वभावामुळें व कष्टाळूपणानें अधिकच काळवंडलेला दिसला. उलट दुसऱ्याच्या गौर वर्णावर सुखसंपन्नतेनें अधिकच तेज आलें होतें. पहिल्याची दृष्टि शांत, प्रसन्न, निश्चयी, मार्मिक व धीट होती. दुसऱ्याची दृष्टि प्रसन्न पण स्थूल व तरल तरीही विनयशील–अथवा लाजरी असावी. दोघांच्या अंगांत एकेक साधा सदरा, डाव्या काखेंत टॉवेलांत गुंडाळलेलें स्वच्छ धोतर व उजव्या हातांत जाड वेत असा स्नानास जाण्याच्या पद्धतीचा अगदीं साधा वेष त्यांनीं केला होता.

पारावरील बालिकेनें ज्या वेळीं या दोघांकडे पाहिलें, त्याच वेळीं हे दोघेही पारावरील समारंभाकडे पहात असतां ही बालिका त्यांचे दृष्टीस पडली. रूपवंत

तरुणानें तिजकडे पहातां तीही आपणाकडे पहात आहे असें पाहून झटकन् तोंड फिरवून तो समोर वेशीकडे पहात चालूं लागला. पहिला मात्र दुसऱ्या बरोबर चालत असतां मागे वळून त्या बालिकेकडे व एकंदर पूजासमारंभाकडे स्वस्थपणें निरखून पहात होता. चालतां चालतां ते दोघेही वेशीबाहेर आले. वटवृक्षाचा तो देखावा आतां अदृश्य झाला, तेव्हां यानें आपली दृष्टि पुढें वळविली व आपल्या सोबत्याचे खांद्यावर हात टाकून त्यास हालवीत तो म्हणाला—

"गंगाधर, तुला प्रफुल्ल पुष्पें पहायला आवडत नाहींत ?"

"हो हो, जरूर आवडतात, वृंदावन" गंगाधरानें खालीं पाहून स्मितपूर्वक उत्तर दिलें.

"मग एवढी शिसारी आल्याप्रमाणं एकदम दृष्टि कां फिरवलीस ?" वृंदावनांनीं विचारलें.

"म्हणजे ? मी नाहीं समजलों ?" गंगाधरानें वेड पांघरलें.

"ओहो ? हा विषय बोलायला सुद्धां तुला अप्रिय वाटतो का ? वाः संत आहेस अगदीं ? तर मग राहूं देच. बरं, काय रे, नदीला पोहण्याइतकं पुष्कळ पाणी असतं का ?" वृंदावनांनीं विषय पालटला.

पण गंगाधराला वृंदावनांनीं उत्पन्न केलेल्या रम्य विचारोदधींत अवगाहन करण्याचें सोडून अजून अर्धा मैल दूर असलेल्या नदींत पोहण्याची आतांच घाई झाली नव्हती. आवडता विषय आपल्या भिडस्तपणामुळें बदलतो असें पाहून गंगाधर मनांत ओशाळला व फिरून तोच विषय काढण्याकरितां म्हणाला. "अप्रिय नव्हे हो–पण" तो पुन्हा अडखळला व आपल्याशींच हंसला.

"पण—काय ? तर मग त्या मुलीला पाहून एवढा बिचकलास का ? पोर मोठी सुंदर, बुद्धिवान् आणि अभिजात दिसते !"

"हो, ती आहेच तशी. ही येथील प्रसिद्ध विद्वान् रामशास्त्री पंडित यांची मुलगी देवकी. अलीकडे तीन चार वर्षांत मी तिला आजच पाहिली. पण वृंदावन, तिनं वांकडा भांग काढायला नको होता. शास्त्र्याच्या मुलीला हे सुधारकी चाळे कशास हवेत ?" प्रिय वाटलेली वस्तु अप्रिय वाटल्याचा आव आणून गंगाधर म्हणाला.

"वा वाः ! गृहस्थाच्या मुलींनीं मात्र हवीं तीं सोंगं करावीं वाटतं, आणि

वाकड्या भांगांत असं काय गैर दिसलं तुला ?"

" पण तरुणींना आपल्या सौंदर्याचं प्रदर्शन करायची या सुधारकी जगांत जी खोड लागत चालली आहे ती एकंदरींत बरी नव्हे."

" म्हणजे कसं ?" तात्त्विक चर्चेइतकें वृंदावनास कांहींच प्रिय नसे. चर्चेस सुव्यवस्थित सुरुवात करण्याकरितां वृंदावनांनीं विचारलें.

"मी म्हणतों कीं वांकडा भांग काढून वेणींत फुलें खोवून किंवा बारीक कुंकू लावून आणि चोळयाऐवजीं पोलकीं घालून बायकांनीं कृत्रिमतेनें सुंदर दिसण्याचा प्रयत्न करूं नये." गंगाधरानें खुलासा केला.

" पण मग अंगाखांद्यावर सोन्यामोत्याचे खूप दागिने घालून भरजरी उंची वस्त्रें नेसलेली एखादी गौर पाहून तूं अशीच टीका करशील का ?" वृंदावनांनीं खोचून विचारलें.

**गं.**—ते सुद्धा अति होईल तर वाईटच. पण निदान ते आपल्याकडे पहिल्यापासून चालत आलं आहे.

**वृं.**—तरी तेंही कृत्रिम सौंदर्य एवढं खरं ना ?

**गं.**—पण त्यानं आपली चालरीत बिघडून पाश्चिमात्य वळणावर गेली असं तरी होत नाहीं.

**वृं.**—अभिरुचि पाश्चिमात्य झाली म्हणजे अगदीं बिघडली का ? पौर्वात्य तेवढं सगळं चांगलं आणि पाश्चिमात्य तेवढं सगळं वाईट असंच तुझं म्हणणं तर ?

**गं.**—नाहीं, पण त्यांचं जेवढं चांगलं असेल तेवढं जरूर घ्यावं तरी बाकीच्या गोष्टींत आपलं सोडून निवळ अनुकरण करणं म्हणजे गुलामगिरी होय.

**वृं.**—अरे बाः ! म्हणजे एवढ्यानं आपलीं मतं दुसऱ्यांना विकलीं असं झालं का अगदीं ? दुसऱ्यांचं कांहीं आवडूंच नव्हे म्हणतोस ?

**गं**—कोण म्हणतो ? चांगलं तेवढं जरूर घ्यावं असं मी आतांच म्हटलं. परिणामीं फायदेशीर असणारी अप्रिय गोष्टही स्वीकारावी.

**वृं.**—पण व्यवहाराच्या अगदीं क्षुल्लक गोष्टींत सुद्धां एवढी गंभीर निवडानिवड कशाला ? माणसानं सामान्य अभिरुचीनं वागलं म्हणून कुठं बिघडलं ?

**गं.**—सकृद्दर्शनीं क्षुल्लक वाटणाऱ्या गोष्टीच पुढं भयंकर स्वरूप धारण करतात असा अनुभव आहे. हिंदुस्थान यानंच बुडाला !

वृं.—भले शाबास! कांहीं क्षुल्लक गोष्टींचा भयानक शेवट होतो म्हणून प्रत्येक क्षुल्लक गोष्ट भयपरिणामी असतें कीं काय? दोन भिन्न माणसं, राष्ट्र किंवा संस्कृति एकत्र आल्या असतां परस्परांचे परिणाम परस्परावर घडणारच. यांत परिणामीं घातक असणाऱ्या गोष्टी जशा टाळाव्याच, तशा क्षुल्लक पण अनिवार असतील अशाशींही झगडून काल, बुद्धि व शारीरिक, मानसिक शक्ति यांचा व्यर्थ व्यय करावा हें शुद्ध वेडेपण होय. व्यक्तीवर अशानं निष्कारण जुलूम मात्र होईल.

गं.—पण मग साहेब लोक आमचा हिंदी पोषाक घेत नाहींत तो?

वृं.—साहेबांच्या अंगांत सर्व चसद्गुण असतात, असं आतां तुझंच म्हणणं दिसतं. अरे, एकशें बारा पंधरा अंशापर्यंत उन्हाचा ताप होत असतां अंगाभोंवतीं जाडी जाडी कपडे गुंडाळून रताळयाप्रमाणें उकडत बसणं म्हणजे शुद्ध मूर्खपणा होय. इंग्रजांचा असला बालिश हटवाद जगप्रसिद्ध आहे. शिवाय आपल्या इंग्रजी पद्धतीच्या पोशाखानं हिंदी प्रजेंत आपला दबदबा ठेवण्याचीही शिकवण त्यांना विलायतेंत मिळते म्हणतात. जणूं कांहीं साहेब धोतर नेसल्यानं इंग्रजांचं राज्य हिंदुस्थानांतून नाहींसच होईल अगदीं.

बोलतां बोलतां ते नदीच्या घाटावर येऊन पोंचले. त्यामुळें संवाद तेथेंच थांबला. प्रातःकाळचा घाटावरील देखावा फारच रम्य असे. अहिल्या गंगेच्या त्या शुभ्र संथ व निर्मल प्रवाहाचे तीरीं आचारशील द्विजगण स्नान करून व भालीं भस्म चर्चून ध्यानमग्न झालेला दिसे. लहान मुलें पायऱ्यावरून व बुरुजावरून साध्या उड्या, सुरकांड्या, उलट्या उड्या मारून आपल्या जलक्रीडेनें शेजारील शमप्रधान तपोधनांचा ध्यानभंग करूं पहात. त्यांतून एकादा तापट ब्राह्मण क्रुद्ध होऊन त्यास वाक्ताडन करूं लागला असतां मुलांना अधिकच स्फुरण येई.

अल्लड तरुणी प्रवाहांत उतरून स्नान करूं लागल्या म्हणजे जलपृष्ठावर कमलपुष्पांचा नाच चाललेला आहेसें दिसे. कोणी स्नानाला घाईघाईनें येत असलेले दिसत. कोणी स्नानें उरकीत. कोणी स्तोत्रपाठ म्हणत. कोणी ध्यानमग्न होत. कोणी वस्त्रें धूत. कोणी स्नानकर्म आटोपून, कळशी तपेली घागर

जें असेल तें घासून पुसून स्वच्छ करून गंगाजलानें भरून लगबगीनें परत जाऊं लागत, तर कोणी प्रत्येक बुरुजावरील दत्तपादुकांवर किंवा सांबलिंगावर थोडथोडा अभिषेक करीत करीत, पण तरीही घाईनेंच जात असत. कर्तव्यनिष्ठ सज्जनांना प्रातःकाळीं फुरसत कुठली असणार ?

स्नानार्थ आलेल्यांत कोणी सज्जनेतर नसत असें नाहीं. अशांपैकीं कोणी शुचिर्भूत स्नेह्याच्या शुभ्र वस्त्रावर चिखल टाकून आपला अनिवार बालिश भाव प्रामाणिकपणें व्यक्त करीत. कोणी ध्यानास्थित द्विजास बारीक खडे मारून आपली ग्राम्य करमणूक करून घेत. तर कोणी धूतवस्त्र परिधान करणाऱ्या स्त्रीगणाकडे तिरक्या नजरेनें पाहून पापवासनेनें आपल्या पापी दृष्टीचें सार्थक करीत.

घाटावर प्रवाहाच्या क्रमानें वर ब्राह्मण खालीं खालीं ब्राह्मणेतर लोकांचे स्नानादि विधि चालले असत. पलिकडे घाटाखालीं चिखलावर कांहीं मानवी जीवांचा समुदाय दृष्टीस पडे. पावनगंगेस आपला विटाळ होऊं नये म्हणून हे बिचारे दुरूनच पाण्याची याचना करीत प्रहर प्रहर ताठकळत बसलेले असत. पण त्यांचेकडे नुसते पाहण्यालाही कोणास सवड नसे. स्नानोत्तर आपल्या दृष्टीस हे प्राणी पडूं नयेत म्हणून शुचिर्भूत स्त्री–पुरुष खालीं माना घालून चालत असत व त्यांतूनही एकादा दृष्टिपंथांत आलाच, तर त्यास एकादा अपशब्द उच्चारून ते दृष्टीचा विटाळ वाचेनें विटाळून दूर करीत. काट्यानें काटा काढावा ही रीति सरळच आहे.

नदीतटाकाचा हा प्रातःकालीन देखावा पाहून वृंदावन क्षणमात्र तल्लीन झालेले दिसले.

"तुमच्या पुण्यांत नळाचें तांब्या तांब्या पाणी घेऊन स्नान करण्यापेक्षां येथें मोकळ्या गंगाप्रवाहांत स्नान करणें किती तरी आल्हादकारक आहे !" गंगाधर कपडे काढीत म्हणाला. वृंदावनांना पोहतां येत होतें. त्यांना तो प्रसन्न जलाशय पाहून अत्यानंद झाला व लवकर धोतर कसून लहान मुलासारखी हावरेपणानें त्यांनीं प्रवाहांत उडी मारली. गंगाधरानेंही पाण्यांत शिरून व चार हात मारून हातपाय मोकळे केले. शेजारीं लहान मुलांच्या चाललेल्या जलक्रीडा कौतुकानें पहात उभयतांनीं स्नानें उरकलीं व वस्त्रें पिळून ते परत

घरीं जाण्यास निघाले. गंगाधराच्या मनांत प्रिय वस्तूची चर्चा करण्याची उत्कंठा संधि पहात बसलीच होती. स्नानास येणाऱ्या जाणाऱ्या मुलींत अंगांत पोलकीं, वेणींत फुलें घातलेल्या मुली येत जात होत्याच; तेवढें निमित्त साधून गंगाधरानें आपला मघाचा आवडता विषय पुन्हां उकरून काढला.

**गं.**—पण बायकांना एवढा नटवेपणा हवाच कशाला? सौंदर्याच्या देखाव्यानं अगदीं लोकांच्या डोळ्यावर येणं कांहीं चांगलं नाहीं.

**वृं.**—मग तोंडास काळं फासून असतं सौंदर्य घालवावं असं कां तुझं म्हणणं?

**गं.**—तसं नव्हे हो! आपल्या पद्धतीप्रमाणं वस्त्रालंकार घालून अकृत्रिम सौंदर्याचं पोषण खुशाल करावं.

**वृं.**—तर मग चुकतोस तूं. आपली पद्धति ही अकृत्रिमांत कृत्रिमाची भर घालणारीच आहे. नाना तऱ्हेचे दागदागिने आपण घालतों ते कशाकरितां? वाकडा भांग तुला नको. पण सरळ भांग तरी चांगलं दिसावं म्हणूनच काढतात ना! पुरुषांचं केस राखणंही तुला आवडत नसेल; पण अरे, सुंदर दिसावं म्हणून जसे केस राखतात तसं सुंदर दिसावं म्हणूनच अगदीं गुळगुळीत हजामतही करितात. रुचिभेदाशिवाय यांत दुसरं कांहीं नाहीं. अरे पण हो, तुला मुळीं सौंदर्याचा देखावाच नको नव्हे का? (मोठ्यानें हंसून) 'कायरे तुला सौंदर्यदर्शनानं आनंद होतच नाहीं वाटतं. ती रूपसुंदर मुलगी पाहून तुला अगदीं असह्य वेदना झाल्या असतील नाहीं! तिचा तो विशाल भालप्रदेश, काळेभोर केस, सरळ नासिका आणि पाणीदार डोळे पाहून तुझी अगदीं गाळण उडाली खरीच!

**गं.**—छेः परस्त्रियांचं इतकं सूक्ष्म वर्णन आपण करूंच नये. 'अनिर्वर्णनीयं परकलत्रं'

**वृं.**—भलताच गुरु केलास. स्वतः कालिदासाइतका या वचनाचा भंग दुसऱ्या कोणीं केला नसेल. आणि शिवाय मला वाटतं ती बालिका कुमारी आहे. (गंगाधराचें मुख सहेतुकपणें लज्जावनत झालेलें वृंदावनांनीं पाहिलें.) पण तुला तरी एवढा सौंदर्याचा राग कां? 'भार्या रूपवती शत्रुः' असं तर तुझं तत्त्वज्ञान नसेल! तसं असेल तर मला आतांच सांग. म्हणजे आपल्या मुलींच्या सौंदर्याचा विमा उतरून मग तुला मुलगी द्यावी असें मी तुला ठरेल

त्या मुलीच्या बापाला कळवीन.

हें बोलणें चाललें असतां गंगाधराबरोबर कोणी नवीन पाहुणे आहेत असें पाहून मागून स्नान करून येत असलेले गंगाधरांचे कांहीं स्नेही त्यांजवळ आले. शेवटचें वाक्य वृंदावनांनीं सर्वांकडे पाहून मुद्दाम मोठ्यानें हासत उच्चारलें व संदर्भ माहीत नसतांही सर्व मंडळींत मोठा हंशा पिकला.

नवीन मंडळी येऊन मिळतांच जुना विषय मागें पडला आणि हवापाण्याचे सर्वसंमत व शिळोप्याचे विषय निघाले. हळू हळू मंडळी वाटेंतील वळण वळून वेशीकडे येऊं लागली. तों स्नान करून गांवांत चाललेल्या स्त्रिया परत धांवत येतांना त्यांच्या दृष्टीस पडल्या. त्यांच्या पाठीस वुजालेला एक पोळ धांवत आहे असें पाहतांच गंगाधरानें पुढें उडी मारून हातांतील जाड वेत्र-यष्टीनें त्यास दूर केलें. इतकें होतें तों ते वेशीशीं आले. पण तेथेंही स्नान करून परत जाणारे स्त्रीपुरुष वेशींत गर्दी करून भयचकित होत्सते उभे असलेले त्यांनीं पाहिलें. काय प्रकार आहे तो पाहण्यास ते गर्दीतून घुसून वेशीच्या आंतील तोंडाशीं जातात तोंच--

: ३ :

वटपौर्णिमेचे दिवशीं सकाळीं वडावर स्त्रियांचा पूजासमारंभ सुरू असतां राजवाड्यांत सख्याचे मांडीवर डोके टेकून बलदेव अस्ताव्यस्त पडला होता. उजाडलें तरी तो अजून कांहींसा निशेच्या धुदींत असावा. त्यानें आपले पाय पायथ्याशीं बसलेल्या हसनच्या अंगावर टाकले होते. शेजारीं बाजूस एका लहानशा तक्याशीं यज्ञेश्वर दीक्षित पहुडले होते. जवळच एक पान तंबाकू सिगारेटचें ताट पडलें होतें. बर्जा सर्वांसमोर बसून आळीपाळीनें सर्वांना विडे करून देत होती.

"इतकं उजाडलं तरी उतरली नाहीं वाटतं !"

बर्जी मुरकून बलदेवास विडा देत म्हणाली.

"मुरकूं नकोस ! तुला थेरडीला पाहून मला शिसारी येते" बलदेव विडा घेत म्हणाला.

"मला तर हिला बघून कापरंच भरतं" सख्यानें कपाळास आठ्या घालून म्हटले.

"ए, कुत्ती लात खाशील चल नीघ येथून !" हसन म्हणाला. तोंच 'ए, गद्धा, तूं गप बस' म्हणून एक लाथ मारून बलदेवानें त्यांस गप बसविलें.

"खरंच ! महाराज ! आपण वयांत आलांत; आपण आतां राज्यकारभार बाबासाहेबांकडून काढून आपल्या हातीं कां नाहीं घेत ? म्हणजे तरुण वारांगना आपल्या सेवेला सहजच मिळतील." दिक्षितांनीं सल्ला दिला.

**हसन**—अरे दीक्षित, बाबासाहेब राज्य देईल पण बायका नाहीं द्यायचा.

"पण आम्हाला राज्य नसलं तरी फिकिर नाहीं पण—हूँऽऽ" असें म्हणून डोळे मिचकाऊन बलदेवानें हसनचे हातावर टाळी दिली.

**दीक्षित**—पण सरकार, हा थट्टेचा विषय न हे. आपण राज्यकारभार हातीं घेऊन वडिलांना विश्रांति दिल्याखेरीज ते स्वस्थ बसणार नाहींत. दौलतीची कोण अव्यवस्था माजली आहे! राज्यकारभारास जख्खड म्हाताऱ्यापेक्षां गुलजार तरुणांचीच गरज आहे. कसं काय हजरत ?

**हसन**—अरे पण दीक्षित राजाला आधीं राणी हवी ना ?

"ए नोडग्या, गुरूजींना असं एकेरी बोलतोस काय ?" असें म्हणून बलदेवानें हसनला आणखी एक लत्तापुष्प वाहिलें. निर्लज्ज हसननें दाढीमिशांच्या जंगलांतून एकवार दांत विचकून युवराजाचे पाय पुन्हा मांडीवर घेतले.

**दीक्षित**—जाऊं द्या ! जाऊं द्या ! युवराज, राज्याभिषेकाआधीं विवाह व्हायला हवा हें त्यांचं म्हणणं कांहीं खोटं नाहीं.

**युवराज**—पण गुरुजी, राणी मिळायला लग्नच कशाला व्हायला पाहिजे ? लग्नाच्या बायकोची कायमची बेडी आपणाला नाहीं बुवा झेपणार. राजा म्हटला म्हणजे तो नेहमीं अगदीं स्वतंत्र असला पाहिजे.

**दीक्षित**—पण प्रजेच्या दृष्टीनं एक धर्मपत्नी राजाला हवीच. मग अवांतर कांहींही चालेल.

इतक्यांत चहा व फराळाचें साहित्य वर आलें. प्रातःकाळचा चोपदार मुजऱ्यास आला. बलदेवाची निशा संपत आली होती.

" कसं काय, आईसाहेब बाबासाहेब खुशाल आहेत ? " जांभई देऊन मुजरा घेत बलदेवानें विचारिलें.

**चोपदार**—जी हुजूर, आईसाहेब आज मोठ्या पहाटे उठून वडावर जाऊन आल्या. महाराज सकाळींच शिकारीस गेले आहेत.

**हसन**—( हळूंच चोपदारास ) अँ, वडावर काय वागळं पाहयाला गेल्या होत्या वाटतं ?

**दीक्षित**—हो खरंच, आज वटपौर्णिमा असेल नाहीं ?

**बलदेव**—अरर्र. खरं कीं काय ! मग आज तिथं मौजच मौज पहायला

मिळेल. थेरंथेरं करणाऱ्या नाचणाऱ्यांच्या पेक्षां घरगुती बायकाच भारी चांगल्या दिसतात.

**दीक्षित**—वाः ! काय योग्य अभिप्राय ! कलावतीपेक्षां कुलवती श्रेष्ठ हे तर समीचीनच.

लागलीच बलदेवानें चार घोडे सजवून आणण्यास सख्याला हाकाललें. बायका पहायला मिळणार म्हणून हसन जिभल्या चाटूं लागला. बर्जीने बलदेवाचे अंगावर कपडे घालून पायांत मांडचोळणा व बूट चढविला. दीक्षितानें कास कशिली. हसननें दाढी सावरली. मग बर्जीशीं थोड्या कु-चेष्टा करून बलदेव, हसन व यज्ञेश्वर यांचेशीं खिदळत दिवाणखान्यांतून थोरल्या जिन्यानें खालीं रस्त्यावर आला. वाडयासमोर चार सुंदर अश्व सज्ज करून आणलेले होते. सख्या घोडयावर बसूनच आला होता. तो बलदेव येतांच खालीं उतरला. यज्ञेश्वरानें चटकन् घोडा पकडून त्यावर पटकन् आसन ठोकलें. हसनही स्वार झाला. सख्यानें युवराजाचा घोडा युवराजासमोर आणला. हा युवराजाचा खास स्वारीचा घोडा होता. तो अतिपुष्ट असून चकचकीत, चपळ व मोहक होता. बलदेव जवळ येतांच धन्यानें आपणाशीं बोलावें म्हणून तो मान हालवून जोरानें फुरफुरला. पण त्या इमानी जनावराचें सौजन्य त्याच्या मालकांत नव्हते. सख्याचे हातून लगाम घेऊन बलदेवानें त्यास एकवार जोरानें हिसडा दिला. सख्या आपल्या घोड्यावर चढला. महाराज, चला चला अशी हसन घाई करीत होता. बलदेवही चपळाईनें उडी मारून घोडयावर आरूढ झाला व ते चार चतुष्पाद प्राणी या चार द्विपादांना घेऊन वटवृक्षाकडे दौडत निघाले.

× × ×

देवकीस गंगाधर व वृन्दावन दिसले त्याच वेळीं त्या उभयंतांनींही देवकीकडे पाहिलें हें मागें सांगितलेंच. देवकीच्या दृष्टीशीं दृष्टि मिळतांच गंगाधरानें तोंड पुढें वळविलें खरें; पण त्याच्या तेवढ्याच ओझरत्या दृष्टिपाताचा खोल ठसा देवकीच्या मनावर उमटला. प्रिय अशा आठवणींचा केवढा तरी भूतकाल एकदम तिच्या मनश्चक्षूपुढें उघडला गेला. गंगाधर दृष्टिआड झाल्यावर त्यासंबंधीं विचार करण्याखेरीज तिला आतां कांहींच काम नव्हतें. "अगबाई"

ती मनाशीं बोलूं लागली. " हा तर रत्नाकर सावकारांचा मुलगा गंगाधर ! अलीकडे पुण्यास शिकायला गेल्यापासून चार वर्षांत आज पाहिला--होय तोच तो--आतां कांहीं पण तो तेव्हांसारखा लहान मुलगा राहिला नाहीं. तेव्हां बाबांबरोबर सावकारांचे घरीं मी जात असें तेव्हां त्याला मी कित्ती आवडें. तो तेव्हां चहाचा कप आपल्या हातानं आपल्या आधीं मला देई. आमच्या बाबांचा आणि रत्नाकरांचा घरोबा फार ! त्यामुळं तो मला अगदीं आपल्या बहिणी........अहं--अगदीं घरच्या सारखी समजे हो. लहानच होता तो तेव्हां ! मी बाबाबरोबर घरांत शिरलें कीं पुस्तक टाकून तो आधीं माझ्याकडे धांवत येई व माझा हात हातांत धरून ' आई, देवी आली देवी आली ' म्हणून मोठ्या मोठ्यांदा ओरडत आपल्या आईकडे मला ओढत नेई. तेव्हां तो लहान होता मी पण लहान होतें ! हो ! परकर पोलकंच होतं तेव्हां माझं. एक दिवस तो आणि मी एकाच ताटांत-हो पण लहानच होतों आम्ही म्हणूनच एकाच ताटांत फराळ केला. " ती इकडून तिकडून येरझारा घालीत होती. शून्य दृष्टीनं ती चोहोंकडे पाही. कोणी बोलवलेंच तर कांहीं बोले. ती त्या रम्य आठवणींत दंग झाली होती. " हो, त्यावेळीं त्याची परीक्षा उतरली आणि तो पहिला आला. तें रत्नाकरांनीं आमच्या बाबांना सांगितलं. मी तें ऐकलं आणि धांवत त्याच्याकडे गेलें. आणि त्याच्या कमरेस मिठी मारून--लहानच होते मी--मी परीक्षेचं त्याला विचारलं. त्यानं उत्तर न देतांच हर्षानं माझ्या मुखांत पेढा......घातला. त्यानं मग मला उचलून एकदम कडेवर घेतलं. मीही मग त्याचे गळयांत हात टाकले. आणि...... अगबाई ! " ती दचकली. तोंड आरक्त होऊन अंग थरारलेलें दिसलें. तिला आनंदाची उकळी आली, दांतांनीं ओंठ दाबून ती अधोवदन होत्साती एकदम त्या शिलातलावर बसली. पण पुन्हां थोड्या वेळानें उठून फिरूं लागली. हातानें पदराशीं चाळा सुरूं होता. पायाच्या आंगठ्यांनीं केव्हां फरशी खरडी, केव्हां उगीच कुणाशीं कांहींतरी बोले. पुन्हां शून्य दृष्टि होऊन विचारमग्न होई. " मला तेव्हां कांहींसुद्धां कळत नव्हतं. आठच वर्षांची असेन मी तेव्हां. मी लहान असतां एकदां बाबाबरोबर राजवाड्यांत गेलें होतें. मला पाहून

युवराजाकरितां अधिराजांनीं बाबाजवळ मला मागणी घातली. अगबाई ! कसला ग तो धटिंगण युवराज ! छेच पण, बाबांनीं साफ साफ नाहीं म्हणून सांगितलं ! बाबांनीं ती हकीकत रत्नाकरांनाही सांगितली—आणखीन् त्यांनीं विचारलं—" ती मध्येच हंसली. पुनः त्याच विचारांत गुंगली. "त्यांनीं विचारलं देवकी गंधाराला.........इश्श ! ...आणि मी पण तें गंधाराला—अंहं त्यांना पण मी सांगितलं." ती लाजल्यासारखी अगदीं स्पष्ट स्पष्ट दिसली. "मी पण तेव्हां लहानच होतें ... माझ्याशीं तेव्हां किती बोलत मी तर मुळीं 'अरे गंगाधर'च म्हणें. तेव्हां तो अगदीं लहान दिसे. आज पण ते किती मोठे दिसायला लागलेत. आणि...... माझ्याकडं पहातांच दृष्टि पण वळवली, मग पुढं हांक मारायची नी बोलायचं तर लांबच राह्यलं. तेव्हांसारखी 'देवी' म्हणून आतांही कां नाहीं हांक मारली ! मी 'ओ' दिली.........हो ! दिली असती. पण, तेव्हांसारखी आतांही मी आवडत असेन का ?" तिनें एक खोल व दीर्घ निःश्वास सोडला. बरोबरच्या सुवासिनीनें पूजाकर्म आटोपून तिला परत चलण्यास सूचना दिली तेव्हा ती भानावर आली

त्या दोघी जायला निघतात तोंच बलदेव घोडे दौडीत वटवृक्षासमीप आला. वडाचे पारापासून वेशीपर्यंत प्रशस्त मैदान होतें. त्यावर राजपुत्राच्या व त्याच्या परिवाराच्या अश्वलीला सुरू झाल्या. पारावरील स्त्रियांना सहजच तो कौतुकाचा विषय झाला. कितीही व्यसनी व कितीही मूर्ख असलें तरी भाग्यवंताचें लेकरूं ते ! त्याचें कांहीं झालें तरी सर्वांनीं कौतुकच करावें ! त्यांत आणखी साऱ्या संस्थानचा तो युवराज ! परत निघालेल्या पारावरील स्त्रिया कौतुकानें अश्वलीला पहात पारावरच उभ्या राहिल्या. स्नानास जाणारे स्त्री, पुरुष व मुलें, तशींच स्नानाहून परत येणारीं माणसें दोन्हीं दोहो बाजूस मौज पहात उभीं राहिलीं. तरुण व सुंदर स्त्रियांना आपण आवडावें असें वाटणें हा तरुण व रसिक पुरुषांचा सहज स्वभाव आहे. ज्या विषयांत तरुणींच्या दृष्टीनें आपण श्रेष्ठ ठरूं इच्छितों, तो विषय मग कोणताही असो, तरुणींना तो समजो अथवा न समजो, तरुणींना आपण आवडलों त्यांच्या आवडीचा संभाषणाचा विषय झालों कीं तरुण खूष. मग त्यांनां जसें आवडेल तसें वागा-

यला तरुण एका पायावर तयार ! हा स्वभाव कांहीं अवगुण आहे असें नाहीं. तर तो दाक्षिण्यांत किंवा रसिकतेंत मोडणारा सद्गुण आहे. पण सज्जनांत हा असतो, तसाच पण तो असज्जनांतही असतो. सज्जनांत तो असतो तेव्हां तो सौजन्यानें व शालीनतेनें व्यक्त होत असतो. पण दुष्ट, मूर्ख व उल्लू तरुणांत मात्र सर्व दुर्गुण बरोबर घेऊन तो अगदीं चौफेर पाघळूं लागतो. बलदेव घोड्यावर बसण्यांत पटाईत होता. तरुण स्त्रिया आपणाकडे कौतुकानें पहात आहेत असें पाहून त्यालाही आपलें कौशल्य दाखविण्याचें स्फुरण आलें आणि त्यानें व इतरांनीं सर्व मैदानभर चौखुऱ्यांनीं घोडे फेकण्यास सुरवात केली. क्षणभर करमणुकीकरतां उभा राहिलेला स्त्रीपुरुषसमुदाय आतां या आकांड तांडवानें सर्व रस्ताच अडल्यामुळें तसाच जेथल्या तेथें थबकून राहिला. साऱ्या संस्थानचा युवराज तो ! त्याला कोण अडवणार ! युवराजांचा दृक्प्रसाद आपणास मिळावा म्हणून घोडा जवळ येतांच एखादा लुब्रा प्रेक्षक " बहोत आच्छा, बहोत खाशी, वा वा " असें म्हणे. त्यानें घोड्यास व त्याच्या पाठीवरील मूर्खास अधिकच स्फुरण चढे व आपण रस्ता आडवून लोकांचा खोळंबा करीत आहों याचें गुमानही न राहून युवराज अधिक जोरानें घोडा फेकी. कांहीं वेळानें बलदेवाचा हुरुप आणखी वाढला. आतां नुसत्या अश्वकौशल्यप्रदर्शनानें बलदेवाचे समाधान होईना. आचरटपणांत शेवट केल्याशिवाय मूर्खाच्या करमणुकीच्या समाधानास शीग चढत नसते. हसनचा घोडा थोडा खोडकर आहे हें बलदेवास ठाऊक होतें; तेव्हां आतां विनोद करण्याकरतां बलदेवानें आपला घोडा हसनच्या घोड्यामागें सोडला. हसनचा घोडा भिऊन बेफामपणें रंगण मारीत सुटला. हसन बसणारा बेताचाच होता. तो घाबरून ओरडूं लागला. या आततायी मूर्खपणानेंही त्या राजनिष्ठ प्रेक्षकांची करमणूकच होऊं लागली. अखेर पिसाटपणें धांवतां धांवतां पाराचे बाजूस येऊन एका दगडाशीं हसनचा घोडा ठेचकळला. हसनची मांड निसटली. पण सुदैवानें रिकीबींतून पाय निघून हसन सफाई खालीं आला. मग काय विचारतां ! प्रेक्षकांतून हंशाचा नुसता पाऊस पडला. जवळच पारावर हसणाऱ्या स्त्रियांकडे हसन संतापानें चिडून पहात होता. घोडा जो निसटला तो गर्दी तोडून पार झाला. हसननें उठून कण्हत कण्हत कपडे सावरले. युवराज व दीक्षित हेही पुढें

येऊन व घोडे थांबवून खिदळत उतरले. घोडे मळ्याकडे देऊन ते हसनचे कपडे साफ करूं लागले. प्रेक्षकसमुदायही जवळ जवळ येऊं लागला. हसन यास थोडे लागलें होतें. पण तिकडे त्याचे लक्ष नव्हते. पारावर कडेस मुलीबाळी उभ्या होत्या, त्या अजून मोठमोठ्यानें हंसत होत्या. तिकडे तो चिडून पहात होता व दांत ओंठ खात शिवी ओकत होता. बलदेवासही हसनचा हा अपमान आतां पुरेसा वाटून तो त्या मुलींचे अंगावर दरडावला. कांहीं लहान मुली भेदरल्या; पण आचरट व मूर्ख असतात त्यांचा सर्वच आविर्भाव आचरटपणाचा दिसतो. यामुळे त्याच्या कर्कश दरडावण्याला व हात-वाऱ्याला जाणत्या मुली तोंडे थोडीं मागे करून मोठ्यानें हंसल्या ! झालें ! ! आधींच तामसी; त्यांत सत्तामदांध; त्यांत आणखी मित्राचा व वर आपलाही अपमान झाला; बलदेवाच्या अंगाचा नुसता तिळपापड झाला. पारावरील हंसणाऱ्या मुलींत जी सर्वांत अधिक ठळक तिचें हंसणें त्याच्या सर्वांहून अधिक डोळ्यावर आलें. त्याबरोबर एक शिवी हासडून आणि पारावर चढून त्या राक्षसानें घाबरलेल्या त्या मुलीस हातास धरून उघड्या मैदानांतून वेशी-पर्यंत फराफर ओढीत नेलें. सर्व प्रेक्षक एकदम चकित झाले. स्त्रिया तर काय बोलून चालून अबला, त्या भीतीनें जागच्या जागीं थिजल्यासारख्याच झाल्या. पण पुरुषांतही या संकटाचें धैर्यानें निवारण करील असा एकादा मायेचा पूत दिसेना. सगळे जागच्या जागीं स्तब्ध ! कांहींना थोडी मौजही वाटली. कांहीं वृद्ध कर्पी 'जाऊं द्यां सरकार सोडून द्या' म्हणण्याच्या विचा रांत होते. पण बलदेवाचा तो राक्षसी अवतार पाहून त्यांची बोलण्यास छाती होईना. देवकीस—ती बालिका देवकीच होती—देवकीस ओढीत ओढीत वेशीपर्यंत जाऊन बलदेव थांबला. हसन सुडाच्या हर्षानें पाठोपाठ धांवत त्यांच्या मागोमाग गेला. दीक्षित तेथें होताच. बलदेवानें देवकीचा हात घट्ट धरून तिजकडे रागानें निरखून पहात म्हटलें.

अरेच्या ! तूं त्या रामशास्त्र्याची मुलगी नाहीं का ? अग राक्षसी ! हिच्या बापानें बाबासाहेबांचा त्यांच्या तोंडावर अपमान केला होता. तूंच नाहीं का ती !

देवकीनें मागें पुढें पाहिलें. सोबतचा स्त्रीसमुदाय आता पारावर लांब राहिला. पुरुष कांकणें भरून बसलेले तिला दिसले. तिनें जोरानें किंकाळी फोडली.

बलदेवानें तिच्या हातास जोरानें हिसडा दिला. त्या सैतानाच्या हातांत ती अवश झालेल्या हरिणीप्रमाणें थरथरां कापत होती. पण त्याच वेळीं, व्याधांनीं चोहोंकडून कोंडलेल्या काळवीटाप्रमाणें ती क्रुद्ध व भीषण दिसत होती. तिच्याकडे पाहून तिच्या डोळ्यांतून निखारे पडतात कीं काय असे बलदेवास वाटलें. तिच्या दृष्टीशीं दृष्टि त्याला देववेना, ती मोठ्यानें किंचाळली.

**युवराज**—आरड. खुशाल आरड. रामशास्त्री नाहीं म्हणतो का ? आता तुला कोण माझ्या हातून सोडवतो पाहूं दे मला !

सर्व जमाव अगदीं निश्चल होता. पण इतक्यांत कांहीं गडबड झाली. गर्दीच्या बाहेरून 'कोण ? कोण तो राक्षस ?' असा कर्कश ध्वनि निघाला व पाठोपाठ वेशीकडून गर्दी दुभंगून हातांत जाड वेत घेतलेला, रागानें क्रूर दिसणारा एक तेजःपुंज तरुण ताडकन् पुढे उडी मारून बलदेवासमोर उभा टाकला. लोक पुन्हां स्थिमित झाले. बलदेव भेदरला. त्याचे हातपाय थरथरां कापूं लागले. हा तरुण गंगाधरच होता. देवकीनें तेवढ्यांत गंगाधराकडे पाहिलें. तिला तेवढ्यांतच थोडा धीर आला. गंगाधरानें झटकन् बलदेवाचीं बोटें फासळून देवकीचा हात सोडविला. ती बलदेवाचे हातून जी निसटली ती धूम पळत बायकांत जाऊन मिसळली. एवढ्या प्रजाजनासमोर अपमान होऊन वर आणखी हातची शिकारही निसटली असें पाहून मांत्रिकाने मंत्र टाकून कुंठित केलेल्या नागाप्रमाणें बलदेव आंतल्या आंत फणफणूं लागला. गंगाधर संतापानें अग्नितुल्य प्रखर दिसत होता. त्यानें एका हातानें बलदेवाची मानगूट धरून त्यास हालवीत म्हटलें, " ए पशू, लाज लज्जा सगळी सोडलीस वाटतं. तुला कुणी विचारता सवरता नाहीं असं वाटलं होय ? " मानेचा हात सोडवून घेण्याचा बलदेव प्रयत्न करूं लागला. पण गंगाधराची पकड पक्की असल्याचें त्यास आढळलें. हसन त्यास सोडविण्यास पुढे आला. त्यास गंगाधरानें एकाच कोपरळीनें मागें सारलें. गंगाधराचे पाठोपाठ वृंदावनही पुढें येऊन गंगाधराशेजारीं उभे होते त्यांची मुद्रा गंभीर दिसत होती. यज्ञेश्वर दीक्षित हळूंच त्याजवळ येऊन म्हणाला—

" जाऊं द्याहो ! द्या सोडून, उगीच भर रस्त्यावर दांडगाई करणं चांगलं नाहीं. "

" इतका वेळ गप्प होतात तेंच आतां बोलण्यापेक्षां बरं होतं. आतां तुम्ही बोलणं सोईचं नाहीं " वृंदावनांनीं निरस्कारानें उत्तर दिलें.

**युव.**—अरे पण तूं कोण आम्हांला आज्ञविणारा सांग! अरे पकडा याला आणि घाला बेड्या !

बलदेवानें सुटण्यासाठीं धडपड केली पण व्यर्थ !

**गं**—येऊं दे कोण तुझा पाठीराखा पुढें येतो तेंच मला पाह्यचंय ! हरामखोरा, तुलाच अधिराजांपुढें उभा करून खोडा द्यायला लावतो. अब्रुदाराच्या मुलीवर हात टाकायला शरम नाहीं वाटली तुला ? माझा आज प्राण गेला तरी बेहेत्तर, पण असा तसा नाहीं सोडणार आज तुला !

इतक्यांत पोलीसपार्टी आली. त्यांनीं या मंडळीस वेढा दिला. एक अधिकारी पुढें आला. त्यानें गंगाधराकडे रागानें पाहून बलदेवाच्या मानेवरील गंगाधराच्या हातावर एक ठोसा लगावला. पण हात न निघाल्यामुळें बलदेवाच्या मानेस जबर धक्का बसून तो कळवळून ओरडला. शेवटीं गंगाधरानें हात सोडला आणि तो व वृंदावन लाठ्या सांवरून बलदेवाचे दोहो बाजूस उभे राहिले.

" युवराज साहेबांपासून दूर व्हा. आम्ही तुम्हांला गिरफदार केलं आहे. " शिपायांचा नाईक दुरून दरडावला.

**गं.**—आम्हीच युवराजांना गिरफदार केलं आहे. त्यांनीं एका प्रजाजनावर नाहक्क हात टाकला. याचा आम्हालाच आधीं जाब पाहिजे. आम्ही त्यांना सोडणार नाहीं. तुम्हांला काय करावयाचं तें करून घ्या.

संस्थानी पोलीसाचें शौर्य मद्दशूरच आहे. कॉन्स्टेबल एकमेकांकडे पहात पाय आपटूं लागले. इतक्यांत रामशास्त्री, रत्नाकर सावकार, मागून स्टेटकारभारी प्रभुणे वगैरे प्रतिष्ठित ग्रामस्थ तेथें आले. रामशास्त्र्यास पाहतांच बलदेवास त्वेषाचा एकदम कढ येऊन तो ओरडला. " ए भटा, तुझ्या पो—" पण इतक्यांत कारभाऱ्यास पाहून तो बिचकला व त्यानें खालीं मान घातली. शास्त्री संतापानें अगदीं वेडा झालेला दिसला. रत्नाकरांची मुद्रा रागावलेली पण गंभीर होती. कारभारी साहेबांस युवराजांची परस्पर होत असलेली संभावना पाहून थोडेसें समाधानच वाटलें असावें. तें वृंदावनांस म्हणाले " चला

आतां राहूं द्या. आपण सर्वच आमच्या घरीं उपहाराला चला. त्यांचं तरी पोरवयच आहे. कळूं लागेल तेव्हां निवळतील ते सुद्धा " इतकें बोलून त्यांनीं पोलिसास गर्दी मोडण्यास हुकूम केला. रत्नाकर सावकारांचें गांवांत व खुद्द अधिराजावरही चांगले वजन होते. आणि बलदेवाचा गुन्हाही उघड होता. यामुळे कारभाऱ्यांनीं गंगाधरास सरळ गिरफदार न करतां बुजवाबुजव चालविली. पण गंगाधराने तें ताबडतोब ओळखून अधिकच जोर बांधला. " आम्ही याला अधिराजापुढं उभा करणार. " पण तीही वेळ लगेच आलीच. घोडेस्वारांची दौड दुरून ऐकूं आली. अधिराज शिकारीहून परत येत असल्याचें सर्वांनींच ताडले. इतक्यांत रस्ता पुकारणारा स्वार पुढे आला. व मागून पंधरा वीस घोडेस्वारासह अधिराजही त्या स्थानीं येऊन दाखल झाले. त्यांना पहातांच बलदेवास प्रथम थोडासा धीर वाटला. पण आधीं आपलाच अपराध आहे हें लक्षांत येऊन थोडी भीतिही वाटली गंगाधर व वृंदावन यांनीं आपली जागा सोडली नव्हती. अर्थात् बलदेवही नाइलाजानें तेथेंच उभा होता. अधिराज हा सर्व देखावा पाहून क्षणभर गोंधळले. पोलिसांनीं खडी ताजीम दिली. पण रागीट मुद्रा करून उभे असलेले रत्नाकर व रामशास्त्री दृष्टीस पडतांच मुजराही न घेतां अधिराज त्यांचेकडे वळले.

" आहे काय प्रकार हा शास्त्रीबुवा ! " अधिराजांनीं नम्रपणें विचारलें.

" आपल्या राज्यांत आमची अब्रू नाहीं राहिली. " रामशास्त्री उसळून म्हणाले.

अधिराजांनीं रत्नाकराकडे जिज्ञासेनें पाहिलें. पण ते रागांतच होते व बोलत ना, तेव्हां कारभारी पुढें झाले. पण युवराजांचा अपराध आपण आपल्या तोंडीं कसा सांगावा, याची त्यांनाही पंचाईत होतीच. " गंगाधरपंत आणि हे दुसरे गृहस्थ युवराजांना वेढून उभे असतां आम्हीं आलों " असें म्हणून त्यांनीं नाइकाकडे पाहिलें. पण याहून अधिक कांहीं सांगण्याची नाइकाचीही छाती होईना. अधिराजास आपल्या मुलाचा पूर्ण परिचय होता. यानेंच कांहीं गुण उधळले असावेत अशी त्यास शंका आली. म्हणून हसन व बलदेव या उभयतांकडे पाहून " काय झालं रे ? " म्हणून दरडावून त्यांनीं विचारलें. युवराज भ्यालाच पण हसननें अडखळत " हे पागल—आमचा—

अपमा...न करतात " एवढे शब्द उच्चारले. बलदेवासही आतां धीर आला आणि " आतां दाखवतों " असें म्हणून तो अस्तन्या मारूं लागला. गंगाधर व वृंदावन यांकडेही काय झालें तें समजण्याचे बुद्धीनें अधिराजांनीं पाहिलें. गंगाधरानें, " एका ब्राम्हण मुलीवर युवराज साहेबांनीं भर रस्त्यांत हात टाकल्यामुळें हा प्रसंग ओढवला ! " असें शांतपणें सांगितलें.

" मग आम्हांला हसावें कां तिनें ? " बलदेव चुळबुळत बोलला. अधिराजांनीं तिकडे लक्ष न देतां " कोणती मुलगी ? " अशी अगदीं घाबरून पृच्छा केली. तेव्हां गंगाधरानें एकदम गर्दीतून पुढें जाऊन देवकीस हांक मारिली. विश्वासाची हांक येतांच देवकीही धिटाईनें पुढें येऊन रामशास्त्री व रत्नाकर यांचेमध्यें उभी राहिली. अधिराजांनींही तिला तेव्हांच ओळखलें. एखाद्या अपराधी मनुष्याप्रमाणें अधिराजांची चर्या रामशास्त्र्यांपुढें फिकी पडली. घोड्यावरून उतरून ते देवकीजवळ आले व काय हकीकत आहे ती निवेदन करण्यास त्यांनीं तिला सांगितलें. देवकी जात्या हुशार व धीट होतीच. अपमानामुळें ती अतिशय रागावलीही होती. तिनें घोडे खेळूं लागल्यापासून तो तहत हा वेळपर्यंत सर्व हकिकतीचा खडखडीत पाढा वाचला आणि हसन पडला व युवराज ओरडला, तेव्हां आपणास अनावर हसूं आल्याचेंही तिनें सांगून टाकलें. बलदेवास नाहीं होय करण्यांस कांहीं उरलेंच नाहीं. त्यानें व त्याच्या मित्रमंडळानें मौन धारण केलेलें पाहून अधिराजास बलदेवाच्या अपराधाचें माप पुरें पटलें. सर्वच प्रकरण अखेर आपणवार शेकलेलें पाहून बलदेवाचा आधींच धीर खचला होता. त्यांतच त्याच्या मनगटास धरून अधिराजानीं त्यास पुढें ओढलें. तेव्हां पाय लटपटून त्याचा तोंडावर झोंक गेला. पण अधिराज धिप्पाड व सशक्त होते त्यांनीं दंडास धरून त्यास उभ्या उभ्याच उचलले व आपणापुढें उभें केलें. अव्यवस्थितांचा संताप म्हणजे समुद्रांतलें तुफान तें, तेथें दया माया, शिस्त भीड, मर्यादा कांहींच राहावयाची नाहीं. " गाढवा, एक दिवस राज्याला आग लावशील तूं ! " असें ओरडून त्या एवढ्या समाजांत अधिराजांनीं दोहीं हातांनीं बलदेवाच्या पांच पंचवीस थोबाडींत मारल्या. तेवढ्यानें समाधान न होऊन त्यांनीं घोड्याचा कोरडा मागितला, पण रत्नाकार व रामशास्त्री यांनीं मध्यें पडून

बलदेवास बाजूस काढून घेतलें. "आम्ही काय, ते काय, आपलीच प्रजा आहोंत. त्यांना आम्हांला आपणच पोटाशीं धरणार! होऊं द्या एवढा वेळ माफी!" असें म्हणून रामशास्त्र्यांनीं अधिराजाकडे पहात पहात बलदेवाचे पाठीवरून हात फिरविला. रामशास्त्रीच अखेर आपल्या उपयोगी पडला हे पाहून बलदेवास मेल्याहून मेल्यासारखें झालें. हसनच्या तर तोंडचें पाणीच पळालें. यज्ञेश्वर शिष्टपणानें अधिराजासंनिध उभा होता. अधिराजांनीं त्याकडे एकवार तिरस्कारानें पाहिलें व सर्वांस वाड्याकडे चलण्यास हुकूम फर्माविला.

ब्रिटिश रेसिडेंट अहिल्यापुरीस नुकताच येऊन गेला असून संस्थानच्या अव्यवस्थेबद्दल त्यानें ठपका दिला होता व सुधारणा झाल्याचें लवकरच न कळल्यास योग्य (?) तजवीज करून टाकण्याचीही धमकीवजा सूचना त्यानें दिली होती. त्यांतच आज हें प्रकरण उद्भवलें. रत्नाकर व रामशास्त्री हीं अहिल्यापुरींतील बडीं धेंडें असून रेसिडेंटाकडेही यांचें स्वतंत्रपणें वजन चालण्यासारखें आहे हें अधिराज जाणून होते. पोलिटिकल एजंटाचा सुरक्षक पाठिंबा मिळाल्यास संस्थानचें वाईट चिंतण्याइतकें धैर्य दाखवितील इतपत कांहीं माणसें बापलेकांनीं आपापल्या परीं दुखवून ठेवलेलीं होतीं, आणि सारा प्रकार आज घडला तो अगदीं भरदिवसा सकाळीं चव्हाट्यावर शेंकडों लोकांसमोर. आगळिक घडली तीही एका प्रतिष्ठिताच्या मुलीची. अधिराजांचें तर धाबेंच दणाणलें. गंगाधराचा राग येण्याऐवजीं त्यानें मध्यें पडून पुढील प्रकारास आळा घातला याबद्दल त्यांनीं त्याचा तो उपकारच मानला. पुढें आणखी काय झालें असतें याची केवढीही भयंकर कल्पना केली तरी चिरंजीवांच्या ठिकाणीं त्यांना तिचा असंभव वाटेचना, इतका मुलाचा त्यांना दृढ भरंवसा होता.

प्रेक्षकगण हळू हळू पांगत चालले. अधिराज, युवराज, त्याचें मित्रमंडळ, गंगाधर, वृंदावन, रामशास्त्री रत्नाकर वगैरे सर्व मंडळी हळू हळू पायींच चालू लागली. चालतां चालतां अधिराजांनीं गंगाधरास जवळ बोलावलें, व त्याचे गुण गाऊन युवराजास लाजविण्याचा प्रयत्न केला. गंगाधराबरोबरचा दुसरा अनोळखी तरुण कोण अशी अधिराजांनीं चौकशी केली. " ते

पुण्यास नवीनच निघून एकदम पुढें आलेल्या ‘ प्रताप ’ पत्राचे मालक व संपादक आहेत, व आपल्या पत्राचा प्रसार करून संस्थानी राजकारणाची समक्ष माहिती मिळवावी अशा उद्देशानें ते आपले येथें आले आहेत, ” असें गंगाधरानें सांगितलें. कायदेशीर व शिस्तशीर राजकारणाचा गंधही नसल्यामुळें मोहोबतीनें अथवा दंडेलीनें आणि अव्यवस्थेनें राज्यकारभार चालविणाऱ्या संस्थानिकांना ब्रिटिश मुलखांतील वर्तमानपत्रांचा मोठा धाक वाटत असतो. आजचा प्रकार अशा एका संपादकापुढें घडला. तेव्हां आज या दुखावलेल्या सर्व मंडळींची समजूत घालून त्यांचा स्नेह संपादण्याचा आणि बलदेवाच्या वर्तनास आपण उत्तेजन देत नसून सर्व परीनें आळाच घालतों असें सिद्ध करण्याचा अधिराजांनीं निश्चय केला. शिवाय वृंदावनांचा या प्रसंगानें संस्थानाविषयीं होणारा प्रतिकूल ग्रह दूर करण्याकरितां त्यांचा गौरव करून त्यांकडून बलदेवाचीही थोडी कानउघाडणी करण्याचें त्यांनी योजिलें. व मग बरोबरच्या सर्व मंडळीस आज वाड्यांतच पंक्तीस चलण्याबद्दल आग्रहानें सांगून सर्वांच्या घरोघर तसे निरोप पाठविले.

: ४ :

वृंदावन वसंत गोखले हे पुण्यांतील एका पुरातन व प्रतिष्ठित घराण्यांतील गृहस्थ असून त्यांच्या घराण्याचा विद्वत्तेबद्दल पिढ्यानुपिढ्यांचा लौकिक होता. स्वतः वृंदावन बी. ए. एलएल. बी. असून त्यांनीं देशसेवेंत आपलें आयुष्य खर्ची घालण्याचें ठरविलें होतें. लहानपणापासूनच त्यांचा लेखन-भाषणाचा अभ्यास होता. धर्मकारण, समाजकारण, राजकारण वगैरे सर्व क्षेत्रांत खोल विचार करून त्यांनीं आपलीं मतें शाळाकॉलेजांत असतांनाच बनविलीं होतीं. स्वतांच्या पोटापाण्याची फिकीर न करण्याइतकी आर्थिक अनुकूलता त्यांस वडिलार्जित लाभल्यामुळें खाजगी आयुष्यक्रमाचा किंवा बारीक सारीक वैयक्तिक व्यवहाराचा त्यांनीं कधींही फारसा विचार केला नाहीं. साधा बाजारहाटही त्यास करतां येत नसे, व करण्याचा प्रसंगही नव्हता. लौकिक शिष्टाचार, त्यांचें महत्त्व न वाटल्यामुळें, त्याच्या वर्तनांत कधींच येत नसत. पण त्यांचें निरीक्षण अखंड व मार्मिक असून मनुष्यस्वभावाचें त्यांचें ज्ञान अचुक असे. त्यांचे वाचन इतर पुष्कळांच्या मानानें बरेंच असलें तरी इतराप्रमाणें त्यांनीं त्याचा देखावा कधींही केला नाहीं. वाचन कितीही झालें तरी ते अपुरेंच असतें असें त्यांचें मत असून त्याबद्दल त्यांना कधींही आत्मविश्वास वाटत नसे. व्याकरण, व्युत्पत्ति, ज्योतिष, गणित, तसेंच रसायनादि शास्त्रें वगैरे त्यांना कांहींच कळत नसत, व ते तसें स्पष्ट सांगत. छंदोरचना त्यांना कधींच साधली नाहीं. निरनिराळ्या माहितीचीं बाडें त्यांनी कधींही डोक्यांत बाळगिलीं नाहींत. कोणत्याही विषयावर माहितीच्या दृष्टीनें

बोलावयास ते कधींही धजत नसत. दुसऱ्याचे लक्षांत येण्याआधींच आपलें अज्ञान ते जाहीर करीत. पण निव्वळ विचाराच्या क्षेत्रांत त्यांच्या बुद्धीची गति अगदीं अकुंठित असे. कोणताही विषय विचाराला घेतला कीं त्याचे बारीक सारीक धागे दोरे झट झट उकलून एखाद्या रेशमी वस्त्राची वीण सोडवावी तसा ते तो विषय तडाक्यासरशीं मोकळा करून टाकीत. त्यांच्या विचारांत नावीन्य, प्रतिभा, स्पष्टपणा व निश्चय हे गुण असल्यामुळें ते भाषेंत सहज उमटत. त्यांची शब्दरचना गोड व समतोल असे. त्यांतून निश्चितार्थच व्यक्त होई. वरचेवर किंवा अकारण विनोद त्यांना आवडत नसे. स्वभावतः ते भारदस्त असत. त्यांचें खाजगी संभाषण जाहीर सभेंतील भाषणाप्रमाणें गंभीर, संथ व विचारपरिप्लुत असे. उलट मार्मिक, सभ्य व आटोपशीर विनोद, भारदस्त पण सोपी भाषा, परिचित दृष्टांत व सहज अभिनय या गुणांनीं त्यांचें जाहीर भाषण खाजगी संभाषणाप्रमाणें मनोहर वाटे. त्यांचे खाजगी किंवा जाहीर भाषण उच्चाभिरुचीचे श्रोते चित्राप्रमाणें तटस्थ राहून ऐकत. इतरांना त्याचा कंटाळा येई खरा, पण त्यांच्याच्यानें वृंदावनांचा अपमान करवत नसे. इतका सर्वांस त्यांच्याबद्दल आदर वाटे. इतर सर्वसामान्य सुशिक्षितापेक्षां यांनीं पुष्कळच अधिक विचार केलेला असल्यामुळें यांच्या इतराशीं होणाऱ्या संभाषणाची परिणति यांच्याच व्याख्यानांत होई आणि मग ते एकसारखे अस्खलित बोलूं लागत. यांच्या भाषणाची व विचाराची नेहमीं दुसऱ्यावर छाप पडे. हा पगडा अनिवार पण असह्य वाटणारे लोक त्यांचे गुप्त शत्रु होत व दुसरे भक्त अथवा स्नेही बनत. पण स्वतः मत्सरादि दुर्गुणांचा यांचे ठिकाणीं लवलेशही नसल्यामुळें यांचे शत्रुही प्रसंगीं पस्तावत. संभाषणांत दुसऱ्याकडून कांहीं न मिळतां आपणच विचार बोलण्याचा यांना प्रसंग येत असल्यानें त्यांच्या बोलण्यांत थोडासा शिक्षकी वरचढपणा असे. वडीलधाऱ्या माणसाशींही बोलतांना ते शिक्षकाचा किंवा उपदेशकाचा भाव न कळत आणीत व एखादा वडीलांखेरीज न बोलण्यासारखा रागाचा शब्दही वेळीं ते उच्चारीत. यामुळें केवळ जिज्ञासूखेरीज दुसरे लोक यांचेशीं बोलतां बोलतां मध्येंच संभाषण सोडीत किंवा मुळींच संभाषण टाळीत. पण जिज्ञासूचें

हटकून समाधान होई. वादविवादांत दुसऱ्याच्या उण्या अधिक शब्दांचें यांना कांहींच वाटत नसे यांची झडप मुद्द्यावर असे. मुख्य मुद्दा तेवढा पकडून हे पुढें धावूं लागत. यामुळें यांस कोणी चिडवूं शकत नसे सारखा अथवा अधिक बुद्धिवान मनुष्य असल्यास यांना बोलतांना अधिक आनंद होई. ज्याविषयीं त्यांनीं विचार केला नसे, असा विषय संभाषणांत निघाला तर संभाषणांतच त्यांचे विचार बनत, तेव्हां त्यांची विचार करण्याची मार्मिक, सरळ व बिनतोड पद्धति नजरेस येई.

पण इतकी विवेचकता असूनही त्याची तत्त्वनिष्ठा असामान्य होती. लहानपणापासून त्यांची ईश्वरावर दृढ निष्ठा असून ते भक्तिमान् होते. बारिक सारीक व्यवहारांत सुद्धां मनुष्यानें तत्त्वसंशोधन करून व्यवहार सुधारला पाहिजे असे ते प्रतिपादीत. ठरलेल्या तत्त्वांप्रमाणें वागण्याचा त्यांचा आग्रह कित्येकदां चांगल्या चांगल्या लोकांच्या दृष्टीनें हास्यास्पद ठरे. पण यांना त्याची फिकीर वाटत नसे. असा एक प्रसंग ते नेहमीं इतरांस सांगत व ' माझें चरित्र जाणूं इच्छिणारास हा प्रसंग समजून घेतलाच पाहिजे ' असें ते म्हणत. आम्हीही तेवढ्याकरतां येथें तो प्रसंग नमूद करतों.

वृंदावन कॉलेजांत असतां एकदां गॅदरिंगमध्यें जेवणास पंगत बसली होती. मुंबईचे एक प्रसिद्ध ब्यारिस्टर व इतर पुष्कळ प्रतिष्ठित पाहुणे मंडळी पंक्तीस होती. वृंदावन हुशार वक्ता व खटपटी म्हणून गॅदरिंगमध्यें पुढारी होता. अर्थात त्याचें पान प्रतिष्ठितांच्या पंक्तीस होतें. आपल्याकडील पद्धतीप्रमाणें, जेवतांना मुख्य पक्वान्न वाढण्यास आल्यावर आग्रहास सुरवात झाली. जेवणारांत कांहीं सुधारकही होते. पण अत्याग्रहाच्या हद्दीस सर्वत्र बळी पडलेले दिसले. प्रत्येकजण आपल्यास नको म्हणून इतरास आग्रह करीत होता. गरजेपेक्षां अधिक सर्वांसच खावें लागणार व वाढून न खालेलेंही पुष्कळच पानांत व्यर्थ जाणार हें उघड दिसत होतें. पण कोणासच यांत कांहीं वाटलें नाहीं. वृंदावनांचा चेहरा संतापानें लाल झाला. प्रसंग पाहून त्यानें राग आवरलाही. पण वाढणाऱ्या विद्यार्थ्यांनीं आतां त्यांसच आग्रह करण्यास सुरवात केली. त्यांनीं स्पष्ट नको म्हटलें. घालाल तर उठून

जाईन असेंही सांगितलें. तेव्हां सलगीच्या एका मित्रानें ' कसा जातोस पाहूं ' म्हणून जिलब्याची एक जुडी त्यांचे पानांत टाकलीच. त्यास संताप आला. त्यांचें डोकें बधिर झालें. ओंठ स्फुरण पावूं लागले व पानांत जुडी पडतांच पटदिशीं तें पान कांखेंत मारून त्यांनीं पंक्तींतून धूम ठोकली. खरोखर हसूं येण्यासारखा प्रसंग असूनही कोणास हसूं येईना, इतके जेवणारे व वाढणारे चकित झाले. जेवणें आटपून मंडळी पानसुपारीस बसली होती. तोंच वृंदावन पुन्हां तेथें आले व लिहून आणलेला जाहीरनामा त्यांनीं वाचून दाखविला. तो जाहीरनामा खालीलप्रमाणें होता.

" प्रियबंधुजन व गुरुजन—

अन्न परब्रम्हस्वरूप आहे. अन्न सर्वाधार आहे. अन्नानेंच सर्व जीवक्रिया प्रवृत्त होतात. अशा या श्रेष्ठ अन्नाचा आज आपण सर्वांनी उपमर्द केला. साक्षात् परमेश्वराचा हा अपमान आहे असें आपणास वाटत नाहीं काय ? ज्या दरिद्री देशांत चार कोटी लोक मीठभाकरीविना उपाशी मरतात तेथें आपण बहुमोल मिष्टान्नाचा जाणून बुजून नास करतों. कोण घातक विसंगतिही ! केवढें पाप हे ! पुष्कळ खर्च करून जें अन्न आपण हौसेनें तयार करतों तें खाण्याची आपली पद्धति अशी कीं पानावरून उठतांना त्याच सुग्रास अन्नाकडे पाहून किळस यावी ! कोण घाणेरी अभिरुचि ही ! जें मर्यादित खाल्लें असतां शरिरास पुष्टि देईल त्याचा अतिरेक करून आपण आपलें पवित्र आरोग्य बिघडवून आपलें शरीर अपवित्र करतों. हा अत्याचार व अनाचारही आहे. यांत मूर्खता व मालिन्यही आहे. पण याहूनही मोठा अनर्थ आपण घडवून आणतों. अति झाल्यामुळें विषसमान वाटून जें अन्न आपण पानांत ढिगाचे ढीग टाकतों तें मग व्यर्थ जाऊं नये म्हणून—तें उष्टें घाणेरें असतांही आपण अस्पृश्यांना घालतों. तें बिचारे आनंदानें खातांना दिसतातही. पण हें त्यास आपणच शिकविलें नाहीं काय ? विचार करा. गरजेहून अधिक पानांत घ्यायचेच नाहीं असा साधा, सोपा सरळ, सभ्य नियम रूढ असता तर किती अन्न वांचलें असते व चांगलें राहिलें असतें ! यातलें कांहीं मग अस्पृश्यांना घातलें असतें तर तें अधिक श्रेष्ठ दान ठरलें नसतें काय ? असें असतां पवित्र अन्नाचा

उपमर्द स्वतः करून उन्मत्तपणानें औदार्याच्या ऐटीनें आपण गरिबांना पशूंना अयोग्य, असें उष्टें घाणेरें खाण्याच्या सवयी लावून ठेवल्या आणि याचें आम्हांस कांहींही वाटलें नाहीं. आज पंक्तींतील झालेला प्रकार पाहून मला अत्यंत खेद झाला. या सर्व मंडळींत माझे सहाध्यायी, पूज्य गुरु व लोकमताचे पुढारी अशी मोठमोठीं माणसें—कीं ज्यांचें वर्तन समाजास आदर्शभूत वाटेल अशीं माणसें होतीं. मोठमोठ्या राजकीय सामाजिक घडा-मोडीवर ज्यांनीं विचार केला आहे अशा सर्वांनीं आज एका क्षुद्र पण अत्यंत पापी रूढीस बळी पडून आपआपल्यापरी पवित्र अन्नाचा संभावितपणें अत्याग्रह केला, करविला, करून घेतला, करूं दिला, दुर्लक्ष केलें. आणि सर्व महो-त्सवांत घडणाऱ्या या पापांत आपल्या हातांनीं भर घातली. बंधूहो, मी स्वतांस आपणापेक्षां श्रेष्ठ समजून आपणांस दोष लावूं इच्छितों असें नव्हें. मी आपल्यांतीलच आहे. माझ्या हातूनही अशा प्रकारचें दुबळें व निंद्य वर्तन घडलें असेल. पण कोणताही समाज हा त्या त्या समाजांतील घटकांनींच सुधारा-याचा असतो. त्याच न्यायानें मी ही आपणांस प्रेमाची हांक देत आहे. निंद्य हें केवळ रूढ म्हणून मान्य करणें म्हणजे स्वतांस निंद्यतर करून घेणें होय. आपण विचार करा आणि या निंद्य रूढीचा पुन्हां अवलंब होऊं नये याकरितां आचरणानें, उपदेशानें खटपट करा अशी माझी आपणांस नम्र विनंति आहे.

**वृंदावन वसंत गोखले** ''

वरील लेखनांत सत्य किती ओतप्रोत भरलें आहे व हा आणि असले कित्येक साधेच तरी जिव्हाळ्याचे प्रश्न आपण किती दुर्लक्षित करतां तें सुज्ञांस सांगणें नकोच. वृंदावनांच्या या जाहीरनाम्याची तेथेंच काय शोभा झाली पहा. प्रतिष्ठितांनीं उल्लू म्हणून त्यांस तिरस्कारिलें. ज्यांना वृंदावनांच्या प्रामा-णिकपणाविषयीं शंका नव्हती व जे त्यांचे स्नेही होते, ते मोठमोठ्यानें याच्या वेडास हंसूं लागले. एकानें गंभीरपणा पांघरून तो कागद त्यांचे-पासून मागून घेतला. मग एका काठीच्या टोकास तो टोंचून ती काठी त्यानें सर्वांस दिसेल अशी वर करून पुकारा करीत चोहोंकडे फिरविली. आणि शेवटीं शेषांतिषांनीं वृंदावनासमोर त्या कागदांतूनच धुम्रपान केलें. प्रामा-

णिक व तत्त्वनिष्ठ माणसाशीं वागण्याची समाजाची ही रीति प्रसिद्ध आहे. असो.

पण वृंदावनांनीं आपला तत्त्वनिष्ठ स्वभाव बदलला नाहीं. भावनावश हो ण्याचें दौर्बल्य मात्र यापुढें त्यांनीं जिंकलें. कोणत्याही कार्यास यानंतर ते खंबीर-पणें हात घालूं लागले.

विवेचक व तत्त्वनिष्ठ असून शिवाय ते चांगले मार्मिक रसज्ञ होते. पद्य-मय नाहीं तरी गद्य काव्य चांगले लिहीत. कालिदास, भवभूति, बाण तसेंच मिल्टन, शेक्सपीयर, बायरन वगैरे कवी त्यांचे आवडते होते. मेघदूत, इनॉक ऑर्डेन वगैरे काव्यें आळवून आळवुन ते गुणगुणत. अभिनयनिपुण तर ते होतेच. सारांश जगांत जें जें म्हणून उदात्त असून सुंदर, उदार असून भव्य असेल त्याबद्दल त्यांना आदर होता त्याची स्वदेशांत समृद्धि व्हावी यासाठीं स्वदेहार्पण करण्याचें त्यांनीं ठरविलें होतें.

× × × ×

अधिराज—युवराजांसुद्धां सर्व मंडळी वाड्यांत आली तों पानांची तयारी होतीच. सर्व मंडळींनीं कपडे काढून हातपाय धुतले. अधिराजांनीं आपल्यासमोर वृंदावनांचे पान मांडलें. रामशास्त्री, रत्नाकर व गंगाधर क्रमानें अधिराजांचे डावे बाजूस बसले. बलदेव स्वभावाचा एवढा उथळ कीं झालेला सर्व प्रकार त्याच्या मनावरून पार उडाला. तो हासूंखिदळूं लागला. हसन व दीक्षित यांसह आपण दिवाणखान्यांत जेवणार असाच त्यानें हट्ट घेतला. पुन्हा अधिराज संतापले. परक्या देखतही चिरंजीव आपली शोभा करतात याचा त्यांना खेद वाटला व कसें तरी करून बलदेवास त्यांनीं तेथें जेवणास ठेवून घेतलें. हसन व यज्ञेश्वर शेवटीं त्याजवळ बसलेच. जेवतांना कांहीं गंभीर विजय निघून वृंदावनांना संतोष व्हावा अशी अधिराजांना इच्छा झाली. आपल्या धर्माचें खरें स्वरूप काय व त्याची आजची स्थिती अशी कां झाली असा अधिराजांनीं वृंदावनांना प्रश्न केला. तेव्हां त्रैवर्णिक मुळचे कोण, त्यांचें चातुर्वर्ण्य कसें झालें व वर्णसंकर कसा व कां झाला, बौद्ध धर्म का पसरला शंकराचार्यांचें कार्य काय, वगैरे विवेचन करून वृंदावनांनीं, ' आपली समाजरचनेचीं तत्त्वें अत्यंत श्रेष्ठ असून सुद्धां आधिभौतिक सामर्थ्यांत मागें पडल्यामुळें आपला ऱ्हास झाला, व आधिभौतिक बलाची आपण वाढ

करूं तेव्हां आपलें आध्यात्मिक तेज शोभिवंत व प्रभावी ठरून आर्यांच्याच सामाजिक व आध्यात्मिक तत्त्वज्ञानानें अखेर जगांत समृद्धि, शांति व सुख, नांदेल, ' असा आपला सिद्धांत सांगितला.

बलदेव यावेळीं या गंभीर सृष्टींत नव्हता. आपल्या समशीलाशीं त्याचा हास्य-विनोद चालू होता. मध्येंच वृंदावनांचा एखादा गंभीर शब्द पकडून बलदेव आपल्या मित्रांजवळ त्याचा बाष्कळ परिच्छेद करी. अधिराजांनीं एक दोनदां हें पाहिल्यावर त्याला हिणवून म्हटलें " अरे एवढे विद्वान पाहुणे आज आपल्या कडे चालून आले आहेत त्यांचे चार शब्द श्रवण कर, तुझे शहाणे स्नेही रात्रं-दिवस तुजजवळ आहेतच" तें ऐकून बलदेव पुन्हां खालीं पाहून जेवूं लागला. बोलतां बोलतां, वृंदावनांनीं बलदेवाशीं संवाद करून त्यास चार उपदेशपर शब्द सांगावे, अशी अधिराजांनीं इच्छा दर्शविली. रत्नाकरांनींहीं आग्रह केला. तेव्हां भोजनोत्तर सर्व मंडळींची बैठक होऊन वादसंवाद व्हावा असें ठरलें.

भोजनोत्तर सर्व मंडळी दिवाणखान्यांत पानसुपारीस बसली. आतां वृंदावनांचा बलदेवाशीं संवाद व्हावयाचा होता. बलदेवास कांहीं हा प्रसंग नवा नव्हता. असे आजपर्यंत अनेक उपदेशक त्याचे समोर येऊन गेले होते; आणि आतां उपदेश व उपदेशक हा त्याच्या करमणुकीचा व उपहासाचा विषय झाला होता. वडिलांचा धाक त्याला फारसा वाटत नसे. तो एवढा मोठा झाला होता तरी वडील त्यास मारीत व शिव्यागाळी करीत. त्याला सुधारण्या-ची त्यांची रीति अशी होती. पण तो मात्र यामुळें निर्लज्ज व कोडगा बनला होता. वृंदावन आपल्याला उपदेश करणार याचें त्याला हसूं आलें, व दीक्षितांच्या साह्यानें वृंदावनांचीच उलट फजिती करण्याचा त्यानें निश्चय केला.

पानसुपारी घेऊन सर्व मंडळी बसल्यावर अधिराजांचे सूचनेवरून वृंदावनांनीं शांतपणें बोलण्यास सुरवात केली. ते म्हणाले—

"युवराज एवढ्या मोठ्या संस्थानचे आपण मालक होणार याबद्दल तुम्हांस अभिमान वाटत नाहीं काय?"

**यु.**—हो हो वाटतो तर! पण खरोखर मालक केंव्हां होईन तेव्हां खरा." दीक्षिताकडे पाहून त्यानें डोळे मिचकावले.

**वृं.**—पण राज्यपदाबरोबर येणारी पवित्र जबाबदारीही आपण ओळखताना?

**यु.**—हो; पण मग त्यांत अवघड तें काय ? राज्यकारभारावर देखरेख ठेवणं हीच ती जबाबदारी ना ?

**वृं.**—हो, शिवाय प्रजेचं न्यायानं पालन करणं.

**दी.**—पण जें राज्ययंत्र राजाच्या मदतीशिवाय चालतं तेंच चांगलं असतं असं आपण इंग्लंडच्या इतिहासांत वाचलं नाहीं काय ?

**वृं.**—पण तेथें राजा शहाण्या लोकांच्या हातीं राज्यसत्ता देऊन ठेवतो.

**यु.**—कशाचे शहाणे ? 'ब्रिटिश प्रधान मंडळाच्या मुत्सद्दीगीरीचें दिवाळें निघालें आहे' असे शब्द वर्तमानपत्रांत तर आम्ही नेहमीं ऐकतों. पण तें असो. दीक्षितांशीं या बाबतींत माझा मतभेद आहे. 'जॉर्ज, खराखुरा राजा हो. नांवाचा राजा नको होऊं ! तर स्वतः राज्य चालव' असा तिसऱ्या जॉर्जास त्याच्या आईनें उपदेश केलेला आहे. आपली आर्यपरंपरा अशीच असून या बाबतींत मी परंपराभिमानी आहे.

**दी.**—पहा पहा वा ! काय विद्वता आहे ! काय स्मरण आहे ! या स्वतंत्र विचारशक्तिचं मला कौतुक वाटतं. माझी सगळी विद्या आपणांस बहुतेक प्राप्त झालीशी दिसते. महाराज ! आपल्याहून माझं पण कांहीं भिन्न मत नाहीं.

**वृं.**—बरं, प्रजापालन हें मुख्य कर्तव्य तुम्हांस मान्य आहे तर !

**यु.**—हो हो जरूर ! राजाशिवाय प्रजा अनाथ आहे.

**वृं.**—बरं असं पहा—तुम्हांस आज सकाळचा प्रसंग आठवतो का ?

**यु.**—हो हो आठवतो. तुम्हीच मात्र आठवा आतां ! माझी उलट तपासणी चालविलीत होय ?

**अधिराज**—ए पशु, जरा ऐक.

**वृं.**—मी म्हणतों, प्रजापालनाचे दृष्टीनं ते जरा गैर झालं. प्रजाजनांतील एका अबलेवर तुम्ही नाहक हात टाकायला नको होता.

**यु.**—वाहवा ! आणि चार लोकांदेखत ती आम्हांला हंसली तें !

**वृं.**—पण म्हणून हात टाकणं ही फार अमर्यादा झाली. समाजामध्ये आपण ज्याला अपमान किंवा नुकसानही म्हणूं असे कांहीं प्रकार कांहीं मर्यादेपर्यंत सहन करण्यांत सौजन्य व न्याय असतो. कोणी कोणाकडे पाहिलं,

हंसलं किंवा बोट दाखविलं म्हणून कोर्टांत फिर्याद चालणार नाहीं व सज्जन करणारही नाहींत, किंवा प्रत्यक्ष प्रतिकारही करणार नाहींत.

**यु**.––मीच तुम्हांला एक प्रश्न विचारूं का ? ( अधिराज घाबरल्यासारखे दिसले. )

**वृं**.––हो, खुशाल.

**यु**.––कायहो, राजाचा कोणी अपमान करूं नये ना ?

**वृं**.––राजाचाच काय, पण कोणीही कोणाचा अपमान करूं नये. शत्रूचा सुद्धां एकवेळ निर्दयपणें सूड घ्यावा. पण अपमान करूं नये. अपराध्याला शिक्षा करावी पण त्याचाही अपमान करूं नये. अपमान ही शिक्षाही होत नाहीं. तें एकान्त निषिद्ध कर्म आहे. अपमानानें उभय पक्षांचा अधःपात होतो. पहिला उन्मत्त होतो व दुसरा दीन किंवा निर्लज्ज नाहीं तर क्रूर किंवा अविचारी होतो.

**यु**.—अबब एवढी लांबड कशाला ? त्या पोरीच्या बापानं–या रामशास्त्र्यानं आमच्या बाबासाहेबांचा तोंडावर अपमान केला होता, त्याचा मी आज संधि साधून सूड उगवणार होतों. बोला यावर काय म्हणणं आपलं ?

**अधि**.—हा मूर्खा, काय बडबडतोस हें ?

**यु**.—वाः ! बाबासाहेब, माझ्याकरितां आपण देवकीला मागणी घातली असतां हे तुमच्या तोंडावर काय म्हणाले आठवतं का ? मी आपल्या जागीं असतों तर—

**हसन** ( पुढें सरून )–मागणी न घालतांच—

**दी**.—ए गप्प, या पंडितांच्या सभेंत तूं बोलूं नको.

**रामशास्त्री**.—हो हो, मी पुन्हां सांगतों काय म्हणालों:तें. राजांचं लक्ष बाहेर असतं. मी राजघराण्यांत मुलगी देणार नाहीं. मी निःस्पृह ब्राम्हण आहे. सांगून ठेवतों कीं तशीच वेळ येईल तेव्हां रामशास्त्री प्रभुण्यासारखा एकदम चालता होईन—'शास्त्रीबुवा फारच संतापले. तेव्हां आणखी कांहीं आपत्ति येथेंच उद्भवेल म्हणून रत्नाकरांनीं त्यांस शांत केलें.

**वृं**.—पण स्वतांची मुलगी 'तुम्हांला देत नाहीं' म्हणण्याचा त्यांना हक्क आहे.

**यु**.—वाः ! जेव्हां तेव्हां प्रजा आपले हक्क पुढें करणार आणि आम्ही म्हणे

प्रजेचं पालन करावं. आम्हांला मुलगी दिली असती तर त्यांचं कल्याणच झालं असतं.

वृं.—पण त्यांना असं न वाटलं तर ?

यु.—त्यांच्या वाटण्याशीं आम्हांला काय करावयाचं ? राज्यांतील प्रत्येक वस्तु राजाच्या मालकीची असते. आम्हांला वाटल्यास ती आम्ही जबरदस्ती-नहीं घेऊं.

दी.—योग्य, अगदीं योग्य. राजा जसा भूपाल तसा भूपतिही आहे !

वृं.—सक्तीनं तुम्हांला घेतां येईल कीं नाहीं तें सध्यां राहो. पण धर्मपत्नी सक्तीनं घेऊन संसार सुखाचा होईल असं तुम्हांला वाटतं ?

यु.—हो हो ! सक्तीनं घेतली म्हणून बायको पुरुष होईल कीं काय ?

वृं.—छे: ! तुम्हांपुढं सभ्य युक्तिवादाची सोयच नाहीं. अहो अशा दंप-त्यांत प्रेम राहणार नाहीं असं माझं म्हणणं.

यु.—न रहायला काय झालं ! बायकांना पैसा नी चैन असली म्हणजे त्या खुष असतात !

वृं.—(एकीकडे गंगाधरास) या पशूशीं बोलूं काय हेंच कळेना ! खडकावर कांच आपटून तिची दशा होते तशी माझ्या बोलण्याची याच्यापुढं होत आहे !

हसन—बिनतोड ! खाशी !

वृं—युवराज, आपणाशीं गंभीर चर्चा व्यर्थ दिसते. पण दुसऱ्या कोण-त्याही तऱ्हेनं मला बोलतां येणार नाहीं. माझ्या दृष्टीनं विवाहसंस्थे-च्या उच्च ध्येयाचा हा उपमर्द आहे.

दी.—( व्यवस्थित आसन ठोकून ) जरा खुलासा कराल का ?

वृं.—अवश्य करीन. गांव, प्रांत, देश, खंड वगैरे भौगोलिक दृष्टीनं समा-जरचना केली काय, किंवा धंदा, वर्ण, वंश, जन्म अशा वर्गीकरणानें समाजरचना केली काय, किंवा नेहमीं सामान्यतः आढळणारी प-द्धति म्हणजे दोन्ही पद्धति मिश्र करून समाजरचना केली काय, सर्वत्र स-माजविभागाचे लहानांत लहान माप कुटुंब आहे. जात, वर्ण, संघ अथवा प्रांत, राष्ट्र, खंड हीं सर्व कुटुंबांचीच बनलेलीं असतात. कुटुंबें जिवंत असतील

तरच या सर्वांना अस्तित्व राहील व उपयोगी लावतां येईल. कुटुंब संस्था बिघडेल किंवा भंगेल तर जग म्हणजे रखरखीत उन्हाळा होईल. या समाजरचनांचे योगें कोणाही मनुष्यास जेवढें कौटुंबिक सौख्य मिळूं शकेल, त्या मानानेंच त्यास या रचना कमी अधिक उपयोगी वाटतील. अशा या सर्वाधार कुटुंबव्यवस्थेचा पत्नी हा आधार आहे. तिच्याच सुखांत, समाधानांत पुरुष कौटुंबिक सुख अनुभवूं शकेल. स्त्रियांना सुखी व संतुष्ट ठेवण्याची आवश्यकता कुटुंबव्यवस्थेनें निर्माण केली आणि विवाहामुळें कुटुंबव्यवस्था निर्माण झाली म्हणून विवाह हा अत्यंत पवित्र संस्कार मानला आहे व त्याचीही अधिष्ठात्री देवता पुन्हां पत्नीच आहे.

दी.—बापाच्या इस्टेटीचा वारस पुरुषांना कायदेशीर मिळावा आणि बायकांना सरेनं पोटाला मिळावं एवढं विवाहामुळं साधलं असं परवांच कोर्टात एका वकिलानं सांगितलं.

वृ.—होय तेंही खरं आहे. पण विवाहोपत्तीची ती फक्त आधिभौतिक दृष्टि आहे. विवाहसंस्था प्रथम सुरू झाली, तेव्हां मनुष्य प्रथम आधिभौतिक दृष्टीनं समाजाकडं पहात होता व समाजरचना करीत होता. पण मानसिक दृष्टि जसजशी मानवी समाजांत उदय पावूं लागली, तसतसे विवाहसंस्थेपासून मनुष्यास मानसिक फायदे दिसूं लागले. मग विवाहसंस्थेचे मानसिक सुख हें एकच नव्हे पण मुख्य साध्य असें मनुष्य समजूं लागला. समाजव्यवस्थेच्या बुडाशीं फक्त किंवा मुख्य आर्थिक दृष्टि असते व सर्वथा किंवा मुख्यतः कायद्यानेंच समाजव्यवस्था टिकते असें ज्या विद्वानांचें मत असतें ते विवाहसंस्थेकडे आधिभौतिक दृष्टीनेच पहात असतील. पण मानवी समाजाच्या आद्यावस्थेंत खरीच असणारी ही गोष्ट आज तितकी, तशीच खरी आहे असें मानणें युक्त नाहीं. कामक्रोधास वश होतील तर कोणत्याही भयंकर आपत्तीस शौर्यानें तोंड देतील, अशीं पराक्रमी माणसें कायद्यास व शिक्षेस भितात व यामुळें समाजव्यवस्थेस तीं विघ्नें आणीत नाहींत असें म्हणणें असमंजसपणाचें आहे. स्वतांचें शारीरिक सुख साधण्याकरितां एकमेकांचे गळे कापूं इच्छिणाऱ्या आद्य मानवांना जगण्याकरितां कायदा व शासन प्रथम अवश्य वाटलें असेल खरेंच. पण पुढें शारीरिकांपेक्षां मानसिक सुख श्रेष्ठ वाटूं लागलें असा काळ आला. माणसाची

अभिरुचि बदलली, हृदयांत अनुकंपा उदय पावली. दुसऱ्याच्या दुःखांपासून पूर्वी मनुष्यास सुख वाटे, पण आतां त्यास दुसऱ्याच्या सुखांतही—नव्हे सुखांतच अधिक श्रेष्ठ आनंद आहे असा अनुभव आला. शासनाच्या भीतीनेंच नव्हे तर व्यवस्थेच्या इच्छेनें मनुष्य कायदेशीर वागूं लागला. सौजन्याच्या प्रेमास्तव सज्जन सौजन्य आचरूं लागले, व कायद्याची मर्यादा त्यापासून फार दूर राहिली. आज कायद्याची अथवा सरकारची गरजच राहिली नाहीं असें मी म्हणत नाहीं. पण दुर्जनांनासुद्धां आतां सौजन्य पटतें. दुर्जन आपल्या असत्प्रवृत्तीशीं झगडून पराभव पावून दुर्जन झालेले असतात. अशा सदिच्छ दुर्जनांना असद्विकार जिंकण्यास अनुकूल भूमिका मिळवून देणें हें कायदा व शासन यांचें प्रमुख ध्येय आहे. कायदा व शासन यांचें ध्येयसुद्धां असें मानसिक आहे. विवाहित पतिपत्नी हीं कायद्यानें परस्परास जबाबदार असतात खरी, पण सुसंस्कृत समाजांत या कायद्याची कोणासही जाणीव नसते. पत्नी हें पतीस आपल्या इस्टेटीवर कायदेशीर ओझें वाटत नाहीं. ' सखी ' ' प्राणप्रिया ' ' हृदयदेवता ' वगैरे विवाहित पत्नींना पतींनीं लावलेलीं विशेषणें त्यांच्या अंतःकरणांतील तिजविषयींची त्यांची उच्च, सात्त्विक, निर्मळ व प्रेमळ भावना दर्शवितात.

केवळ कायद्याप्रमाणें केवळ अर्थशास्त्रही समाजाचें नियन्तें आहे हें खरें नव्हे. मनुष्य केवळ अर्थाकांक्षी असेल तर विवाह त्याला नकोसाच वाटेल. विवाह न करतां वाममार्गानें विषयसुख मिळवून स्वतंत्र व बेजबाबदार राहणें त्यास बरें वाटेल. विवाह करण्यासंबंधीं मग सक्तीचे कायदे करावे लागतील. पण तसें होत नाहीं. प्रत्येक मनुष्यास जीविताच्या सामान्य गरजा भागविण्यापुरती अर्थानुकूलता जशी हवीच असते, तशीच तेवढी मिळाली कीं मग प्रेम या हृदयस्थ भावनेची त्यास शांति करावीशी वाटते. आपणास आपलें म्हणणारें कोणीतरी असावें, आपणाकरितां कोणी तरी झटावें, व आपणही कोणाकरितां झटावें असें माणूस इच्छितो. आनंदप्रसंगीं आनंदेल व दुःखप्रसंगीं अश्रु गाळील असें सत्तेचें मनुष्य त्यास हवें असतें. त्याकरितां स्वार्थत्याग करण्यांत तो आनंद मानतो. अंतःकरणांतील या वासनांना वाव देणें हा विवाह संस्थेचा महोत्तम उपयोग आहे. केवळ विषयभोगाकरितांच

पुरुषास पत्नी हवी असते असें कृपा करून समजूं सका. पुरुषवर्गाला स्त्रीवर्गा-बद्दल व स्त्रीवर्गाला पुरुषवर्गाबद्दल कांहीं तरी गुप्त आकर्षण आहे. प्रत्येकास दुसऱ्या वर्गातील एखादी व्यक्ति शरीरानेंच नव्हे तर मनानें एकजीव झालेली असावी असें भावनेनेंच वाटत असते "

बलदेव जांभया देऊं लागला. हसन तर मागें तक्यार्शी घोरूंही लागला होता. दीक्षित या गंभीर प्रवचनास गालांतल्या गालां। उपहासानें हंसत होता. अधिराज, वृंदावनांचें तें अस्खलित वक्तृत्व, भारदस्त भाषा, विषयगांभीर्य पाहून थक्क झाले. रामशास्त्री व रत्नाकर आनंदानें माना डोलवीत होते. बलदेवासारख्या पशूपुढें गीता पढली जात आहे हें पाहून गंगाधर खिन्न झाला.

वृंदावन थांबल्यावर दीक्षित विकट हास्य करून म्हणाले " तुम्हीं तर आम्हांला आज व्याख्यानच चारलं !

**वृं.**—तुम्हाला कंटाळा आला असेल तेव्हांच सांगितलं असतं तर मी थांबलों असतों !

**यु.** – बाकी बाबासाहेबांनीं तुम्हांला आमच्याकरितां खूप तसदी दिली या बद्दल मला वाईट वाटतं.

**अधिराज**—त्या मूर्खाचं कांहीं ऐकूं नका. माझ्या मागं हा राज्यावर गोव-ऱ्या ठेवणार आहे. दुर्दैव त्याचं ! त्याचं नशीब त्याच्या बरोबर ! त्याला मी कुठवर पुरणार ! आपण आज आमच्या इथं आलांत मला फार आनंद झाला. असाच लोभ ठेवून वरचेवर येत चला......"

वगैरे बोलून अधिराजांनीं वृंदावनास गौरविलें. निरोप देतांना अधिराजांनीं वृंदावनास मूल्यवान पोषाख व देणगी देऊन त्यांचा सत्कार केला. औपचा-रिक नमस्कार वगैरे करून गंगाधर व वृंदावन यांसह रत्नाकरपंत घरीं आले. वृंदावन पुढें आणखी चार दिवस रत्नाकरांकडे राहिले. या चार दिवसांत अधिराजांनीं त्यांस दोनदां भेटीस व फराळास बोलाविलें व घडलेल्या प्रका-राचा वर्तमानपत्रांत किंवा खाजगीही रीतीनें बभ्रा करणार नाहीं असें त्याज-कडून अभिवचन मिळविलें. वृंदावनांनीं गांवांत वर्तमानपत्रास कांहीं वर्गणी-दार व आश्रयदाते मिळविलें. गांवांत इतरत्र पुष्कळ पाहुणचारही त्यांस मि-ळाला व नंतर सर्व मंडळींचा निरोप घेऊन ते अहिल्यापुरीहून पुण्यास परत गेले.

: ५ :

रत्नाकर सोमण हे अहिल्यापुरींतील फार प्रसिद्ध सावकार. यांचे मळे शेतवाड्या वगैरे पुष्कळच होत्या. पण त्यांजजवळ सोनें व जड जवाहीर-ही बरेंच असल्याची वदंता होती. एकंदरीनें ही सहासात लाखांची आसामी असावी असें लोक बोलत. बहुतेक श्रीमंत लोक त्या पदाप्रत कसे चढले याचा तपशील अज्ञात व दुर्ज्ञेयच असतो. कोणाही श्रीमंताची श्रीमंती ही कायमची सिद्ध गोष्ट मानली जाऊन तिची विचिकित्सा करण्यापेक्षां तिचा व्यावहारिक उपयोग करून घेण्याचा पोक्त विचारच सामान्य व विशेष माणसें करीत असतात. नीति-अनीतीच्या व न्यायअन्यायाच्या मानवी व्यवहारांना मनुष्यांच्या या दूरदर्शी व सहिष्णु धोरणामुळें सौकर्य आलें आहे. व्यवहारांत न्यायनीति श्रेष्ठ कीं सौकर्य श्रेष्ठ हा तात्त्विक दृष्ट्या भानगडीचा प्रश्न आहे. सौकर्याकडे मनुष्याचा ओढा अधिक आहे एवढें बरीक खरें. असो. रत्नाकरांच्या अज्ञातमूल संपत्तीचा उगम नदीच्या अथवा ऋषीच्या उगमाप्रमाणें शोधून काढण्याचा कोणी कधीं प्रयत्न केला नाहीं. कोणत्याही मोठ्या शहरांत सुद्धां अगदीं रेखीव सरळ रस्ते कधींच नसतात. तसेच रत्नाकरांचे व्यवहारही अगदींच सरळ कधीं नसत. निवळ रस्ते सरळ ठेवण्याच्या दृष्टीनें गांवांची आंखणी करणें जसें वेडेपणाचें होईल तसेच निवळ सरळपणाच्या दृष्टीनेंच व्यवहार आखणें मूर्खपणाचें आहे असें रत्नाकर समजत. ते नेहमीं आपल्या पेढीवर बसून सावकारी व्यवहाराची उलाढाल करीत. हजारों लोक यांचे ऋणको होते. व्याज किंवा मुद्दलाचा तगादा ते कुळास

कधींच करीत नसत. ५।१० रुपयाकरितांही ते हजारपांचशेंची जमीन तारण घेत. पण ' माल तारण झाला तरी तो फक्त कागदांतच. वापर कुळाकडेच राहणार. पुन्हां नडसड आल्यास त्याचं तारणावर रक्कम मिळूं शकते ' हा त्यांचा कुळास नेहमींचा युक्तिवाद असे व कुळासही इस्टेट मोडून खावी न लागतां परभारें खर्चाची सोय झाली यांतच आनंद वाटे. पण मग पुढें धरणाच्या बांधांत पडलेली अदृश्य भेग ज्याप्रमाणें क्षणोक्षणीं बांधाची शक्ति अदृश्यपणें क्षीण करीत असते, भक्कम तटाच्या पायांत शिरलेली घूस जशी मुकाट्यानें तटास आंतून पोकळ करीत असते अथवा पुरलेल्या सुरुंगाची दूर ठेवलेली वात जशी हळूहळू पेटत चाललेली असते, त्याप्रमाणें तारणाच्या पोटांत शिरलेलें हें कर्जाचें पिलूं, वाढतें व्याज व वाढतें मुद्दल यांनीं सावकाशपणें तारणास तासून तासून शेवटीं सर्व सावकाराच्या घरांत नेऊन भरे. सावकाराच्या संपत्तीची नियमित प्रगति व कुळाच्या संपत्तीची नियमित अधोगति इतकी संथ व सूक्ष्म असे कीं आपली संपत्ति वाढत आहे असें रत्नाकरास किंवा कमी होत आहे असें कुळास कोणत्याही एका वेळीं लक्षांत आलें नाहीं. यामुळें कोणा कुळांत रत्नाकराविषयीं वैरभाव नव्हता. इतकेंच नाहीं तर सर्व इस्टेट रत्नाकराच्या घरीं पोंचवूनही, अडीअडचणींचा निर्वाहक, गरीबांचा पोशिंदा असा त्यांचा लौकिक कुळें गात व अर्थात अन्यायाची जाणीव, त्याची रुखरुख किंवा तज्जन्य नैतिक बेपर्वाईही रत्नाकरांत कधींच उत्पन्न झाली नाहींत. जवाहिरांच्या देवघेवींत रत्नाकर पुष्कळ वेळां लबाड्या करीत. पण एकंदर व्यवहाराचें स्वरूप तसेंच असल्यामुळें उष्ण कटिबंधांत भूपृष्ठावर किंवा जलपृष्ठावर जसा बर्फाचा डोंगर टिकूं शकत नाहीं तसेंच व्यवहारांत सौजन्य एकानें राखून राहणार नाहीं असें ते म्हणत.

पण धंद्याच्या बाबतींत ते कसेही असले तरी खाजगी व्यवहारांत ते फार सज्जन व उदार असत. त्यांनीं आजन्म एकपत्नीव्रत कडकडीतपणें पाळलें होतें. ते शरीरानें मजबूत, काटक, व मनानें शांत, गंभीर, निश्चयी आणि विचारी होते. अंतःकरणाचे ते दयाळू व उदार होते. पुष्कळ गरीब विद्यार्थ्यांस ते मदत करीत. दारीं आलेला अतिथि नकार देऊन त्यांनीं कधीं विन्मुख दवडला नाहीं. त्यांच्या या लौकिकाचा कोणी गैरफायदाही घेत. पण हें कळूनही त्यांनीं

आपलें औदार्य आवरलें नाहीं. श्रीमंत यापेक्षां उदार ही कीर्ति त्यांना अधिक प्रिय असे. ते गौरीशंकराचे उपासक होते. रोज गंगेचें स्नान करून व गंगेतील मृत्तिकेचा रोज नवा पार्थिव करून त्याची पूजा व विसर्जन झाल्यावर मग ते अन्नग्रहण करीत. यांत कधींही चूक घडत नसे.

भर्त्यापेक्षां सद्गुणांत कांकणभर चढच अशा त्यांच्या पत्नीचें नांव सगुणाबाई. यांना लहानपणी थोडें लिहितां वाचतां येत असे. पुढें त्यांनीं वाचनाची गोडी लावून घेतली. स्वतः रत्नाकरांना वाङ्मयसेवेस कधीं फुरसत नसे. तरी त्यांनीं सगुणाबाईस त्या कामीं चांगलें उत्तेजन दिलें. त्यांनीं संतवाङ्मय रामायण महाभारताच्या मराठी कथा, व कांहीं आधुनिक विचारही वाचले होते. स्वतःस समजलेला विषय त्या फार चांगला समजून सांगत.

या संपन्न व सुशील दंपत्त्यास दोन पुत्र होते. पहिला पुत्र गौरीशंकराचा प्रसाद म्हणूनच त्याचें नांव गंगाधर ठेविलें होतें. गंगाधर लहानपणापासून मोठा बुद्धिवान्, तडफदार व सद्गुणी होता. इंग्रजी ५-६ इयत्तांचें शिक्षण झाल्यावर त्याचें पुढील शिक्षण पुण्यास झालें. तो बलदेवाचा समवयी व सहाध्यायीही होता. पण वर्गात दोघांनीं दोन टोकांचे नंबर मिळविले होते. वृंदावन अहिल्यापुरीस आले, त्यावेळीं गंगाधर नुकताच बी. ए. होऊन घरीं आला होता.

दुसरा पुत्र प्रभाकर हा गंगाधराहून ४।५ वर्षांनीं लहान होता. हा गंगाधराहूनही रूपसुंदर व बुद्धिवान दिसे. तीन वर्षांचा असतांना याच्या डोक्यांत शिखास्थलीं एक खांडुक झालें. पहिल्यानें त्याकडे कोणी विशेष लक्ष दिलें नाहीं. कांहीं दिवसांनीं त्यांत कंड सुटूं लागली. रात्रंदिवस मूल एकसारखें डोकें नखांनीं ओरखाडी, म्हणून डॉक्टरला दाखविलें. डॉक्टरनीं उकलून पाहतांच डोकें आळयांनीं बुजबुजलेलें दिसलें. पुढें ऑपरेशन करण्यांत आले, तेव्हां डोक्यांतून आळयांचे पुंजकेचे पुंजके निघाले. मेंदूतील किड्यांचें हें दुखणें बरेंच असाध्य असें डॉक्टरांचें मत पडलें. तीन महिने प्रभाकर अगदीं मरणाच्या दारीं पडला होता. पण त्यांतून, पुढें अद्‌भुत चरित्र करून दाखविणारें हें बालक वडील मातोश्रींच्या पुण्याईनें शाबूद निभावलें. यास पुढें नेहमींच जपलें पाहिजे, याच्या मेंदूवर या दुखण्याचा थोडासा कायम परिणाम

राहील असा डॉक्टरांनीं सल्ला दिला होता. पण जपण्याची निश्चित दिशा कोणती किंवा कायम परिणाम राहील तो कोणत्या प्रकारचा, याची नक्की कल्पना त्यांनाही सांगतां आली नसावी. निदान त्यांनीं सांगितली नाहीं एवढें खरें.

मोठ्या जिवावरच्या दुखण्यांतून वांचला म्हणून प्रभाकर मातापितरांच्या सर्व प्रेमाचा एकच एक विषय होऊन बसला. गंगाधराचेंही त्याच्यावर तसेंच प्रेम असल्यामुळें हेव्यादेव्यास मुळींच जागा नव्हती. मातापितरें किंवा भाऊ त्यास आतां क्षणमात्र विसंबत नसत. दुखण्याचा डॉक्टरांनीं सांगितलेला कोणता विशेष परिणाम त्याच्या प्रकृतींत पुढें राहिला, हें नक्की माहीत नाहीं. पण त्याचा स्वभाव थोडा तऱ्हेवाईक असल्याचें हळू हळू दृष्टोत्पत्तीस येऊं लागलें. तो खेळतां खेळतां हातांतलें खेळणें टाकून एखाद्या वस्तूकडे बराच वेळ एकसारखा पहात राही. बिनविचाराच्या पोरवयांतही तो विचारमग्न होई. तो क्षुल्लक गोष्टीवरूनही रागावे. रागावे तेव्हां रडत नसे ओरडत नसे. तर आंतल्याआंत तप्त होई. डोळे तोंड लाल होऊन कोंडलेल्या संतापानें ओठ थरारूं लागत. विकार असह्य झाला म्हणजे तो मुकाट्यानें आईच्या मांडीवर जाऊन तळमळत पडे व कांहीं वेळानें झोपीं जाई. मोकळेपणानें आनंदांत कधीं कधीं खेळे. पण मध्येंच खिन्न होई व पुन्हां आईकडे धांवे. त्याची आई हें त्याचें नेहमींचें विश्रामधाम असे. लहानपणीं समजूं लागल्यापासूनच चार मंडळींत जाणें त्याला नको असे. एकांतांत असतां तो शांत व गंभीर असे. मध्येंच आपल्याशींच हंसे. सहावे वर्षीं त्यास शाळेंत घातलें. अभ्यासांत त्याची तरतरी अगदीं असामान्य होती. याच्या डोक्यास शीण न व्हावा म्हणून यास विद्याभ्यासाचा कांच लावायचा नाहीं असें रत्नाकरांनीं ठरविलें होतें. पण जो असेल तो अभ्यास तो केव्हांच उरकून टाकी. शाळेंत सुद्धां उल्लसित किंवा खेळीमेळींत कधीं नसे. गंगाधरावर त्याचें फार प्रेम! वडिलांवरही त्याची निष्ठा होती. पण आई, बाप व भाऊ यांखेरीज त्याचें मन कोणी वश करूं शकलें नाहीं. तरी तो सर्वांपुढें अतिशय आज्ञाधारक असे. कोणी कांहींही काम सांगितलें तरी तो मुकाट्यानें करी. जसा क्षुल्लक कारणावरूनही रागावे तसा पण सामान्यतः दुसऱ्याचे तंत्रानेच चाले. बैस म्हटलें तेथें बसावें, खा म्हणतील तें खावें, नीज म्हटलें कीं निजावें असा लहानपणापासून

त्याचा सर्व परेच्छ व्यवहार होता. नववे वर्षी त्याची मुंज करण्यांत आली. त्याच्यांत आनंदीवृत्ति यावी म्हणून त्यास ईश्वरभजनाचा नाद लावण्याचा रत्नाकरांनीं प्रयत्न केला. ते व सगुणाबाई त्यास पुराणांतील देवादिकांच्या गोष्टी चांगल्या समजावून सांगत. त्याची त्याला विलक्षण गोडी लागली. ईश्वराची आपण भक्ति करावी, तोच भक्तांचा तारक आहे हें वडीलांनीं अनेक वेळा सांगितलेलें वाक्य त्याचे मनावर इतकें ठसलें कीं, आतां तो दिवसाचा व रात्रीचा पुष्कळ वेळ ईश्वरभजनांत घालवूं लागला. शाळेंतला अभ्यास त्याला तळहाताचा मळ असे. तो सहज नेहमीं पहिला असे. शाळेचा वेळ खेरीज करून बाकीचा सर्व वेळ तो आतां ईश्वरभजनांत घालवी. देव्हाऱ्यांतील एक गणपति त्यानें स्वतांकरितां वेगळा मागून घेतला होता. त्याची तो रोज षोडशोपचारें पूजा करी. आरती धूपारती करी. गांवांत कोठें कथाकीर्तन असलें कीं ही स्वारी तेथें जाऊन पहिल्यापासून अखेरपर्यंत सर्व कांहीं लक्षपूर्वक ऐकायचीच. बारावे वर्षी त्यास स्थूल मानानें रामायण महाभारतांतील कथा उपकथा पाठ झाल्या होत्या. इसापनीति व हितोपदेश यांचीं भाषांतरेंही त्यानें वाचून काढलीं. सर्व व्यवसायांत ईश्वरभक्ति, ईश्वरगुणगान व सद्गुणांची निवड याकडेच त्याची दृष्टि असे. याचकास दान, सत्यनिष्ठा, दुसऱ्याशीं सौजन्य, एकांतप्रियता व गूढविक्रिया हे गुण १२।१३ व्या वर्षांपासून तो प्रकट करूं लागला. तो अंतःकरणाचा फार दयाळू होता. दुसऱ्याचें दुःख पाहून त्यास अतिशय शोक होई. त्याचें निवारण करण्याकरितां तो आपल्या कल्पनेप्रमाणे आपण होऊन झटे. या सर्व सद्गुणांचें बीज असें असावेंसें वाटें कीं, सद्वर्तनाचें कोणतेंही एखादें सूत्रवाक्य सांगितलें कीं तें तो शब्दशः पाठ करी, अर्थ समजून घेई व मग त्याच्या मनावर त्याचा इतका खोल ठसा उमटे कीं तो तदाकार होई. ईश्वरावर प्रेम करून त्याची भक्ति करावी, गरीबांस दानधर्म करावा, दुःखितांचें दुःख हरण करावें, अभ्यास झटून करावा, सत्यच बोलावें, वगैरे सूत्रवाक्यें त्याला पाठ असून त्याच्या वर्तनांत हरघडी अमलांत आलेलीं दिसत. ईश्वरभक्तीसाठीं मनोनिग्रह केला पाहिजे असें त्याच्या वडिलांनीं त्यास एकदां सांगितलें. त्यानें 'याचा अर्थ काय?' म्हणून विचारतां, पहाटें नित्यनियमित उठणें, सोसल्यास गंगास्नान करून

ईश्वरसेवा करणें व सर्व गोष्टींचें वेळापत्रक प्रथम करून त्याप्रमाणें वागणें इत्यादि तपशील वडिलांनीं त्यास सांगितला. त्याबरोबर तो पहाटे लवकर उठून वडिलांबरोबर गंगेस जाऊं लागला. भर थंडींत सुद्धां तो कधीं चुकला नाहीं. आळस किंवा कंटाळा हा त्याच्या स्वभावकोशांत नव्हताच विश्रांति घेणेंही त्याचें लक्षांत येत नसे. यामुळे प्रकृतीस अपाय होई. पण केव्हां तो आजारी पडलाच तर निश्चयाच्या—मनोनिग्रहाच्या अतिरेकानें पडे. आळसानें किंवा अव्यवस्थेनें त्यानें स्वतांस कधीं अपाय करून घेतला नाहीं तो सामान्यतः एकांतप्रिय होता, रिकाम्या चकाट्या पिटणें त्याला आवडत नसे. पण तो तमाच कर्तृत्वानही होता. शाळेंत दहा जणांनीं करण्याचें एखादें काम उरकण्याचें याच्या शिस्तशीर स्वभावामुळे याच्याचकडे येई व त्यांत तो इतरांपेक्षां हटकून श्रेष्ठ ठरे. शाळांतील विद्यार्थ्यांमध्यें तट पडून मारामाऱ्या होत त्यांत स्वपक्षांत सामील होऊन तो मोठ्या आवेशानें लढे व भांडण मिटतांच त्याचें वैर लगेच शांत होई.

वृंदावन अहिल्यापुरीस आले त्यावेळीं रत्नाकरांचे घरीं त्यांचा सात आठ दिवस मुक्काम होता. या मुक्कामांत प्रभाकराकडे त्यांचें लक्ष बरेंच वेधलें. त्याची नेहमीची तेजस्वी पण गूढ चर्या, तापसी राहणी, विलक्षण बुद्धिमत्ता हें सर्व पाहून त्यांना अचंबा वाटला. आश्चर्याची गोष्ट अशी की आई, बाप किंवा भाऊ याखेरीज कोणावरही प्रेम न करणाऱ्या प्रभाकरास वृंदावन मात्र फारच आवडूं लागले. आठ नऊ दिवस वृंदावनांचे कामाच्या गर्दीत गेले. तरी मुद्दाम वेळ काढून वृंदावन प्रभाकराशीं बोलत. योग्य जोपासना व उत्तेजन मिळालें असतां जोरानें फोफावूं शकेल असा सत्पुरुषत्वाचा अदृश्य अंकुर याचे ठिकाणीं आहे अशी त्यांची एकाएकीं दृढ भावना झाली. प्रभाकर या वेळीं इंग्रजी सहाव्या इयत्तेंत असून सुमारें सोळा वर्षांचा होता. पुढील वर्षी मॅट्रिक झाल्यावर प्रभाकरास पुण्यास ठेवायचें तेव्हां वृंदावनांनीं त्याची सर्व व्यवस्था पहावी असें वृंदावन व रत्नाकर यांनीं आपसांत ठरविलें. अहिल्यापुरीहून वृंदावन पुण्यास गेले, पण प्रभाकरासंबंधीं त्यांच्या मनास चटका लागून राहिला असावा. ते पुण्यास गेल्यावर सुखरूप पोंचल्याचें त्यांचें गंगाधरास पत्र आलें. पाकिटांत एका वेगळ्या कागदावर प्रभाकराकरितां स्वतंत्र मजकूर होता. तो असाः—

" चि. प्रभाकर यांस आ. वि.—

" तुझ्या गांवाहून आल्यापासून तुजबद्दल मला कांहीं अवर्णनीय आपलेपणा वाटूं लागला आहे. मला असें कां वाटतें हें नक्की समजत नाहीं. " व्यतिषजति पदार्थानांतर कोऽपि हेतुः । न खलु बहिरुपाधीन् प्रीतयः संश्रयन्ते ॥ " हें वचन तुझ्या वाचनांत आलेंच असेल. तुजबद्दल मला वाटणाऱ्या भावनेचा याखेरीज दुसरा कांहींही खुलासा करतां येणार नाहीं. तुला दुसऱ्याशीं फारसें बोलावें, खेळावें, मौज करावी हें आवडत नाहीं याचें मला वाईट वाटतें. तूं चार मंडळींत मिसळावें, खेळीमेळीनें राहावें अशी माझी फार इच्छा आहे. तुझ्या मनांत नेहमीं कांहीं तरी बोलायचें असावें असें वाटतें. पण नेहऱ्यावर कांहीं विचार उमटतात व नाहींसे होतात. मी म्हणतों कीं यापुढें तूं निदान माझ्याशीं मोकळेपणानें बोलावें. यापुढे दर महिन्यास तूं मला एक पत्र घालीत जा; व अगदीं निःसंकोच हवें तें व हवे तितकें लिहीत जा. ज्या गूढ विचारास व्यक्त होण्यास प्रथम वाव सांपडत नाहीं ते विचार आंतल्या आंत खुरटून नाश पावतात. लहानपणीं बुद्धिमत्तेचीं सुलक्षणें दाखविणारीं मुलें योग्य वाव न मिळाल्यामुळें मोठेपणीं अगदीं किरकोळ निघालेलीं पुष्कळ आढळतात. तसें तुझें न व्हावें असें मी मनापासून इच्छितों. क. लो. अ.

तुझा स्नेहाकांक्षी **वृंदावन.** "

या पत्रास प्रभाकरानें खालील उत्तर पाठविलें.

" गुरुवर्य वृंदावन यांस, सा. न. वि. वि.

तुम्हांस मजबद्दल जसें वाटलें तसेंच मलाही तुम्हांबद्दल वाटलें. आई, बाबा व दादा याखेरीज मला कोणी आवडत नसे. पण त्यांच्याप्रमाणे मला आता तुम्हींही आवडूं लागलां. चार मंडळींत मिसळण्यासंबंधीं तुम्हीं मला लिहिलें. पण लोक जें करतात तें मला आवडत नाहीं. तुम्हीं मोकळेपणें बोल म्हणता. तर मला काय वाटत असतें तें तुम्हांस खरें खरें सांगतों. मला मी कुणी तरी मोठा होईन असें वाटतें. मी शिवाजीचें चरित्र वाचलें तेव्हां मला फार आनंद झाला. त्याप्रमाणें पुष्कळ माणसें गोळा करून त्यांचा मी पुढारी झालों आहे अशी मी कल्पना करीत असतों. मागें टिळक तुरुंगांतून सुटून आलेले मी ऐकिलें; त्यांचा सन्मान झाला तसा माझा होत आहे अशी मी क-

ल्पना करीत असतों. अशा मोठमोठ्या व भव्य कल्पनांखेरीज मला कांहींच आवडत नाहीं. मी हें बोलूं लागलों तर लोक माझी थट्टा करतील म्हणून मी हें कोणास सांगत नाहीं. तुम्हास मी आणखीही सांगतों कीं परवां माझ्या पूजेचा गजानन माझ्याशीं स्वप्नांत बोलत होता 'तूं शिवाजी होशील' असें तो मला म्हणाला. तेव्हां मला फार आनंद झाला—

"मी त्याचे पायावर डोई ठेवून नमस्कार केला. त्यानें माझ्या डोक्यावर हात ठेवला. त्या स्पर्शानें मी जागा झालों, तों दादा उशाशीं बसला होता. मी त्यास ही गोष्ट सांगितली तेव्हां त्यानें माझी थट्टाच केली. मला रडूं आलें, तें आवरून मी देवघरांत गजाननाजवळ जाऊन बसलों. मी संकष्टीस दिवसा निर्जळी उपास करीत असून रात्रीं अथर्वशीर्षाची एकादशणी करतों. पत्र फार लांबलें. तुमचा महत्वाचा वेळ दवडेल. ती. सौ. अन्नपूर्णाकाकूंस नमस्कार क. हे वि. आपला नम्र **प्रभाकर**"

वरील पत्रास कांहीं दिवसांनीं वृंदावनांचे खालील उत्तर आलें.

"चि. प्रभाकर यांस आ वि.—

तूं माझ्या नांवास गुरुवर्य हें पूर्वपद लावून जो माझा बहुमान केलास त्याबद्दल मला अभिमान वाटतो. खरोखरच तूं मला गुरु समजत असशील तर शिकविण्याइतकें आनंददायक मला दुसरें कांहींच नाहीं. विद्येचा खरा आनंद ती देण्यानेंच अनुभवितां येतो. ती सच्छिष्यास देण्यानें तर हा आनंद अधिकच दुणावतो. तूं स्वप्नांच्या पुढील आयुष्यासंबंधी जीं चित्रें मनापुढें रेखाटीत आहेस त्याबद्दल इतर लोक तुझी थट्टा करितील हें शक्य आहे. पण मी तसें करणार नाहीं. शिवाजी किंवा टिळक हीं फारच मोठीं माणसें आहेत. तरीही तसें होऊं इच्छिणें यांत हास्यास्पद कांहींच नाहीं. तूं शिवाजी न होशील किंवा होशीलही; पण शिवाजी व्हावयाचें असेल तर काम करायला हवें हें मी तुला सांगतों. कोणतीही चांगली वस्तु मिळवायची असली तरी कष्ट मनस्वी करावे लागतात हें तुला माहीत असेल. शिवाजीची कीर्ति मिळविण्यास शिवाजीचे गुण तुला तुझ्या अंगीं आणले पाहिजेत. पहा कीं, शिवाजी केवढा त्यागी होता. विजापूरकरांच्याकडे मोठी नोकरी मिळाली असतां ती सोडून तो रानावनांतून हिंडला. अडाणी लोकांचा जमाव करून व

त्यांच्यांत मिसळून त्यांच्या बरोबरीनें त्यानें शेकडोंदा आपला जीव संकटांत घातला, व अनेक हालअपेष्टा सोसल्या; तेव्हांच तो मोठा झाला. त्याचा स्वार्थत्याग, त्याचें धाडस आणि निर्लोभता व ध्येयनिष्ठा हीं आपण मिळवावीं तेव्हांच शिवाजी होण्याची शक्यता. लोकमान्य टिळकांनींसुद्धां सरकारी नोकरीचा गोड घास न मागतां खडतर लोकसेवाच पत्करली. ते तीनदां तुरुंगांत गेले. मोठें कीर्तिमान होण्याची इच्छा चांगली, पण ती करणारानें श्रीमंत किंवा सुखी होण्याचा नाद सोडून देऊन हाल सोसून सन्मार्गाचा ध्यास घ्यावा व संकटांत धैर्यानें उडी घालून पराक्रम करावा. तूं विद्याभ्यास झटून कर आणि स्वार्थत्यागपूर्वक देशसेवा करण्याचा निश्चय कर. ईश्वर तुला खचित मोठें करील. सर्व मंडळीस नमस्कार.

तुझा स्नेहाकांक्षी **वृंदावन**"

प्रभाकरास वरील पत्रानें अगदींच भारून टाकलें. तो तें पत्र पुनः पुनः वाची. लवकरच तें समग्र पत्र त्यानें तोंडपाठ केलें. स्वार्थत्याग, धाडस वगैरे शब्द तो मनांत घोळवूं लागला. आपण खरेंच मोठें होऊं असें त्यास वाटलें. तो अधिकच गूढ होऊं लागला. व्यवहाराबद्दलची त्याची विरक्ति आतां अधिकच वाढली. आईबापांवरील त्याची प्रीति कमी झाली असें नव्हे, तरी पण आतां सर्वांपेक्षां तो गजाननासमीपच अधिक बसूं लागला. तेथेंच त्यानें आपलें अंथरूणही नेऊन ठेविलें. वडिलांस हें सर्व असेच्या असें आवडे, असें नाहीं. तरी पण तेही ईश्वरपरायण असल्यानें व शाळेंतील अभ्यासांत प्रभाकर कधींच मागें नसल्यामुळें त्यांनीं त्यास कधींही दुखविलें नाहीं. शाळेच्या पुस्तकालयांत असलेलीं वीररसाचीं सर्व कथानकें त्यानें वाचून काढिलीं. मॅझिनी, गॅरीबाल्डी, जॉर्ज वॉशिंग्टन वगैरे वीरांचे इतिहास त्यास फार आवडले. हातीं धरलेलें पुस्तक समजो, न समजो, तो तें कडेला लावी. टिळकांचीं गेलीं आठ वर्षें हें पुस्तक त्यानें वाचलें व केवळ टिळकांच्या प्रेमास्तव ९०० पानांचें गीतारहस्य कांहींही न समजलें तरी त्यानें शब्दशः सर्व वाचून काढलें. मॅझिनीचीं अद्भुत कृत्यें त्यास फार आवडलीं. सावरकरांच्या पराक्रमानें तर तो तल्लीन झाला. या सर्वांचीं चरित्रें मनावर घोळणें यांतच त्यास आतां आनंद वाटूं लागला.

वृंदावनांच्या मागील पत्रानंतर लिहिण्यासारखें कांहीं नव्हतें म्हणून प्रभाकरानें अलीकडे त्यांना कांहींच लिहिलें नव्हते. पुढें बरेच दिवसांनी त्यानें वृंदावनांस एक पत्र लिहिलें तें असे.

" गुरुवर्य वृंदावन यांसः---

"सा. न. वि. वि.:—मी तुम्हांस मनापासून गुरु समजतों हे निःसंशय. तुमच्या उपदेशानें मला अतिशय आनंद झाला. मीसुद्धा स्वार्थत्याग करीन असें मला वाटते इंग्लंडच्या इतिहासांत क्रॅन्मर, लॅटिमर, रिडले यांनीं स्वधर्माकरितां आपणांस जिवंत जाळून घेतलेलें वाचून मी थक्क झालों. 'कधींही विसरणार नाहीं, असा दीप आज आम्ही लावून ठेवूं' असें लॅटिमर रिड्लेला म्हणाला तें माझ्या मनावर फार बिंबलें. आपल्या देशांत तानाजीनें व बाजी प्रभूनें दाखविलेलें शौर्यही असेंच थक्क करून सोडणारें आहे. अशी माणसें हिंदुस्थानांत पुन्हाही होतील असें मला वाटतें. तुम्हांजवळ येऊन रहावें असें मला वाटूं लागलें आहे.

"येत्या मार्गशीर्षांत बहुधा दादाचा विवाह होईल असें वाटते. वे. शा. सं. रामशास्त्री पंडित यांची मुलगी देवकी माझी वहिनी होणार असें ठरलें आहे. देवकी स्वभावानें फार चांगली असल्यानें मला वहिनी फार चांगली मिळेल. मला मात्र लग्न न करता मी तुम्ही म्हणतां तशी देशसेवा करावी असें वाटतें. क. हे वि. आ. प्रभाकर "

## : ६ :

देवकीवरचें अरिष्ट, गंगाधराचें धैर्य व प्रसंगावधान यामुळें, एकवार टळले खरें, पण बलदेवाचा आततायी स्वभाव सर्वांस माही । असल्यामुळें देवकी-बद्दलच्या काळजींतून वेळींच मुक्त व्हावें अशी आतां रामशास्त्र्यांस विशेषच गरज वाटूं लागली. देवकीस आई नव्हती व मुलीच्या प्रेमास्तव पंडितांनीं द्वितीय संबंध केला नव्हता. त्यामुळें देवकी हीच त्यांचें सर्वस्व झाली होती. ते राजघराण्याचे आश्रित शास्त्री असून त्यांचा विद्वत्तेबद्दल फारच लौकिक होता. त्यांची इस्टेट विशेष नव्हती तरी या एकव्या मुलीला ती सर्वस्व देऊन टाकावयाची असल्यामुळें, म्हटलें तर रत्नाकरांच्याही घरीं मुलगी देण्यांत त्यांना कांहीं मिंधेपणा येणार नव्हता ! कुलवान, विद्वान्, रूपवान, तरुण, सुस्वभावी व पूर्वपरिचित म्हणून गंगाधर हा जावई रामशास्त्र्यांस फार आवडला आणि संकटत्राता या नात्यानें तर गंगाधराची देवकी हक्काची ठेवच आहे, असें पंडितांस वाटलें. मग स्थलसंशोधनाच्या खटाटोपांत न पडतां वटपौर्णिमेच्या प्रसंगानंतर दीड दोन महिन्यांनीं ते देवकीस घेऊन रत्नाकरांच्या घरीं गेले.

पूर्वी रत्नाकरांच्या घरांत शिरतांना अव्याज मनोहर दिसणारी देवकी आतां सव्याज मनोहर दिसूं लागली. लावलेली दिंडी जोरानें लोटून बापाचें उपरणें ओढीत घाईनें आंत घुसणारी देवकी आतां रत्नाकरांच्या सताड उघड्या दरवाजाशींच अडखळली व आंत चलण्यास बापानें सांगितलें असतांही आपली आतुरता लपवूं लागली. पण रत्नाकरांची वधू होऊं इच्छीत असतांही कौमार्य-सहज विनयामुळें जरी ती रत्नाकरांच्या दारांतून आज आंत शिरेना तरी

त्याच वेळीं मनानें कुलवधू होऊन रत्नाकरांच्या घरभर फिरून आल्यासारखा तिचा तिला क्षणभर भास झाला. मग मात्र औपचारिक विनयाचा आग्रह सोडून ती मुकाट्यानें रामशास्त्रयांमागून वाड्यांत शिरली. पूर्वी अभ्यास टाकून धावत देवकीस सामोरा येणारा गंगाधर आतां तिला दारांत पहातांच काखेंत पुस्तक मारून माडीवर पळाला होता. ओटीवर रत्नाकर बसले होते. प्रभाकर तेथेंच अभ्यास करीत बसला होता. रामशास्त्री आलेले पाहतांच रत्नाकरांनीं उत्थापन देऊन त्यांचा सत्कार केला. रामशास्त्री ओटीवर येऊन एका लोडाशीं बसले. देवकी एका खांबास टेकून आड उभी राहिली. प्रभाकरानें तिला बोलावलें पण नुसती 'ओ' देण्यासही एवढा सत्कार तिला आतां अपुरा वाटला असेल. कुशल प्रश्न झाल्यावर रामशास्त्रयांनीं देवकीस गंगाधराकरितां स्वीकारण्याची गोष्ट काढली. आपला होकार निश्चित आहे असा रामशास्त्रयांचा विश्वास असल्याचें रत्नाकरास ठाऊक असल्यामुळें जरा घोळवून उघड विनोद करण्यास रत्नाकरांना फारसें निष्ठुर व्हावें लागणारें नव्हतें.

"आतां हीं सर्व कामें आम्हीं घरीं सोपविलीं आहेत. आम्हीं कांहीं लक्ष घालीत नाहीं." देवकीकडे वळून हंसत पाहून तिला ऐकूं जाईलसें रत्नाकर बोलले.

"मग तुम्ही सांगाल त्यांचे पाय धरूं बुवा! काय करतां! मुलीचे बाप पडलें ना? बरें प्रभा! वहिनी आहेत का रे घरांत?" रामशास्त्रयांना विचारलें.

'वहिनी' असें नांव निघतांच प्रभाकर आईकडे धांवला. तो उंबऱ्याशीं दाराआड आई हंसतमुख उभी असलेली त्याला दिसली, व दोघे ओटीवर आलीं.

**रामशास्त्री**—कसं काय वहिनी, घेतां कां देवकीला पदरांत?

**सगुणाबाई**—घेतल्यासारखीच आहे. यायचीच राहिली आहे.

**रत्नाकर**–अरे पण हो! हो! जरा तरी आढेवेढे!–रत्नाकरांनीं बोलत बोलत विडा कातरून रामशास्त्रयांना दिला.

**सगुणाबाई**–तें पुरुषानांच साधतं. आम्हां बायकांना आंत एक बाहेर एक करतांच येत नाहीं.

**रत्नाकर:**—हो तर ! आयती सून मिळेल आपल्याला, पण पदराला खार लागेल आमच्या ! जरा होय नाहीं करून हुंड्याचा भाव तरी वाढवाल.

**सगुणाबाई**—( डोळ्यांत आसवें येऊन ) कांहीं नको हुंडा ! सिताबाईंना मुलगी झाली तेव्हांच मी पदरांत घेतली आहे. आधीं फारा दिवसांनीं मूल झालं त्यांत एका महिन्याचं लेकरूं. मरतांना त्यांचा जीव घोटाळला. एकटे पुरुष काय करणार ? असं त्यांना वाटलं. मी जवळ होतें. माझ्याकडं त्यांनीं पाहिलं. इकडल्या पहिल्यापासून घरोबा. तेव्हां ' मी आहें. भिऊं नका. गंगाधराला देईन करून ' म्हणून धीर दिला. तेव्हां त्या माउलीनं स्वस्थपणें प्राण सोडला. मरणाच्या दारीं बसलेलीला दिलेलं वचन माझ्याकडून पूर्ण झालं म्हणजे मला समाधान होईल !

उद्वेग अनावर होऊन सगुणाबाईनीं देवकीला पोटाशीं धरलें.

"झालं ! तिची एवढी ठेव सुरक्षित वाटेला लावली कीं मी मरायला मोकळा झालों." रामशास्त्री डोळ्यांत आसवें आणून म्हणाले. पण या करुणारसानें रत्नाकरांनी करमणुकीखातर ओढून आणलेल्या विनोदाचा मात्र विरस झाला.

रत्नाकरांनीं गंगाधरास हांक मारली. गंगाधरास विरुद्ध जाण्याचें कांहींच कारण नव्हतें. रत्नाकरांनीं त्यास रुकार विचारतांच ' मी आपल्याबाहेर नाहीं ' असें त्यानें सांगितलें. 'शुभस्य शीघ्रं'. लगेच पंचांग आणून त्यांनीं तिथिनिश्चयही केला.

देवकीच्या घरचें बायको माणूस कोणी नव्हतें. तिचा सांभाळ आई मेल्यावर गांवातच असलेल्या एका मावशीनें केला होता. पण या सुरूपवती देवकीचें दैव इतकें कुरूप कीं तिला आठवें नववें वर्ष लागण्याच्या सुमाराला गांवांत महामारी आली व त्यांत देवकीची मावशी, तिचे यजमान, मुलेंबाळें चट मारीं प्राणास मुकलीं. देवकीही आजारी पडलीच. पण शुश्रूषेलासुद्धा कुणी नसतां वांचली. तिच्या दैवाला अजून काय काय खेळ खेळायचे होते ! देवकीच्या घरचें कोणी नाहीं म्हणून दोहीकडचा सर्व खटाटोप आपणच करण्याचें पतकरून रामशास्त्र्यास कन्यादानावेळीं नुसतें पाटावर बसायला सगुणाबाईनीं सांगितलें.

विवाहास अजून वास्तविक पुष्कळ दिवस अवकाश होता. पण सगुणा-

बाईंना तो काळ अपुराच वाटला. उलट बाजूच्या व्याह्यांचा इतमाम रहा-
वा व त्यांचेहून आपला बडेजाव अधिक दिसावा याकरितां विवाहप्रसंगीं
करावी लागणारी खटपट बरीच पुष्कळ असते. पण अशी कोणतीही खटपट
सगुणाबाईस करावयाची नव्हती. रुसायला मिळावें म्हणून त्यांचें खणउणाख
ठरविणारी नवऱ्यामुलाची कोणी उसनी चुलती तेथें नव्हती, कीं नवऱ्यामुली-
च्या फुलाच्या पोषाखांत कोमेजलेलीं फुलें नसल्यानें रुसायला मिळालें नाहीं
म्हणून धुसफुसणारी विहीण त्यांना नव्हती. उलट त्यांनाही नवरदेवाच्या
न्हाण्याला पहिल्यानें एकदां पाणी फारच कढत
तर पुन्हां मग लगेच अगदीं 'इश्श, पाणी सगळं गार विंचवासारखं झालं,
चलरे नकोच तें न्हाणं' असं म्हणून अर्ध्या अंघोळींतून मुलगा काढून नेतां
येणार नव्हता. रुसायचें तर आपल्यावरच रुसावें आणि रुसायचा कंटाळा
आल्यावर आपली आपणच समजूत करून घ्यावी असा आतां प्रकार होता.
शेजारपाजारणींना हें आवडलं नाहीं. त्यांच्या मतें, एवढी मुलाकडची
विहीण, हिनं मानपान नको का करून घ्यायला ! धुस नाहीं फुस नाहीं नुसत्या
पिपाणीच्या सुरांत अळणी लग्न कसं करायचं असं त्यांना वाटे. भर चौकांत
उभं राहून दोन्हीकडच्या विहिणींच्या व त्यांच्या पदातींच्या फणफणाटाचा
बे-सूर पिपाणीच्या एकेरी सुरांत मिळाला म्हणजे लग्न खरं गाजलं-कडाडलं
असें शेजारणी म्हणत. सगुणाबाईचें निरपेक्ष हित चिंतणाऱ्या कांहीं शेजार-
णींनीं संधि साधून त्यांना तसें स्पष्ट सांगितलेंही. एका बाईनें तर सगुणाबाईची
हौस झालीच पाहिजे असा हट्ट धरून स्वयंसेवक म्हणून मुलीकडच्या विहि-
णींचें काम पत्करायचीही त्यांच्याजवळ परवानगी मागितली.

पण सगुणाबाईनीं सर्वांना सामोपचारानें नकार दिला. शेजारणींच्या मानानें
त्या फारच अधिक सुविचारी व समंजस होत्या. त्यांना विहिणींच्या कलहांत
काव्य वाटणारें नव्हतें. सीताबाईंना दिलेलें गोड वचन पूर्ण करण्याची
वेळ आली याच आनंदांत त्या रमल्या होत्या. सज्जनांना शब्दास जागण्याचा
प्रसंग, अशुभ व कष्टप्रद असला तरीही हर्षोत्पादक असतो. मग हा तर सुखो-
त्कर्षशाली, सर्व मंगलांचा मंगल असा पुत्रविवाहाचा प्रसंग ! सात्त्विक आनं-

दानें त्यांचें अंतःकरण भग्न वहात होतें. विहिणीत्वाच्या रजोगुणी अहंकाराला तेथें जागाच नव्हती.

पण विहिणीकलहाच्या बखेड्याची तयारी करायची नसली तरी इतर तयारी कांही थोडी थोडकी करायची नव्हती. सगळ्या संस्थानांतील पहिल्या प्रतीच्या सावकाराच्या घरचा लग्नासारखा मोठा समारंभ; त्यांत मुलाचा; त्यांत पहिल्या मुलाचा. मग काय विचारतां ? लग्नाची बातमी बाहेर पडतांच गिऱ्हाइकी मिळावी म्हणून वाणी खेपा घालूं लागले. त्यांनीं आणलेले मालाचे नमुने पहून, पारखून, निवडून पसंत करण्यांत आठ आठ दिवस जाऊं लागले. शेतीवाडीवरचा माल येऊन पडूं लागला. नेहमींचे नोकर चाकर थोडेच असत. तेव्हां लग्नाच्या कामाकरितां हंगामी नोकर चाकरही बरेच ठेवावे लागले. यांचा वाडा मोठा होताच. तरी मुहूर्ताचा दिवस जवळ येत चालला तसें दळण कांडण वगैरे कामाकरितां स्वतंत्र जागा घेण्यांत आली. स्वतां रत्नाकरांचा जवाहिराचा व्यापार असतांही त्यांचे मुंबईचे व्यापारी आपले मौल्यवान जवाहीर घेण्यास त्यांस आग्रह करूं लागले, व रत्नाकरांनींही नवीन कांहीं तऱ्हा खरेदी केल्या. उंची कपडेलत्ते तर खूपच खरेदी झाले. आणि अत्तरगुलाबांच्या वासानें घ्राणेंद्रियें इतकीं बधिर झालीं कीं त्यांची घ्राणशक्तिच नाहींशी होते कीं काय अशी भीति वाटली. भटभिक्षुकांना यंदा आपले ग्रह चांगले आले असें वाटलें. आचाऱ्यांना कौशल्यास क्षेत्र मिळालें. वाजंत्र्यांना स्फुरण आलें. सारांश, रत्नाकर धनाढ्य, उदार, उमदा, हौशी व सर्वसंग्रहाक असल्यानें गांवांत ज्यांना म्हणून लग्नकार्याचें कांहीं तरी काम करतां येण्यासारखें होतें अशा सर्वांना एक प्रकारें आशा लागली व हुरूपही उत्पन्न झाला. गांवांत गंगाधराचें लग्न हा एक आजकाल चर्चेचा, खटपटीचा व धांदलीचा असा फार मोठा विषय होऊन बसला.

ज्यांच्याकरितां परस्पर ही सारी धांदल चालली होती त्यांना आतां कांहींच काम नव्हतें. देवकी आपल्या वडिलांच्या घरीं होती. गंगाधरास बी. ए. झाल्यानंतर व्यवहार पाहण्यासाठीं रत्नाकरांनीं घरींच ठेवून घेतलें होतें. तथापि तो अजून उद्योगधंद्यास लागला नव्हता. त्याला वाचनाचा नाद चांगलाच

असल्यामुळें तो आपल्या लायब्ररींत वाचीत बसे. पण लग्न ठरल्यापासून त्याचें वाचनाकडचें लक्ष कांहींसें कमी झालेलें दिसलें.

पतीस पत्नी किंवा पत्नीस पती या अशा काय मोठ्या चिजा वाटत असतील देव जाणे. लहानपणीं जिवलग मित्र असलेले सुद्धां थोरपणीं परिस्थितींत उच्च-नीचपणा आला किंवा भिन्न मार्ग झाले कीं ते स्नेही एकमेकास विसरतात. पण कानामागून आलेली बायको मात्र लग्न झाले रे झालें कीं पतीला मग तिच्या आठवणी होतात, तिच्याविषयीं बोलणें आवडतें तिचा ध्यास लागतो, तिला जरा कांहीं झालें कीं मग अगदीं जिवाला कशी हुरहूर! घटकाभर बायको दिसली नाहीं कीं विरहदु:खानें हृदय होरपळतें, पूजा करतांना ताम्हनांतलीं गुलाबाचीं पुलें विस्तवासारखीं लागतात आणि चांदण्याच्या द्वारां अगदीं अग्नीचा पाऊस पडतो. बायकोच्या ठिकाणीं नसते गुण दिसूं लागतात व असलेले ठळक होतात. बायको अगदीं मूर्ख व बेताचीच सुरूप असली तरी सचिव, मिथःसखी, प्रियशिष्या छेः छेः! हृदयस्था, हृदयदेवता आणि रत्नखनी त्रिभुवनसुंदरी नी कायची काय होऊन जाते.

बायकांना तर पतीचा यापेक्षांही लळा असतो. स्त्रियांना साऱ्या जगांतले पौरुष व सद्‌गुण फक्त आपल्या पतीच्या ठिकाणींच दिसतात. बाहेर नवऱ्याचा दर्जा कांहींही असो. तो हांजीहांजीखोर कारकून असो, नाहीं तर एकादा जडज असो किंवा आचारी, पाणक्या, हमाल कोणी कसाही असो. पतिव्रतांना तोच सर्वस्व असतो तसल्या त्या पतीची दृष्टादृष्ट झाली तरी त्यांना हर्ष लोटतो. पतीनें आपणाकडे पाहून थोडें स्मित केलें कीं त्यांना स्वर्ग दोन बोटें उरतो. जगाच्या रगाळांत दिवसभर हाडें झिजून संध्याकाळीं पतिराज घरीं येण्याचे वेळीं, लावलेल्या दाराबाहेर चाळीच्या फर्शीवर पादुकांचा खडखडाट ऐकला कीं गंधर्वांचें गायन त्यापुढें अगदीं रद्द! आणि हातांतलें काम टाकून उत्सुकतेनें पहात असतां, हळूंच दार उघडून—अंगाला कष्ट आला असला तरी—बळेंच हंसें आणून पतींनीं घरांत प्रवेश केला कीं मग—वारे वा! त्यावेळच्या स्त्रियांच्या प्रसन्नतेचें वर्णन शब्दानें करतां तर नाहींच यायचें. पण चितारी चितारूं म्हणेल तरी तो आधीं पाहील कोणत्या डोळयांनीं

व मग चितारील कोणत्यांनीं ? त्या प्रत्यक्ष दृश्यावर दृष्टि एकदां खिळली कीं हालायचीच नाहीं मुळीं !

गंगाधर व देवकी यांना कांहीं सुद्धा काम नसतां लग्नाआधीपासूनच मनानें आतां तीं परस्परांच्या चिंतनाच्या उद्योगांत अहोरात्र गढलेलीं असत. लहानपणचे सर्व प्रसंग गंगाधरानें आठवून ताजे केले. वटपौर्णिमेचा नुकताचा प्रसंग तर देवकीस आपणच सोडविल्यानें त्यास अधिक प्रिय वाटला. तसाच गोड शेवट व तोही पुन्हां आपल्या हातून होईल या अटीवर देवकीवर आणखी पुष्कळ तसले प्रसंग यावे असें अगदीं खोल मनांतल्या मनांत तरी चिंतण्यास तो तयार झाला होता.

इकडे देवकीलाही बलदेवाच्या हातून सोडविणारा तो गंगाधराचा हात— त्याचा तो स्पर्श नेहमीं नवा भासत असे. त्याचें तें तेजस्वी गोल मुखमंडल ती नेहमीं आठवी. गंगाधर आपणावर रागावला आहे किंवा आपलीं आर्जवें करीत आहे, तो कांहीं लिहिण्यावाचण्यांत मग्न झाला असून आपण चहाचा पेला अकस्मात पुढें करून त्यास चकित करीत आहों वगैरे चित्रें आपल्या मनाशीं ती काढी. आपणास उत्तम सासू सासरा मिळणार, सासूच्या हाताखालीं आपण असें असें वागूं, असें कौशल्य दाखवूं, असा संसार थाटूं वगैरे कल्पनाही तिनें मनांत रंगविल्या. आणि आपणास मुलें बाळें झालीं आहेत. तीं मोठीं झालीं, लौकिकास चढलीं, व पतीच्या व पुत्रांच्या मोठेपणानें आपणही मोठे झालों अशींही मनोराज्यें तिला सुचल्याशिवाय राहिलीं नाहातें. कल्पनासृष्टींत हवी ती घटना आपणास हवी तेव्हां आणि हवी तशी घडवितां येते, व तशी ती घडवून आपण त्यांतच दंग होतों. मालकीणें आपल्या स्वाधीन असल्यामुळें कल्पित दुःखज्योतींचेही चटके क्षणभर हांसेनें सोसून सुखकल्पना आपण सुखतर करीत असतों. सत्यसृष्टींत हें असेंच शक्य झालें असतें तर काय बहार झाली असती !——तर मग—— ——असत्यच स्वाधीन म्हणून सुखकर व म्हणून श्रेष्ठ व इष्ट, आणि सत्य पराधीन म्हणून दुःखकर व म्हणून दुष्ट व अनिष्ट मानावें काय !

पण आपल्या अभागिनी देवकीची कल्पनासृष्टिसुद्धां एकांत रम्य नव्हती.

आपण कितीही सुरूप, सुशील असलों व सुगृहीं पडलों तरी आपल्या प्रिय आप्तांस आजपर्यंत तरी कधींही आपणापासून सुख लाभलें नाहीं असें तिला आठवे. आपणापासून आपल्या माणसास सुख न झालें तर ती स्मृति स्त्रियांस अगदीं जाळत असावी असें पुष्कळ वेळां दिसतें. पुरुषास असें इतकें तीव्र दुःख वाटत नाहीं. मग दुसऱ्यास सुख देण्याकरितांच आपला जन्म आहे अशी उपजत भावनाच स्त्रीजातींत असल्यास न कळे ! जन्मल्यापासून एकाच महिन्यानें देवकी मातृहीन झाली. पण स्वदुःखापेक्षांही आपली माता इहलोकच्या ऐश्वर्यास आंचवली व आपल्या पायगुणानें बाबांच्या संसाराचा वणवा झाला याचीच तिला अती हळहळ वाटे. 'मावशीनं आपणाला ठेवून घेतलं आणखी अगदी तान्हेपणापासून स्वतःचीं लेकरं बाजूस सारून आपलं पोषण केलं. पण अखेर काय ? आठ वर्षं झालीं न झालीं तोंच तिच्या घरादारांची राखुंडी झाली ! नी पुन्हां बाबासमोर मी संकट म्हणून उभी राह्यलें. दुर्दैवा, जगांतल्या साऱ्या मुली सोडून अधिराजांनीं मलाच मागणी घालावी, बाबांनीं नाहीं म्हणावं आणि बलदेवाला आपला द्वेष वाटावा ! काय भोगवटा हा ! ते दिवशीं इतक्या सगळ्या मुली हंसल्या, मग मीच एकटी त्याला कां दिसावी ! हायहाय ! त्यावेळीं बाबांच्या घराण्याची अब्रू अगदीं रस्त्यावर आली होती !' अशी आठवण येतांच ती दचकून रडूं लागे. या सर्व गोष्टीवरून आपण दुर्दैवी असून आईला, बाबांना सगळयांना दुःख देण्याकरितां व स्वतां हाल, अपमान सोसण्याकरितां जन्मास आलों आहों असें वाटून ती स्वतांस धिःकारी. आणि अशी अभागिनी व कपाळकरंटी आपण रत्नाकरांच्या घरीं जाऊन पडणार असें लक्षांत येतांच आनंद मावळून तिला मग शोकच अनावर होई. पण तिचें दुर्दैव असें खडतर होतें कीं ज्यापाशीं भडाभडा मन मोकळें करून सत्तेनें रडावें असें मायेचें माणूस कांहीं देवानें तिला ठेवलें नव्हतं. जगाच्या धावत्या बाजारांत उगीच मायेशिवाय कुणाचें दुःख ऐकायला सवड आहे कुणाला !

देवकी व गंगाधर या उभयताहून प्रभाकराची कांहीं वेगळीच मनःस्थिति होती. विवाह या विषयाचा आतांपर्यंत त्यानें कधींच विचार केला नव्हता. घरीं अगदीं भावाचेंच लग्न निघालें, तेव्हां तो साहजिक आतां त्याचा विचार

करूं लागला. पण विचार करूं लागला तों एकदम टोंकालाच गेला. 'सावधान' शब्द ऐकतांच विवाहवेदीवरूनच रामदास पळून आण्यात गेल्याचें त्यानें वाचलें होतें, व अद्भुतप्रिय प्रवृत्तीमुळें त्याला इतिहासांतला तो प्रसंग फारच रमणीय वाटला. रामदासांच्या एकंदर चरित्राशी व चारित्र्याशीं त्यानें त्याचा कार्यकारण संबंध बांधला, व रामदास हा शिवाजीपेक्षांही थोर असें त्यानें ऐकलें असल्यानें रामदासी बाणा संभाळूनच शिवाजी व्हावें असें आता त्यानें ठरविलें. आपणास वडील विवाहाचा आग्रह करीत असतां तो न ऐकून आपण एक दिवस हळूंच घर सोडून जातों, रामदासाप्रमाणें कौपीन धारण करून उपदेशक म्हणून फिरूं लागतों असें तो कल्पूं लागला. रामदासी पंथाचे लोक स्वराज्यार्थ गुप्त कारस्थानें करीत त्यांची त्यानें आपल्या चित्रांत स्थापना केली. भावावर त्याचें प्रेम अगदीं खरेंखुरें होतें, यामुळें वनवासांत सुद्धां आपण त्यास व देवकीस स्मरूं, त्यांच्यावर प्रेम करूं असा मात्र त्यानें निश्चय केला.

दिवसानुदिवस मुहूर्त समीप येऊं लागला, लग्नचिठ्या चोहोंकडे रवाना झाल्या. वृंदावनांनाही आमंत्रण गेलें. पण वर्तमानपत्राच्या व्यापामुळें आपणांस सवड नाहीं असें त्यांनीं कळविलें. विवाहाकरितां फार मोठा मंडप घातला होता. दोन घरीं वेगळें वऱ्हाड ठेवायचें नसल्यानें एकाच वऱ्हाडांत तात्पुरते दोन भाग केले होते. अर्थात लग्नाआधींच देवकीला सासरीं यावें लागलें. मार्गशीर्ष शुद्ध पंचमीचा मुहूर्त धरला होता. होतां होतां तोही दिवस उजाडला. आज प्रभाकरही आनंदित असून पुढें होऊन भराभर कामें करीत होता. सगुणाबाई तर दोन घरची बिहीण! त्यांनीं उत्तम पोषाख केला होता! बहुमोल अलंकार घातले होते. नोकराकडून व हाताखालच्या माणसांकडून कामें करून घेण्याच्या धांदलींत त्या ऐश्वर्यलक्ष्मीसारख्या झळकत होत्या. सूर्योदयापूर्वीच आज रत्नाकरांनीं पार्थिवपूजा आटोपली. विवाहासारख्या मंगल प्रसंगीं अधिराजास सन्मानपुरःसर आमन्त्रण करण्याची अहिल्यापुरांत फार जुनी वहिवाट होती. म्हणून राजवाड्यांत जाण्याकरितां दोघेही व्याही पोषाख करून सज्ज झाले. चांदीच्या वाटींत मंगलाक्षता घेऊन उभयतां व्याही दाराशीं असलेल्या घोड्याच्या गाडींत येऊन बसल्यावर गाडी राजवाड्याकडे चालली. मार्गांत अनेक नागरिकांचे आशीर्वाद व धन्यवाद घेत घेत ते वाड्यापाशीं

येऊन पोचले. अधिराजाकडे वर्दी गेली. गावांतील प्रतिष्ठित नागरिक म्हणून या उभयतांना अधिराज जिना उतरून सामोरे आले, व त्यांना हातीं धरून त्यांनीं दिवाणखान्यांत नेलें.

व्यसनी, लहरी, बेशिस्त व मनाचा दुबळा असून सुद्धा अधिराजास आपल्या प्रजेबद्दल अभिमान वाटे. राज्य करण्यास आपण अपात्र असल्याचें त्यास कळून चुकलें होतें. यामुळें त्याचें मन त्याला नेहमीं खाई. पण त्यास इलाज राहिला नव्हता. प्रतिष्ठित, विद्वान व कर्तृत्ववान नागरिक हे राज्याचा अभिमान बाळगणारे असतील तर तेच राज्याचे आधारस्तंभ असतात, व मोडकळीस येऊन अवजड व बेतोल झालेली राज्यसंस्था अशा नागरिकांच्या साह्यानें तोलून धरून धड व मजबूत करतां येते हे अधिराज जाणत असून प्रतिष्ठितांस तो कधींही दुखवीत नसे. वेळीं त्यांची खुषामतही करी. मुलाबद्दल त्याची पूर्ण निराशा झालीच होती. तरी पण प्रजेनें मनांत आणल्यास राज्याच्या चिरस्थायित्वाची कांहीं सोय अजूनही करतां येईल असा विश्वास त्यानें मनाशीं बाळगून ठेविला होता. मधून मधून तो असा उद्गारही काढी.

दिवाणखान्यांत यावेळीं बलदेव वडिलांकडे आला होता. त्याचे डोळे अजून लाल असून तो घुम्यासारखा बसला होता. व्याहीमित्रांना घेऊन अधिराज वर आले ते वेळीं व्याह्यांनीं केलेला नमस्कार घेण्याचेंही त्यास भान नव्हतें. रत्नाकरांनीं व रामशास्त्र्यांनीं रीतीप्रमाणें उभयतां पितापुत्रास आपापल्या घरचें संकल्पपूर्वक आमंत्रण दिल्यावर युवराज शुद्धीवर आला. व कांहीं तरी बोललें पाहिजे अशी वडिलांची इच्छा असल्याचें दिसल्यावरून प्रसंगास ( अन्-- ) उचित असें बोलण्यास त्यानें सुरवात केली.

"अखेर बाबासाहेबांचा आणि आमचाही अपमान करून आम्हांस मुलगी न देतां त्या गंगाधरालाच देतां आणि वर खिजविण्याकरितां आम्हाला लग्नालाही बोलवतां का ?" अर्धवट धुंदींत डोळे वटारून बलदेव म्हणाला.

अधिराजांनीं रागानें एकवार त्याकडे पाहिलें व ते रत्नाकरास म्हणाले "जाऊं द्या, त्याच्याकडे लक्ष देऊं नका, तो राज्य घालवायलाच आला आहे !"

"नाहीं नाहीं ! छे अजून पोरवय आहे, हळूहळू कळूं लागेल त्यांना !" रामशास्त्री म्हणाले.

" अरे वा: ! मुलगी न देऊन आणखी पोर म्हणून खिजवतोस काय ?" बलदेवानें रागानें विचारलें.

" महाराज, मोठमोठ्यांच्या शेंकडों सुंदर मुली आपल्यापायीं लोळण घेतील, माझी गरिबाची मुलगी कशाला आपल्याला ?"

" तुम्हां गरिबांच्याही मुली लोळण घेतील, दिसेल तुम्हांला." बलदेव चिडून बोलला.

" तुझी जीभ कापून टाकली पाहिजे. चल नीघ येथून !" अधिराज त्याचे अंगावर ओरडले.

" प्रजेच्या देखत आपण असा आमचा अपमान करतां यामुळें प्रजा आम्हांला व आपल्यालाही मानीत नाहींशी झाली आहे." उठून जातांना बलदेवानें टोमणा मारला.

तो उठून गेल्यावर अधिराजांनीं रामशास्त्रयास स्थळ चांगले मिळाल्या बद्दल त्यांचें अभिनंदन केलें. व्याह्यांनींही पुन्हां एकवार समारंभास अगत्य येण्याबद्दल विनंति करून ते दोघे परत घरीं आले.

सकाळच्या प्रहरीं देवकादिधर्मकृत्यें झालीं. पाहुणे मंडळी खूपच आली होती व मंडपांत जागजागीं त्यांचे थवे पडले होते. अनेक प्रकारच्या गप्पा तेथें चालल्या होत्या. फार दिवसांनीं भेटी झालेले नातलग एकमेकांचें कुशल विचारीत होते. कोठें ताज्या वर्तमानपत्रांतील शिळ्या बातम्यावर टीका सुरू होती. कोणी आपल्या गांवचे विशेष सांगत, कोणी दुसऱ्यागांवचें विशेष समजूत घेत, कोणी परत जाण्याची आपणास किती घाई आहे तें सांगत, तर आपण आल्यानें आपल्या कामाचा किती बखेडा झाला याचें दुसरा कोणी वर्णन करी. लग्नासाठीं जमलेले शेकडों लहान मोठे पाहुणे इतके सर्व आपणासाठीं आले व यावेळपुरता तरी ते आपणा संबंधीच विचार करीत असतील असें वधुवरांना वाटत असते. भोळीं बिचारीं ! वास्तवीक वधुवरें व त्यांचें भवितव्य हा एक विषय या 'इतरां'ना खरोखर मुळींच आठवत नसतो. ज्या उभयतांना संसारसागरांत लोटण्याला आपण साक्षीभूत होत आहों त्यांनी ही केवढी जबाबदारी घेतली आहे, हें कोणी पहात नाहीं. ' यांची पुढें काय वाट होणार ?' या प्रश्नांचें उत्तर कोणासच नको असतें. वरानें संसाराचें

ओझें उचललें पण याला तें पेलेल का ? याची त्यांना परवा नसते. उपाध्याय आपली दक्षिणा पाहतात, जवळच्या विहिणी आपला मानपान रुसणें फुगणें याबद्दल दक्ष असतात. पुरुष आपले उंची कपडे, घड्याळें, ट्रंका, चोरीला जाऊं नये म्हणून त्यावर बसून पहारे करीत असतात. मुलांचें लक्ष खेळतां खेळतां फराळाची पंगत केव्हां बसते यावर असतें. आणि खटपटे सर्व समारंभ ठाकठीक पार पडेल कसा या फिकिरींत असतात. पण खरोखर यांतील एकादीही गोष्ट विवाहाची जबाबदारी हलकी करूं शकत नाहीं. सप्तपदी व विवाहहोम झालारे झाला कीं तो पति आणि ती पत्नी हीं मग एकमेकांपासून अभेद्य होतात. तीं मग एकमेकांच्या गळयांत अलंकार होवोत नाहीं गळफास होवोत. विवाहाचा सर्व झगझगीत समारंभ मावळून गेल्यावर अज्ञातोदर अशा भवितव्याच्या अंधारमय दरींत जीं अचानक दुःखें किंवा अचानक सुखें येतील त्यांचे ज्याचे ते मालक असतात. भवितव्यांतील सुखांची तेवढी कल्पना करून वधुवरें आपणास रिझवीत असतात. दुःखे दिसलीं असतीं तर हजारांतून एकतरी विवाहप्रसंग मंगल वाटला असता कीं काय हा संशयच आहे !

विवाहास अधिराजही आले होते. मोठमोठे अधिकारी मानकरी व्यापारी वगैरेचा फार मोठा जमाव विवाहास जमला होता. मोठ्या लोकांच्या पट्टेवाल्यांची थोरल्या दरवाज्याशीं गर्दी झाली होती. बलदेवास आणण्याचें मात्र अधिराजांनीं हेतुपूर्वक टाळलें असावें असें वाटलें. त्यासंबंधीं चौकशी करतां 'त्याचें डोकें दुखत असल्यामुळें त्यास आणलें नाहीं' अशी कांहीं तरी सबब अधिराजांनीं सांगितली. बाकी आजच्या समारंभाच्या बातमीनें त्याच्या डोक्यांत तिडीक उठली होती, या दृष्टीनें त्यांनीं सांगितलेली सबब खरेंच खरी होती.

\+ \+ \+ \+

विवाहसमारंभ चालू असतां इकडे वाड्यांत बलदेव, हसन, यज्ञेश्वर व सख्या वर्तुळाकार कोच पसरून त्यावर लोळत होते.

"सख्या, बाबासाहेबांनीं आम्हांला नाहीं बोलवलं रे लग्नाला" पाय रगडीत असलेल्या सख्याला बलदेव म्हणाला.

"माझ्यासारख्या पायाच्या सेवकानं काय बोलावं सरकार? बोलून चालून आम्ही पायाचे चाकर! पापाचे धनी व्हायचे मात्र" हसनला खुणावून सख्या म्हणाला.

" अरे तुम्ही माझे जिवाचे प्यार, माझे काळजाचे कलिजे आणि तुम्हीच आमच्याशीं बोलायचा संकोच धरावा! बजे टबळे, त्याला एक ग्लास दे म्हणजे त्याचा जरा घसा सुटेल " असे म्हणून बलदेवानें एक ग्लास आधीं आपल्या घशांत ओतला.

पण " मला आज बरं वाटत नाहीं " म्हणून सख्यानें ग्लास नाकारला.

" बरं, हसनभाई तुम्ही तरी घ्या, गुरुजी तुम्ही पण घ्या! त्याशिवाय आम्ही कसा घ्यावा?" बलदेवानें आग्रह केला. पण हसननें "आज आधींच फार झाली" असा बहाणा करून ग्लास घेण्याचें नाकारलें.

"हो! त्यांची आज तिकडे मजा आहे, आपणही इथें कां करूं नये?" म्हणून यज्ञेश्वरानें मात्र विनंति मान्य केली.

" आपल्या बऱ्याकरतां आम्ही आपले प्राणही द्यायला तयार आहों पण आमचं म्हणणं आपणाला पटलं पाहिजे ना!" कळवळ्यानें सख्या म्हणाला.

" अरे पण बोलना! तुझ्यावर माझा विश्वास आहे. तुमच्यामुळें तर या दुष्टांच्या जाळ्यांत मी जिवंत राहिलों आहे." बलदेव म्हणाला.

" आमचं तरी तेंच सांगणं आहे कीं हें जाळं तोडून आपण आतां मोकळं व्हावं " सख्या म्हणाला.

**ह.**—खरा बोलतो

**ब.**—बाबासाहेबांच्या विरुद्ध कसं जातां येईल?

**स.**—तर मग बोलल्याची कसूर माफ असावी खावंद!

**ब.**—तसं नव्हेरे—

**स.**—तर मग बाबासाहेबांनीं कारभाऱ्यांदेखत शेटसावकारापुढं भर रस्त्यांत आपला अपमान करावा, यामुळं सारा गांव आपली छीः थूः करतो आहे हें आम्हांला पाहवत नाहीं.

**ह.**—त्या दिवशीं ती पोर मला हंसली म्हणून छोट्या राजानीं आमचा कैवार घेतला, पण मोठ्या राजांनीं उलट त्यानांच शिक्षा दिली. बाबासाहे-

बांच्या विरुद्ध जायचं नसलं तर आमच्यापायीं युवराज साहेबांचा अपमान होण्यापेक्षां आम्हीच आतां युवराज साहेबांपासून दूर व्हावं हें बरं.

**ब.**—तुम्ही सोडून गेलां म्हणजे गांवचे लोक मला जिवें मारतील. मग जात असला तर चला. मीही येतों तुम्हाबरोबर. हें राज्य भोगण्यापेक्षा वनवास बरा. चार घरं भीक मागून पोट भरूं नाहीं तर झाडपाला खाऊन राहूं.

**दीक्षित**-छेः छेः! असं हात पाय गाळणं बरं नाहीं. 'साहसे श्रीः प्रतिवसति'.

**बलदेव**—तुम्ही मला सोडूं नये याकरतां काय पाहिजे तें करतों, बोला.

**स.**—आमच्याकरतां आपण करण्यापेक्षां आम्हीच आपल्याकरतां काय हवं तें करायला तयार आहों. पण आपणाला तें पटेल तर पुढें बोलणं.

**ब.**—मग काय म्हणतोस बोल ना!

बलदेव व यज्ञेश्वर झिंगू लागले!

**स.**—म्हणणं काय असायचं? प्रजेवर जरब बसली पाहिजे.

**ब.**—बाबासाहेब आहेत तोंवर आमच्या हातीं कांहीं नाहीं, मग जरब कशी बसवायची?

**स.**—पण प्रजेवर आपण जरब बसविल्यावर बाबासाहेबांचं वजन आपो-आप कमी होईल.

**ह.**—आमच्या अवरंगजेब बादशहानं आपल्या बापाला दहा वर्षं तुरुगांत ठेवलं होतं.

**ब.**—असं नोडण्यासारखं उलटं काळीज आम्हांजवळ नाहीं बुवा!

**ह.**—आमचं बोलणं आपल्याला आवडत नाहीं आणि वर अशी आमच्या धर्माची, बादशहाची आणि समाजाची निंदा आपण करतां. आम्ही आपणापासून दूर जावं असं मी म्हटलं तेंच योग्य दिसतं.

**ब.**—नाहीं, चुकलों बुवा, पण प्रत्यक्ष बाबासाहेबांच्या विरुद्ध जाण्याखेरीज आम्ही कांहींही करूं.

**ह.**—बाबासाहेबांबद्दल आपणाला एवढा आदर! पण रामशास्त्र्यांनं एवढा त्यांचा अपमान केला तरी मग कसे गप्प बसलांत? तीच पोर मला चार चौघांत हसली. आमचं गरीबांचं राहो! राजेसाहेबांचाच अपमान युवराजांनीं गिळला. मग आम्हां कुत्र्यांना कोण विचारतो?

ब.—मला चढ लागली. उगीच तापवूं नका! पुन्हां केव्हां तरी सांगा. मरा जा आतां.

बलदेव त्याच कोचावर उताणा पडून झोपीं गेला. यज्ञेश्वर आधींच निजला होता. सख्यानें हसनला खुणावलें व दोघेजण उठून दिवाणखान्याबाहेर आले व दोन तीन दालनें ओलांडून एका लहानशा खोलींत दार ओढून घेऊन बाकावर बसले.

स.—माझा बेत तुम्हांला पडतो का पसंत, बघा !

ह.—वाटेल ती युक्ति सांग. दहाजणासमोर ती पोर मला हसली. मी सूड उगविणार.

स.—तुला त्या पोरीचाच सूड उगवायचाय. मी त्या सावकारांच्या घरावर नांगर फिरलेला कधीं बघीन असं मला झालंय. माझ्या आजानं कधीं त्या रत्नाकराच्या बापापासून कर्ज काढलं होतं. तेवढ्यापायीं केवढ्या मोठ्या पाटिलकीचा वारस मी भुकेबंगाल झालों. मला गाढवाला तरी वेळेवर अक्कल यायला नको होती! पण चोचले पुरवतांना म्हणून चंद्री जेव्हां मला सोडून पळून गेली तेव्हां माझे डोळे उघडले. दहा पंधरा हजारांची इस्टेट गमावून बसलों. पैसे गेल्याचं मला कांहीं नाहींरे ! पण मी हौस पुरवली नाहीं म्हणून चंद्री चहूंकडे सांगत सुटली. यानं माझी अगदीं नाचक्की झाली. तुला काय सांगूं साहेबा, लग्नाची बाइल उठून गेली असती तर वाईट नसतं वाटलं इतकं चंद्री गेल्याचं मला वाईट वाटतंय. मी वकिलाला विचारलं. पण त्यानं सांगितलं आतां रत्नाकरावर कांहीं फिर्याद चालायची नाहीं म्हणून. मरो ते कोडत नी तो वकील ! मला सूड घ्यायला कायदा काय करतो ? पैशाची चोरी केली असती, पण सांपडलों तर पैशापरी पैसा जाऊन वर माझीच अब्रू जाणार ! तसं नको; मीच त्याची अब्रू घेतों. मग माझं कांहीं झालं तरी त्याची अब्रू जाईल ती त्याची कसली परत येते !

ह.—मग तूंन् मीच उरकून घेऊं या ना जलदी !

स.—छट्! अकलेची जातच नव्हे तुमची ! अरे हा गाढव युवराज आहेना, त्याला यांत घेऊंया गोवून ! म्हणजे काम फत्ते होऊन वरती आपण

निभावून जाऊं. अरे लावलेली आग बघायला शाबूत राह्यलं तर खरी मजा !

ह.—मग युवराजांचं मत मी आतां मिळवितों. माझ्या मुठींत आहे तो.

सख्या—जरा दम खा ना ! अक्कल नाहीं म्हणतों तें का उगीच ! युवराज अजून माझ्याइतका हलकट झाला नाहीं. अब्रूदाराशीं गांठ पडली तर एकदम छाती नाहीं व्हायची त्याची. ते दिवशींच नाहीं ! त्याच पोरीचा हात धरून नुसता दूर उभा राहिला, आणि तरी सुद्धां भेदरला होता.

हसन—अरे यार हिंदु ! बडा अक्कलवान तूं ! बस् बस् ! तूं म्हणतोस तसंच तर ! पण मला भाई सूड घेण्याची घाई झाली आहे आणि ती पो—" सख्याच्या गळयांत हात घालून त्याच्या कानाशीं हसन कांहीं पुटपुटला व त्यानें दातानें सख्याचा कान पकडला. सख्यानें " चल उतावळ्या, दूर हो ! हेल्याचाच भाऊ दिसतोस " असें म्हणून त्यास ढकललें.

## : ७ :

सगुणाबाई व रत्नाकरांना आनंद देणारे गंगाधर–देवकी यांचें विवाहमंगल मोठ्या थाटानें पार पडलें. वृंदावन आले नाहींत त्यामुळें प्रभाकर व गंगाधरास थोडा विरस वाटला. गंगाधरानें त्यास पुन्हां एक सामान्य हकीकतीचें पत्र लिहिलें. वृंदावनांनींही त्याचें उत्तर ताबडतोब पाठविलें. ते पत्र असें होतें,–

**श्री. गंगाधर** यांस न. वि.

तुझें पत्र पाहून आनंद झाला व मौज वाटली. अखेर वांकडा भांग काढणारीच मुलगी तूं पत्करलीस! पण तूं तरी काय? जुन्या परंपरेचा अभिमानी. वडिलांच्या सांगण्याला मान तुकवावी लागली असेल तुला दुसरं काय! मोठ्या जुलमानं हा गोड घास तुला तोंडांत घालावा लागला असेल नाहीं!

देवकीला संकटांतून सोडवून मग तिच्याशीं विवाह करण्यानं एकाद्या कादंबरीच्या नायकाला शोभेल असें तुझें चरित्र चरित्र झालें आहे. ईश्वर या कादंबरीचा गोड शेवट करो! असो.

विवाह हा सामान्यतः सर्वांसच इष्ट संस्कार आहे. असें माझें मत आहे. म्हणून या शुभ प्रसंगीं तुम्हा उभयतांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. तुमचा विवाह ठरला तेव्हां प्रभाकराचें जें मला पत्र आलें त्यांत आपण लग्न करणार नाहीं असें स्वतःविषयीं लिहिलें होतें. मला त्याचें हें मत एकदम चुकीचें वाटलें. तथापि सध्याच विवाहाची गरज पटऊन त्याचें मत अनुकूल करून घेण्याची आवश्यकता वाटेना म्हणून मी त्यास तेव्हां लिहिलें नाहीं. पण प्रभाकरासारखीं भावनामय व करारी माणसें एखाद्या मतास वाहून घेण्यापूर्वी

त्या मतांतील दोष त्यांस दाखवावे हें बरें. म्हणून तुझ्या द्वारां यासंबंधी मी माझें म्हणणें काय आहे तें थोडक्यांत मांडतों. माझ्या विचारावर त्याची श्रद्धा दिसते तेव्हां या लिहिण्याचा कांहीं उपयोग होईलही.

देशसेवेसारख्या सार्वजनिक कार्यात चरितार्थाची पंचाईत पडण्याचा क्वचित संभव असून कुटुंबभार अंगावर पडत असेल तर अडचणी अधिक येणार हें खरें आहे व येवढ्यामुळें सार्वजनिक कार्यकर्त्यांस विवाह न करतां संसार-पाशमुक्त राहणेंच योग्य दिसेल. पण याविषयीं एवढी एकच दृष्टि पुरेशी नाहीं. सार्वजनिक कार्यास गृहस्थाश्रम जसा एवढ्या एका बाबतींत नडतो तसा तो दुसऱ्या पुष्कळ दृष्टींनीं उपकारकहि झाला आहे.

बाल्यावस्था संपून यौवनावस्था सुरूं झाली म्हणजे पुरुषास सत्तेच्या प्रेमाच्या पत्नीची आवश्यकता वाटूं लागते. या भावनेची तृप्ती न करितां ती निर्मूल करण्याचा अत्याग्रह केल्यास मनाच्या शांततेचा निःसंशय भंग होतो. असा पुरुष मूळचा शांत असूनही अस्वस्थ, असंतुष्ट, त्रासिक, उतावळा व अविचारी बनण्याचा संभव असतो. त्यास दुर्व्यसनासक्त होण्याचाही मोह अनावर होईल. मग अशी मनोभूमि सार्वजनिक कार्यास अगदींच अपात्र. इतकेंच नव्हे, तर विघ्नकारक आहे. अंगीकृत राष्ट्रकार्याबद्दल अत्यंत आत्मीयत्व वाटूं लागण्याइतकी मानस पदवी प्राप्त होण्यास पुष्कळ काळ जाऊन तपश्चर्याही व्हावी लागते. पण या काळांत आपलेपणाच्या कौटुंबिक प्रेमाचा ओलावा ज्या मनास नसेल तें मन नेहमीं होरपळलेलें व अशांत राहील. राष्ट्ररूपी अव्यक्त ईश्वराचें कुटुंब हें व्यक्त प्रतीक आहे. व निर्गुण-निराकारांत लय पावण्याची शक्ति नसतां श्रीशंकराची शिलामय शाळुंका भक्त-जनांच्या जीवनास जशी जीवनरस पुरवितें तसेंच राष्ट्राशीं तादात्म्य पावण्यापूर्वी राष्ट्रसेवा करतांना राष्ट्रभक्तांस कुटुंबापासून समाधानाचें पोषण मिळत असतें. सार्वजनिक आयुष्यांत प्रत्यहीं अपयशाशीं टक्कर देतानां गृहस्थाश्रमानेंच आशावादित्व व खंबीरी राहते. आयुष्याच्या पूर्व भागांत गृहस्थाश्रम अवश्य मानणाऱ्या स्मृतिकारांनीं त्याची उभारणी मानस शास्त्राच्या सूक्ष्म परीक्षणावर केली आहे. विवाहाआधीं देशकार्याच्या बाता मारून संसारांत पडल्यावर हात

पाय गाळणारे कांहीं असतात, पण ते मुळचेच कच्चे असतात; विवाह न करूनही त्यांनीं कांहीं केलें नसतें. त्यामुळें विवाहाला दोषास्पद ठरवितां येत नाहीं किंवा देशकार्येच्छूनें विवाहबद्ध होऊं नये असें ठरत नाहीं. नेमस्त आहार न करतां प्रकृति बिघडवून घेणारे पुष्कळ असतात, पण म्हणून अन्नानें प्रकृति बिघडणारच, किंवा प्रकृति चांगली राखण्यास अन्न वर्ज केलें पाहिजे असें म्हणणे योग्य होईल काय ?

शिवाय ऐहिक सुखराशि असा जो गृहस्थाश्रम त्याचा बिंदुमात्रही चाखावयास न मिळणाऱ्यांनीं राष्ट्रभक्तीच्या निखाऱ्यांत स्नान करावें व त्यांचे यत्नफल संसारसुखांत लोळणाऱ्यांनीं आयतें भोगावें, यासारखा उपकारधर्मपरायण, आश्रमश्रेष्ठ गृहस्थाश्रमाचा दुसरा उपमर्दच नाहीं. गृहस्थांना ही शरमेची गोष्ट आहे.

देशभक्तानें आपल्या कुटुंबाचे हाल होऊं नयेत असें इच्छावें हें गैर नाहीं. पण देशभक्ताच्या देशसेवेचें मोल त्यास देऊन त्याचें पोषण करावें हें समाजाचेंही कर्तव्य आहे. देशभक्तांनीं जनतेकडून वेतन न घेतां फुकट देशभक्ति करावी व मग घरचें नसले तर भिकेनें पोट भरावें याचें नांव स्वार्थत्याग— असा देशभक्त पगारीहून श्रेष्ठ दर्जाचा—असें बनून राहिलेलें लोकमत अशास्त्रीय व कार्यनाशक आहे. यानें देशकार्य करण्यास पुरेशी लायक माणसें पुढें येणार नसून फुकट सेवा करून घेण्याची अनीतिकारक खोड जनतेंत वाढणार आहे. समाजसेवा हा ज्या ब्राह्मणांचा धर्म त्यांना पोसण्याचे कर्तव्य धर्मकर्त्यांनीं समाजास लावून दिलें होतें. तसें कर्तव्य या देशभक्ताबद्दल आज कोणास वाटत नाहीं, हें दुर्दैवाचें लक्षण आहे. सरकार नोकर नेमतांना फुकट काम कोण करील हें न पाहतां चांगले काम कोण करील हे आधीं पहातें, व मग त्या नोकराचें लक्ष एका नोकरींतच राहावें म्हणून नोकराच्या दर्जाप्रमाणें त्यास आर्थिक दृष्ट्या संतुष्ट ठेवित असतें. प्रस्थापित सरकारचा हा नियम सरकार होऊं इच्छिणारांनीं आधीं पाळावयास नको काय ? पोट बांधून लढाई कशी होणार ?

माझ्या वर्तमानपत्रांतून या मताचा मी जोरानें पुरस्कार करीत असतों. पण या विचारास लोकमत अनुकूल होईपर्यंत—अथवा आपल्या हयातींत न आलें तरी—कुटुंबासह सोसवतील तितके हाल सोसून होईल तें कार्य धैर्यानें व निष्ठेनें करीत राहणें हा एकच येथें मार्ग आहे. अविवाहित राहून देशसेवेस अक्षम होण्यापेक्षां विवाहितावस्थेंत सेवा करीत असतां कुटुंबाचे थोडेसे हाल झालेलेही पुरवले. निव्वळ संसारमग्न तरी असें काय सुख जेवतात !

असो. सुज्ञास अधिक काय लिहावें ? क. हे. वि.

आ. **वृंदावन**

प्रभाकरास हें पत्र गंगाधरानें दाखविलें. त्याला तें सर्व जरी समजलें नाहीं, तरी त्याचा मथितार्थ त्याच्या लक्षांत आला, व वृंदावनावरील श्रद्धेमुळें सध्यां विवाहाविषयीं विचारच करायचा नाहीं असें त्यानें ठरविलें.

विवाहोत्तर देवकी सासरीं राहण्यास आली. आतां तिला सासरमाहेर एकच झालें. कारण रामशास्त्र्यांनीं जेवणापुरती एका स्नेह्याकडे सोय करून बिऱ्हाड मोडून टाकलें. देवकीला सासरीं परकेपणा वाटण्याचें कांहींच कारण नव्हते. होतीं तीं माणसें जुन्या परिचयाचींच होतीं. विवाहानें सगुणाबाईशीं तिचें सुनेचें नातें आलें तरी त्या तिला आपल्या मुलीप्रमाणेच समजत. त्यांनीं तिचें माहेरचें नांव देवकी तेंच सासरीं चालू ठेविलें. यामुळें बदललेल्या नांवानें होणारी सासरची जाणीवही देवकीला होईना. आतां सासर या नात्यानें थोडें अधिक मर्यादेनें वागायला हवेंच होतें खरें. पण देवकीच्या शालीन स्वभावाला त्यांत अवघड कांहींच नव्हतें. वयाच्या मानानें तिचें सहज वागणेंच विनयाचें असें. पहिल्या पहिल्यानें गंगाधरास पहातांच तिला थोडी धांवपळ करावी लागे. पण अशी धांवपळ नववधू धाकानें किंवा विनयानेंच करीत नसतात तर त्यांत त्यांना एक प्रकारची हौस वाटत असते. कदाचित पतिमुख पहातांच होणारा आनंद पोटांत मावत नसेल, व त्या भरांत त्यांची धांदल उडत असेल; नाहींतर समोरून पतीकडे पहायला भीड वाटते म्हणून दाराआडून टक लावून पहायला मुली धांवत असतील झालें दुसरें काय ! गंगाधराची पण अवस्था तीच होई,

ओटीवर असला कीं आतांशा आईकडे त्याचें सारखें काम असे. तो पुन्हां पुन्हां घरांत आईकडे जाई व पुन्हां ओटीवर येई. नेहमीचें पायाखालचें माजघर पण तिथल्या अंधारांत तो आतां जपून आजूबाजूला निरखून पहात चाले. हो! अंधारांत ठेचबीच लागायची कदाचित. सैंपाकघरच्या दाराशीं एखादेवेळीं कोणा येणाराजाणाराच अडथळा होईच, पण आईनें विचारलेंच तर 'कांहीं नाहीं ग, दाराचा दगड लागला' असें तो उत्तर देई. बाकी आईच्या लक्षांत तें आधींच येत असेल. देवकीला आतां सगळया शेजारणी पुन्हां पुन्हां येऊन नांव घ्यायला सांगत. ती पुन्हां पुन्हां नाकारी! पण आग्रही बायका तिला घ्यायला लावतच; आणि एखाद्या बाईनें आग्रह कमी केला म्हणजे आग्रहानें जेवणाऱ्या भिक्षुकानें दुसराच लाडू नको म्हटल्याबरोबर वाढणाऱ्यानें हात आखडला असतां त्या भिक्षुकाचा जसा हिरमोड व्हावा तसाच तिचा हिरमोड होई. आणि त्या भिक्षुकाप्रमाणें, ती पुन्हा होईल त्या आग्रहास मात्र अगदीं टपून बसे.

लहानपणीं देवकी गंगाधराशीं कितीही खेळली सवरली असली तरी विवाहोत्तर पहिल्यानें जेव्हां एकांतांत गंगाधरांशीं गांठ पडली तेव्हां लज्जेनें तिची गाळण उडाली. ती जवळ न येतां दूरच जात आहे असें पाहून गंगाधरानें झटकन् पुढें होऊन तिचा हात धरला. तेव्हां एकदम तोंड फिरवून पुढें चालण्याच्या झोकावर ती त्याच्या हाताशीं ओढ घेऊन उभी राहिली. एकाच क्षणीं अस्थिर व अचल अशी तिची मनोरम अवस्था पाहून गंगाधर मोहून गेला. त्यानें तिला आपल्या बाहुपाशांत घेतलें व मग त्याच्या विशाल वक्षावर मस्तक ठेवून देवकी आनंदसागरांत पोहूं लागली त्या रात्रीं परस्परांनीं परस्परांच्या लहानपणच्या खूप आठवणी व उखाळया पाखाळयाही काढल्या, एकमेकांवर पुष्कळ प्रणयकोप केला. वटपौर्णिमेच्या प्रसंगाची आठवण गंगाधरानें काढतांच देवकी तेव्हांही भीतीनें घाबरली. बलदेवाची आठवण आतांशा केव्हांना केव्हां निघाली कीं तिचें काळीज थरारे! आतां वास्तविक गंगाधर सांनिध होता व त्यानेंच आपला विजयप्रसंग आठवून बलदेवाचें नांव काढलें होतें. पण तरीही देवकी भ्यालीच. व एक-

दम तिनें त्याच्या गळयास मिठी घातली. तिचें हृदय धडधडत होतें. गंगाधरानें तिला आश्वासन देऊन शांत केलें पहाटे गंगाधर निजून उठल्यावर तिनें पुन्हां गंगाधराच्या गळयांत प्रेमानें हात टाकला व अर्थपूर्ण नजरेनें त्याकडे पहात ती म्हणाली, "मला अंतर नाहींना देणार ?"

गंगाधरानें शद्बानें उत्तर दिलें नाहीं.

\+ + + +

आई, बाप व भाऊ यांप्रमाणें प्रभाकर देवकीवरही मनापासून प्रेम करूं लागला. किंबहुना तिचा त्याला विशेषच लळा लागला. ती त्याच्या बरोबरीची होती व ज्याच्याशीं ती अगदीं मोकळेपणीं बोलेल खेळेलही असा घरांत एकटा काय तो प्रभाकर होता. दोघेंही बुद्धिवान होतीं. रामशास्त्र्यांनीं देवकीकडून कांहीं कांहीं वाचून घेतलें होतें व पाठांतरही पुष्कळ करून घेतलें होतें. प्रभाकराचे गजाननावर ती त्याचेप्रमाणेंच प्रेम करूं लागली. गजाननासमोर बसून आतां तीं दोघे रोज स्तोत्रपाठ करीत. प्रभाकराचा अभ्यास तर तेथें होताच, व आतां देवकीही तेथें बसून कांहीं वाची. वृंदावनांचीं पत्रें प्रभाकरानें जपून ठेवलीं होतीं तीं त्यानें तिला दाखविलीं. तिला तीं सर्व पत्रें पूर्णपणें समजलीं नाहींत, तरी तिची वृत्ती पत्रें वाचतांना गंभीर झाली व अंतःकरणांतील संवादी भाव जागृत झाले. वाईट किंवा चांगले उद्बोधक विचार बुद्धींत शिरण्याच्याही आधीं भावनेचें वातावरण दूषित अथवा सुगंधित करतात, हा अनुभव पुष्कळांस असेल. वृंदावनांचें स्मरण असण्याचें तिला कांहीं फारसें कारण नव्हतें. वटपौर्णिमेच्या संकटप्रसंगीं वृंदावन गंगाधरासमीप उभे होते. तरी कोणा मनुष्यास निरखून पाहूं शकेल अशी देवकीची त्या वेळीं मनःस्थिती नव्हती. तरी पण तेथें वृंदावन तेव्हां होते ही गोष्ट प्रभाकराकडून कळल्यावर त्या प्रसंगाच्या स्मृतिपटलावरील चित्रांत तिनें वृंदावनांचें चित्र रेखाटलें. वृंदावन विवाहित असून त्यांच्या पत्नी अन्नपूर्णाबाई मॅट्रिकपर्यंत शिकल्या आहेत व त्या वृंदावनांना क्वचित लेखनाचे कामीं मदतही करतात, असें प्रभाकरास गंगाधरानें सांगितलें होतें तेंही त्यानें वहिनीला सांगितलें. तेव्हां तर अन्नपूर्णाबाईचा व आपला परिचय व्हावा अशी तिला इच्छा होऊन तिनें गंगाधराजवळ ती गोष्ट काढली. गंगाधरास ही गोष्ट आनंददायकच होती. पण तो

व्यवहारांत नुकतेंच पाहूं लागला असल्यामुळें सध्यां दोन वर्षे न जातां पुढें निश्चित जाऊं असें त्यानें तिला सांगितलें, व दोन वर्षे मराठी भाषेचा होईल तितका अभ्यास करून होईल तितकें इंग्रजीही शिकेन व अन्नपूर्णाबाईकडून वाहवा मिळवीन असेंही देवकीनें कबूल केलें.

+ + + +

"मला सुद्धां तुम्ही कराल तसली देशसेवा करतां येईल कांहो भाऊजी?" एक दिवस देवकीनें प्रभाकरास विचारलें.

**प्र.**—हो वहिनी काय आलं न यायला! अन्नपूर्णाकाकू सुद्धां सार्वजनिक कामांत वृंदावनांप्रमाणं पडतात. त्या स्त्रियांच्या सभांत भाषण करतात आणि तिथल्या बायका कपडे पण स्वदेशी वापरतात.

**दे.**—पण मग तें सगळं इथं कसचं होणार? इथं सभा कशी करायची? आणखी बोलायचं कसं हें कोण शिकविणार?

**प्र.**—माझ्या मनांत पुढं पुण्यासच राह्यचं आहे. या फुटक्या गांवांत कशाची आली देशसेवा?

**दे.**—मग तुमच्या बायकोला येईल करायला देशसेवा. आम्ही कुठून पुण्याला राहतों आतां?

तेथेंच पलीकडे गंगाधर एका पुस्तकांत डोकें घालून बसला होता; वरील वाक्य मुद्दाम त्याच्याकडे स्मितपूर्वक पहात देवकीनें उच्चारलें. तें जाणून गंगाधर म्हणाला—

"पण पुण्यास राहूनच देशभक्ति करतां येते असं नाहीं कांहीं! देश काय सगळा पुण्यांतच साठवलाय काय? येथल्या देशसेवा करणाऱ्यांनीं पुण्याला जायचं तर मग आमचा गांव कोण सुधारणार!

**प्र.**—पण येथें वर्तमानपत्र नाहीं, कधीं सभा भरत नाहीं नी कांहीं सुद्धां नाहीं.

**गं.**—नरी काय झालं? येथें लोकवस्ती आहेच ना? लोकांची सुधारणा करायची हीच देशसेवा! वर्तमानपत्रं नसलीं तर काढावीं. दुसरीं साधनं उत्पन्न करावीं.

**प्र.**—लोकांची सुधारणा करायची म्हणजे?

**गं.**—लोकांना लिहितां वाचतां येऊन आपले हक्क काय आहेत, व त्या-

करितां झगडावं व सामर्थ्य उत्पन्न करावं कसं हें लोकांना शिकवायला हवं. इंग्लंडच्या इतिहासांत या गोष्टीं तूं वाचल्याच आहेस.

**प्र.**—पण क्राम्वेलनं बंड केलं तसं करायला आम्हांजवळ शस्त्रं कुठं आहेत?

**गं.**—बंडाचा प्रश्न सध्यां लांब आहे. अजून प्रजेचे हक्क म्हणजे काय हें सुद्धां लोकांना समजत नाहीं.

**प्र.**—छे! इथले लोक कसचे सुधारतात! ते दिवशीं वेनीकडं पहात नुसते मेंढरासारखे उभे होते, पण एकाची नाहीं छाती झाली पुढं व्हायची!

**गं.**—पण स्वतां तूं तेव्हां तिथं होतास तो कां नाहीं झालास पुढं?

प्रभाकर ओशाळला, घोटाळला व म्हणाला—

"मला एकदम ध्यानांत नाहीं आलं—नी—थोडी भीतिहि वाटली."

**गं.**—तुला लाजविण्याकरितां मी विचारलं असं नव्हे! तुझा स्वभाव मी ओळखतों. पुन्हां असला प्रसंग आला तर तूं प्राणसंकटांत सुद्धां उडी घालशील हें मी जाणतों. माझं म्हणणं, कीं लोकांचंही असंच होतं. कित्येक पिढ्यांत त्यांना धैर्याचे प्रसंगच माहित नाहींत. यामुळं पहिल्यानं एकदम ते चकित होतात. त्यांची बुद्धी कुंठीत होते. आणि काय करावं हें सुचत नाहीं त्यांना. यांतच मग भीतीची आणखी भर पडते. फ्रान्स देशांत मेंढरासारखे पडून नाना प्रकारचे हाल व अपमान सोसणारे लोक तशी वेळ आली तेव्हां लांडग्यासारखे शूर व क्रूर बनले, हा इतिहास तुला अवगत आहे. अशा मानसधर्मसंशोधक पद्धतीनं इतिहास शिकवीतच नाहीत, यामुळं मुलांना त्याचं रहस्य कळत नाहीं, गोडीही लागत नाहीं.

**देवकी**—पण बायकांनीं करायचं देशकार्य कसलं?

**गं**—पुष्कळ आहे! बायकांना लिहायवाचायला शिकवावं. स्त्रियांच्या चालीरीतींची गंभीरपणें चर्चा करावी. पडवीच्या जोत्यावर बसून रिकाम्या सारा गांवच्या गप्पा मारायच्या त्या असं कांहीं लिहिलं, वाचलं, बोललं तर बिघडेल वाटतं?

**दे.**—हो, आम्ही घरच्या पडवीच्या जोत्यावर तरी बसतों. पण शाकंबरीच्या नाहीं तर शनीच्या कट्यावर नाहीं तर पिंपळाच्या पारावर बसून चटोरपणानं बायकांवर टीका करीत पुरुष बसतात तें कुठं गेलें?

**गं.**—पण सांग, मी कधीं बसतों का ? ज्यांच्या बायकांना नवऱ्यांनीं असं तिथं बसणं आवडत असेल ते बसत असतील.

**दे.**—हो ! तोही दोष बायकांचाच का ?

**गं.**—अग, खरं आहे मी म्हणतों तें ! बायकांच्याच अभिरुचीनं पुरुष वागतात. पूर्वींच्या काळीं वीर, शिपाई, मजबूत, धैर्यवान, असा पति असला कीं बायकांना तो पसंत पडे. म्हणून पुरुष तसं होण्याचा प्रयत्न करीत. आज पति अशक्त भित्रा असला तरी तो बायकांना चालतो–नव्हे तोच बरा वाटतो–कारण त्याचा जीव धोक्यांत येण्याचा संभव तितका कमी ! म्हणून पुरुष धैर्यवान होत नाहींत.

**दे.**—बायका सांगतात वाटतं पुरुषांना भित्रं व्हायला ?

**गं.**—अग, सांगायलाच कशाला हवं ? त्या दिवशीं "त्या पोरीवर त्या राक्षसानं हात टाकला आणि आणि षंढासारखे तुम्ही पहात बसला कसे ?" असं एका तरी बायकोनं तिथल्या पुरुषांना घरीं गेल्यावर विचारलं असेल असं वाटतं तुला ? उलट 'बरं झालं बाई आपण नाहीं ना कांहींही बोललां तिथं ?' म्हणून साऱ्यांनीं नवऱ्यांचीं कौतुकंच केलीं असतील

**दे.**—पण बायकांना मुळीं पुरुष करतील तें चांगलंच वाटतं.

**गं.**—तसंच केवळ नाहीं कांहीं. नवरा–बायकांच्या धुसफुसी बाहेर येत नाहींत एवढंच काय तें ! परमेश्वरापेक्षांही बायकांची आराधना कठीण ! पण तें राहो ! लग्नाआधीं नवरा कसला हवासा वाटतो बायकांना ?

**दे.**—इश्श, मुलींना आधीं विचारतो कोण ?

**गं.**—अस्सं, तर मग सास्वांना जांवई कसला आवडतो ?

**दे.**—मला मुळीं आई नव्हतीच !

मोठाच हंशा पिकला ! देवकीला आपण जिंकली असें वाटलें.

**गं.**—अग, तूं आपल्यावर नको ओढून घेऊस ! मी सर्वसामान्य विचारतों.

**दे.**—तर मग जांवई चांगला हवा असं कुणालाही वाटणारच !

**ग.**—कबूल, पण चांगला म्हणजे कसा ? समज, एक मुलगा तरुण रूपवान विद्वान असून मोठा सरकारी पगारदार आहे, अगदीं मोठ्या पेन्शनीची नोकरी आहे. त्याला दुसरा आहे तोही तरुण रूपवान थोडा अधिकच हुषार आणि विद्वान

पण गरीब आहे, वर्तमानपत्राचा संपादक आहे, वेळीं टिळकाप्रमाणं तुरुंगांत जाण्याचा त्याला प्रसंग आहे. यांतला आतां कोणता जांवई एखादी सासू पत्करील सांग ?

देवकी अगदीं लाजली ! लगेच प्रभाकर उसळून खिदळत म्हणाला, " हो हो दादा, सरकारी नोकरच पत्करील खराच ! वहिनी——"

**गं.**—कां ? आतां कां उत्तर नाहीं ? मीं म्हणतों तें खरंच खरं आहे. मराठेशाहींत एखाद्या कारकुनी पेशाच्या मुलाला मुलगी देण्यापेक्षां महत्वाकांक्षी, स्वारी शिकारीवर जाईल, पराक्रम करून नांव मिळवील अशा शिलेदारालाच जांवई म्हणून अधिक पसंत करीत. बायकांची रुचि पालटली तसे पुरुषही पालटले. अग, बाहेर सुधारक असला तरी आज नवरा बायकोकरतां सोवळं नेसतो. श्रद्धा नसली तरी सत्यनारायण करतो. परवां महायुद्धांत लग्नं ठरलेल्या मुलींनीं लढाई सुरू होतांच लढाईवरून जाऊन याल तर लग्नं करूं असं आपल्या भावी यजमानानं सांगितलं म्हणतात, तेव्हां तिकडे कैक तरुण समरांगणावर धांवले. त्यांत देशभक्तिप्रमाणं पुष्कळांना स्त्रीप्रेमानंही प्रेरणा दिली होती, आणि आमच्या इथें पुष्कळ तरुण लग्नाआधीं देशभक्तीच्या गप्पा मारून लग्न झाल्यावर हातपाय गाळतात, असं वृंदावनांनीं लिहिलं. मला वाटतं याचं कारण स्त्रियांची तशी अभिरुचिच होय.

**दे.**—बायकांना काय, पुरुषांनीं शिकवावं तशीं त्यांचीं मतं नी आवडी बनतात.

**गं.**—हें मात्र अगदीं खरं बोललीस ! स्वतां कितीही विद्वान, हुशार, प्रागतिक, स्वतंत्र विचारी, देशसेवक पति असला तरी यांतलं आपल्या बायकोच्या वाट्याला थोडंसं यावं असं कांहीं पुरुषाला वाटत नाहीं. बाहेर हे किती गंभीर विचार करोत, महत्कार्यें करोत, घरांत बायकांपाशीं आपल्या यांच्या जेवणखाण, कपडेलत्ते, दागदागिने, औषध दुखणी, सणवार, लग्नकार्यें यांच्या गोष्टी, खुद्द स्त्रीसमाजाविषयींच्या बाहेरच्या चर्चाही बायकोजवळ कधीं बोलायचे नाहींत. स्त्रीस्वातंत्र्याच्या पुरस्कर्त्यांना स्वतांच्या बायकोचा 'बुद्धिभेद' करायला नको. बाहेरच्या कोणच्याही वर्णनानं बायकांना देशभक्त नवरे ओळखतां यायचे नाहींत, इतक्या त्या नवऱ्याच्या सार्वजनिक आयुष्याशीं पारख्या

असायच्या. वृंदावनांबरोबर पुण्यास मी थोरामोठ्यांच्याही घरचा कानोसा घेतला, पण सैपाकघरांत घरच्याच मंडळींत जेवतां बसतांना बायकांसह एकादा मोठा माणूस कांहीं गंभीर चर्चा करील किंवा भारदस्त भाषण करील, तें नांव नको. प्रभा, अरे कांहींतर असे म्हणणारे बहाद्दर आहेत कीं " आम्ही बाहेर सारा दिवस गंभीर बोलतों वागतों, आतां घरांत सुद्धां एवढा डोक्याला शीण द्यावा हा जुलूम बुवा ! बायकांशींही जर आम्ही आतां गंभीर चर्चाच करायची किंवा त्यांनीं आमच्या मतावर निस्पृह टीका केलेली ऐकायची तर मग सुखाश्रमाची छायाच नाहींशी झाली म्हणायची ! " आम्ही सदाच गंभीर विषयांवर बोलावं म्हणत नाहीं. पण सार्वजनिक विचारांची पुरुषांप्रमाणं स्त्रियांनाही ओळख असावी इतकंच आमचं म्हणणं. पण येवढ्यानं यांच्या गृहसौख्याचा अगदीं उन्हाळा होतो. आपलं मूर्ख अर्धं अंग घरीं ठेवून उरलेले हे अर्धशहाणे समाजांत वावरत असतात. नवरा केवढाही विद्वान बुद्धिवान् असला तरी त्याचे विचार समजायला बायको कांहीं तितकीच हुशार असायला नको. विचार सुचायला लागते तेवढी सगळी बुद्धि कांहीं तो विचार समजायला लागत नाहीं. शहाण्या माणसानं पुष्कळ वाचनानं मननानं बसविलेला एकादा विचार अनेकवार अनेक प्रकारें बोलला, चर्चा केली, दुसऱ्याला त्यावर बोलूं दिलं कीं शहाण्याचा विचार कांहीं दिवसांनीं सहजासहज समजूं लागतो व सामान्य मनुष्य सुद्धां युक्तिवाद करूं लागतो. त्यालाही पुन्हां शहाण्या माणसाइतकंच सगळं वाचावं लागतं किंवा अभ्यासावं लागतं असं नाहीं. वेदांताचीं तत्वं समजणाऱ्या बायकांना राजकारण नी समाजकारण न समजायला झालंय काय ? निदान जितपत वेदांत कळतो तितपतच तरी राजकारण आणि समाजकारण कळेल कीं नाहीं ? रामायण महाभारताच्या कथा जर त्यांना येतात तर शिवाजीचं, गोखल्यांचं, रानड्यांचं, टिळकांचं, मॅझिनीचं, क्रॉम्वेलचं, नेपोलियनचं चरित्र त्यांना कां नाहीं कळणार ? पण हे विद्वान पुरुष घरीं कधीं बोलतील तर ना ! शंभर पुस्तकं वाचून येणार नाहीं इतकं शहाणपण एका शहाण्याशीं पुन्हां पुन्हां बोलल्यानं येतें. आमच्या देशाची स्थिति सुधारत नाहीं याचं कारण आमच्या स्त्रिया मूर्ख आहेत हे होय ! मला तर वाटतं कीं समाजसेवकांची शक्ति जर आज

खरीच मर्यादित असेल तर त्यांनीं ती सर्वच्या सर्व समाज सुधारण्यांत व्यर्थ न खर्चतां ज्या लोकांतील पुरुषांची सुधारणा झाली त्यांतील स्त्रियांचीही ताबडतोब सुधारणा करावी, त्यांना शिकवावं, सुधारावं, देशकार्य समजून द्यावं. सुधारणेचे रिकामे चोचले मला अगदीं आवडत नाहींत. पण स्त्रियांची योग्य उन्नति जरूर झाली पाहिजे. एका सुशिक्षित पुरुष समाजाच्या स्त्रियाही सुधारल्या तर तेवढा सगळा समाज सुधारला असं होईल. मग जो पुरुष देशकार्य करील त्याला तरी त्याच्या बायकोची मदत मिळेल. आणि ' बायकोमुळें कचरलों ' ही सबब तरी इतरांना राहणार नाहीं. आजच्या या निव्वळ पुरुषी समाजसुधारणेनें सर्व समाजाच्या अर्धांगाचीच सुधारणा होत आहे. शंभर घरं बांधावीं पण एकावरही छप्पर किंवा कांहीं आवरण नसावं, म्हणजे जसा त्यांचा उपयोग नाहीं तसंच आजच्या सुधारणेचं. सुधारलेलं एक अर्धांग कितीही चपळ, तर-तरीत असलं तरी त्याचं घरांत असलेलं दुसरं अर्धं विकलांग त्यांस हालूं चालूं देत नाहीं आणि निरुत्साही करतं. पुरुषांच्या लक्षांत ही गोष्ट अजून यावी तशी येत नाहीं इथं नाइलाज आहे पण ज्यावेळेला ही गोष्ट पुरुषांना सुचेल व पटेल त्यापुढं आजवर लागला त्याच्या दशांश वेळही समाज पुढें यायला लागणार नाहीं. कार्यकर्त्या माणसांची उणीव हेंच खरं विघ्न आहे. आणखी स्त्रिया सुधारल्या कीं तें खात्रीनें नाहींसं होईल.

**प्रभाकर**—दादा सगळ्या लोकांना असं वाटूं लागेल कारे ?

**गं.**—अरे हो ! त्यांत काय ? घरीं दारीं नेहमीं कानावर मोठे विचार पडा-वेत म्हणजे सहज मग आपल्या मनालाही तसे विचार करण्याचं वळण लागतं. इथं मोठ्या माणसांनीं सुद्धां जे विचार समजून दिले तरी समजत नाहींत, ते पुण्यांत शाळेंतलीं मुलं आपसांत नेहमीं बोलतात. अरे पण हो—माझा मुद्दा मी विसरलोंच. हं, मग काय? पुरुषच बायकांचीं मतं बनवितात हें मला कबूल, पण अखेर बायकांच्या मुळच्या किंवा बनलेल्या मताप्रमाणं पुरुष वाग-तात एवढं खरं ना? अग त्यांत पुरुषांची थोडीशी लबाडी खरीच ! देशभक्तीची गोडी बायकांना लागल्यावर त्या नवऱ्यांनाच जर देशभक्ति करायला सांगूं लागल्या तर ! अशी पुरुषांना भीति वाटत असेल म्हणून ते बायकांना घरच्या

सैपाकांत रमवून ठेवत असतील; पण त्यांतसुद्धां बायकांच्या मताला रुचीला किंवा उपदेशाला पुरुष किती भिऊन असतो तें पहा म्हणजे झालें.

सासूबाई पुराणास गेल्या त्या परत येण्याची वेळ झाली म्हणून देवकी उ-ठली, पण गंगाधरानें तिला ‘इच्छा असेल तसं देशकार्य करण्यास मी तुला जरूर संधि देईन’ असें आश्वासन दिलें. “मीही आतां येथें स्थाइक झालों असल्यामुळें कांहीं सार्वजनिक कार्य उभारावं असं योजतों आहे” असेंही तो बोलला.—इकडे ईश्वरी योजना कांहीं वेगळीच बनत होती.

: ८ :

ब.—असलं ओंगळ धारिष्ट कांहीं आपल्या हातून होणार नाहीं.

स.—तर मग महाराजांनीं मनांतलं बोलायला लावून आम्हांला मात्र पा-पांत पाडलं म्हणायचं! आतां आपल्या तोंडून ही गोष्ट फुटण्यापूर्वीच आह्मांला पोबारा केला पाहिजे. नाहीं तर तो सैतान बाबासाहेबांकडून माझी मुळीन् मुळी खणून काढील.

ब.—अरे पण मी कसा कुठें बोलेन?

स.—कां? त्याला काय हरकत आहे? आपण आमचा कांहीं दुष्टावा साधाल असं माझं म्हणणं नाहीं. पण आमची किंमत ती किती? आमच्यासारखीं पायाचीं खेटरं आपल्याला हवीं तेवढीं मिळतील. तेव्हां सहज प्रेमांत येऊन कुणाशीं बोललांत आणि तेवढ्यानं झालं आमचं वाटोळं, तर आपलं कांहीं थोडंच अडणार आहे.

ब.—अरे असं काय तुझ्या नी माझ्या काळजाचं पाणी करतोस?

ह.—आपलीच कसूर आहे महाराज!

ब.—ती कशी काय बाबा?

ह.—आमचा अपमान झाला तो राहो! पण त्या शास्त्र्यानं अपमान केला तो तर आपला आणि बाबासाहेबांचा ना? धन्याच्या अपमानाची लाज नोकराला आहे पण धन्यालाच नाहीं! उलटा तखदीर! दुसरं काय?

ब.—पण असला भयंकर सूड कसा घ्यावा?

स.—'राजे लोकांचं घरांत लक्ष नसतं' असा ठोसला त्या शास्त्र्यानें मारला,

त्याचा अर्थ किती वाईट आहे हें आपल्या ध्यानीं नाहीं आलं वाटतं.

ब.—पण मींच बाबासाहेबांना विचारलं तेव्हां 'आमचं वर्तन सरळ असतं तर तो सच्छील ब्राम्हण असं बोलला नसता' असं ते बोलले. मग मी काय करणार ?

स.—असा अभिमान सोडला म्हणून तर आतां प्रजा विचारीनाशी झाली त्यांचं एक राहो. त्यांचे आतां पंचाण्णव गेले पांच उरले. पण गादी सगळी चालवायची आपल्याला ! आपण वेळींच जरब न बसवाल तर पुढं कसं व्हायचं ?

ह.—रंडीलासुद्धां रंडी म्हटलं तर खपत नाहीं.

स.—मग ठरतो कां आपला विचार ?

ब.—तुमचं सगळं म्हणणं मला पटतं पण मला अजून धैर्य होत नाहीं.

स.—आपली इच्छा नसल्यास आणखी कांही दिवस मी ही गोष्ट काढणार नाहीं.

बलदेवास झोप येऊं लागली हसन व सख्या यांनीं निरोप घेतला.

\+ + + + +

देवकी गरोदर असल्याचा सगुणाबाईना संशय येऊं लागला. लवकरच हा चांगल्या गोष्टीचा संशय असूनसुद्धां खरा ठरला. देवकीची नाना प्रकारची हौस होऊं लागली. तिला माहेरचें कोणी नाहीं याचं तिच्या मनास वाईट वाटूं नये याकरितां सगुणाबाईनीं तिची सर्व प्रकारची हौस केली. दिवसमासांनीं गर्भ वाढूं लागला व आधींच तेजस्वी असलेलें देवकीचें मुख अधिकच उल्लसित झालें. नवमास पूर्ण होऊन देवकी प्रसूत झाली व सर्व कुटुंबीयांना आनंदून टाकणारा बालार्काप्रमाणें तेजस्वी बालक देवकीचे उदरीं आला. मुलगा सामुद्रिकाला दाखविला. त्यांनीं सर्व ऐश्वर्यसूचक लक्षणांनीं बालक विभूषित असल्याचें सांगितलें व रत्नाकरांनीं भविष्यवाद्यास पुष्कळ द्रव्य देऊन संतोषित केलें.

तीन महिने झाल्यावर बालकास घेऊन देवकी हिंडूं फिरूं लागली. आतांशा ती त्यास घेऊन रिझविण्याकरितां घराभोंवतालच्या बागेंतून फिरत असे.

\+ + + + +

**हसन**—आतां किती दिवस वाट पहायची ?

**सख्या**—तो भेकड नाहीं तयार होत ना !

**ह.**—नाहीं. येना ! तूं नी मी बस् ! तुम्ही हिंदू डरतां भारी !

**स.**—तूं नोडग्या मोठा धीट रे ! जा ना मग एकटाच ! मी तरी कशाला हवा तुला !

**ह.**—अरे यार, घुस्सा नको करूं ! भाई तुझ्याशिवाय माझ्यानं फत्ते नाहीं व्हायची !

**स.**—मग जरा दमानें घे ! आतांच जाऊं त्याच्याकडं. आधीं मी जातों. तूं आड उभा राहा. तो ऐकत नाहीं असं वाटलं कीं मी त्याला जास्त पाजतों. मग तूं ये आंत आणि कांहीं करून मोटारची परवानगी काढ. मोटारवाल्याला खणखणीत जादूनं मी भारून ठेवलंय कधींच. पुढचं बोलायला नको.

ते दोघे तडक बलदेवाकडे गेले. यज्ञेश्वर तेथें नव्हता. हसन दिवाणखान्या-बाहेर थांबला. आंतील भिंतीशीं बलदेव कोच टाकून पडला होता. सख्या आंत जाऊन त्याच्या कानाशीं लागला.

**ब.**—काय म्हणतोस बाबा ? नाहीं माझी तयारी. पुन्हां मला विचारूं नकोस!

**सख्या**—मग राह्यलं ! आपऽं काय ? आपल्या पायाचीं खेटरं आम्ही. आपल्याबाहेर काय म्हणून जाऊं ! युवराजसाहेबांच्या मनाला त्रास दिला त्याची माफी असावी.

**ब.**—छेरे ! तुम्हीं माझ्याकरतांच झटतां ना ?

बलदेवानें एक ग्लास घशाखालीं घातला.

सख्यानें आणखी एक ग्लास भरला.

**ब.**—नको पुरें ना आतां !

**स.**—छे! महाराजांची तब्बेत आज अगदीं खूष झाल्याशिवाय मला नाहीं चैन पहायचं !

सख्यानें दोन तीन ग्लास एकसारखे भरून दिले तेवढे घेऊन बलदेवानें

सख्याला समजविण्याचा प्रयत्न केला. बलदेव लवकरच गुंगूं लागला. तोंच हसन आंत आला.

ह.—महाराज आज चांद केवढा मोटा येईल. फिरायला चलतां कां? मोटार आणवूं?

"हो आण!" बलदेव झिंगत म्हणाला व लगेच धुंद होऊन पडलाही. "पड आतां खुशाल!" असें म्हणून हसन व सख्या बाहेर निघून गेले.

\+ + + +

अजून सूर्यबिंब अस्ताचलावर लोंबत होतें. तोंच पूर्व दिशेंतून चंद्र-बिंबही चांगलेंच वर आलें. या दोन बिंबांची स्पर्धा चालू असतां त्या दोन बिंबांशी तिसरें एक बिंब रत्नाकरांच्या पुष्पवाटिकेंत बसून स्पर्धा करीत होतें. सर्व जगतास प्रफुल्लित करणारा दिननाथ अस्तास चालला म्हणून दुःखानें वेली म्लान झाल्या होत्या, व देवकी त्यांच्या डाहळया धरून जणूं त्यांची समजूत करीत होती. आतांशा गंगाधर पेढीवर जात असून संध्याकाळीं चांगला दिवसास परत येई व चहा घेऊन परत फिरायला बाहेर पडे. पण आज अजून तो घरीं आला नव्हता, म्हणून बागेंत फुलें काढण्याच्या निमित्तानें ती त्याची मार्गप्रतीक्षा करीत होती. ती फाटकाबाहेर येऊन पुनः पुनः दूरवर पाही व पुन्हा परत येऊन बागेंत फिरूं लागे. हळूहळू सूर्य अस्तास गेला. तिन्हीसांज होऊन चंद्र अधिकाधिक तेजस्वी होऊं लागला. फाटकाजवळ कोणाची चाहूल आली. देवकीनें पुढें होऊन पाहिलें पण कोणीच नव्हतें. पुन्हां ती बागेंत फिरूं लागली पण आतां एवढ्या कातर वेळीं सासरवाशिणीनें बाहेर फिरणें तिला इष्ट वाटेना. म्हणून घरीं जाण्याचा तिनें विचार केला, व पुनः एकदां बाहेर पाहून आंत जावें म्हणून ती फाटकाकडे वळली, इतक्यांत—

——कोणीतरी येऊन तिचें तोंड एकदम दाबून धरलें व मग दुसऱ्यानें डोळे व तोंड धोतरानें अगदीं गच्च बांधलें. आपणास उचलून मोटारींत ठेवलें आहे असें तिला वाटलें. मोटार चालू झाली; हात पाय जखडले गेले होते. थोड्याच वेळांत मोटार थांबली. बराच वेळ दोघेजण आपणास वाहून नेत आहेत, असें तिला भासलें. पाठीमागून दारें लावून घेतलीं जात. शेवट-

च्या दाराशा कांहीं तक्रार झाली. कोणीतरी आंत येऊं इच्छीत होता, पण त्यास घेतले नाहीं. ' पाहून घेईन! " पुन्हां दार लागलें. देवकीस उभें करून तिचे डोळे सोडण्यांत आले तों———तों काय? तिला अंधेरी आली. 'आपण-स्वप्नांत नाहीं?' डोळे चोळण्याकरितां ती हात वर करूं पहात होती, पण ते मागे बांधलेले. तोंडांत बोळा असल्यानें शब्द उमटेना समोर खांबास एक पुरुष जखडून बांधला होता. त्याचे तोंडांतही बोळा असावा. दिवा बारीक असल्यानें स्पष्ट कांहीं दिसत नव्हतें. तो बांधलेला माणूस कोण असावा? तिला शंका आलीच! एकानें दिवा मोठा केला तों—तो गंगाधर! जवळच्या दोघांनीं देवकीस गंगाधराच्या अगदीं जवळ उभें केलें.

" काय पछानतोस मला! हरामजाद्या! हींच मला हंसली! तूं अन तुझ्या बापानें युवराजांचा अपमान केला!"

" आणि माझी सारी दौलत तुझ्या बापाच्या मढ्यावर घातली."

गंगाधराचे डोळे खदिरांगारासारखे लाल झाले होते. त्यास उभ्या उभ्याच मूर्च्छा आली.————बऱ्याच वेळानें तो शुद्धीवर आला.

\+ + + + +

दारास कोणी धक्के दिले. त्या दोन काळ पुरुषांनीं एकमेकाकडे पाहिलें. लगेच त्यांनीं देवकीस गोणांत घालून तिची मोटळी बांधली. पुढें गंगाधराची ही तशीच मोटळी झाली. एकानें दार उघडलें. दोघे दोन बोचकीं घेऊन धूम पळाले गंगाधराने बलदेवाचा जड व अडखळणारा शब्द ऐकला. थोड्याच वेळांत मोटारींतून त्यांना नेण्यांत आलें व बोचकीं खालीं टाकून मोटार भरधांव पुढें निघून गेली. पुन्हां मोटळी भोंवतीं गडबड सुरू झाली दोऱ्या कापल्या-गेल्या. पहिल्यानें देवकी बाहेर आली. तिचे हात पाय मोकळे केले गेले. गंगाधरही बाहेर येऊन मोकळा झाला. प्रभाकर आश्चर्यचकित होऊन फाटकाच्या दाराशीं उभा होता. भय्याजवळ मूल रडत होतें. तें धांवत जाऊन घेऊन देवकीनें स्तनाशीं धरलें. इतकें होण्यास अर्धक्षणही लागला नसेल. तोंच ' मी जातें हो ' म्हणून देवकी मुलासह धांवली. ' तर मग मीही आलोंच ' म्हणून गंगाधरही मागोमाग धांवला घराच्या मागं विहीर होती तिकडे तीं उभयतां गेलीं. मागली माणसेंही पाठोपाठ धावलींच पण तीं पोचण्याच्या पूर्वींच

—'धाड धड धाड धड!'—जिकडे तिकडे हाहाःकार झाला. प्रभाकरास दिशा शून्य झाल्या. रत्नाकरांची कंबर खचली.

रात्र पडल्यापासून शोध चालू होता. वाड्यांतही वर्दी गेली. पोलिसांतही कळविलें. बऱ्याच वेळानें एकाएकीं दाराशीं मोटार पाहून प्रभाकर व रत्नाकर दचकले. पुढील प्रकार इतका जलद घडला कीं आश्चर्यानें सर्वांची कल्पनाशक्तिच कुंठित झाली.

"हो! ती युवराजांचीच मोटार" प्रभाकर कांहीं निश्चय झाल्याप्रमाणें म्हणाला. सगुणाबाईंना मूर्च्छा आली होती. त्यांना डोक्यावर पाणी घालून प्रभाकरानें सावध केलें. शेजारी पाजारी जमा झाले. दोऱ्या, गळ विहिरींत सोडले. प्रथम गंगाधर वर निघाला, पण त्यास डोक्यावर जबर जखम झाली होती. "प्रभा——प्रभा-----" प्रभाकर जवळ आला. "हो सूड घेईन!" गंगाधराच्या भग्न मस्तकावर हात ठेवून त्याच्या तोंडाशीं तोंड नेऊन प्रभाकर म्हणाला. तेवढाच शब्द गंगाधरानें ऐकला व तोच शेवटचा. इतक्यांत देवकीही वर आली. तिनें अजूनही मुलाला घट्ट कवटाळून धरलें होतें. मुलाचें डोकें फुटून सर्वनाशच झाला होता. देवकीचेंही डोकें फुटलें होतें. नाडी थोडी चालू होती. तीही लगेच थांबली.

+ + + +

देवकीस घेऊन जाणारे दोन इसम सख्या व हसन यांनीं मार्गांतील सर्व द्वारपाळांची मूठ दाबून ठेवली होती. शेवटच्या दरवाजाच्या रखवालदारास संशय आला. कांहीं सावजही येतांना दिसलें. त्याची जिभली पान्हवली.. अनीतिमान उन्मत्तांच्या पदरचीं माणसें धन्याच्या गुणांत धन्यापेक्षांही सुतराम् श्रेष्ठ असतात. आंत खांबास बांधलेल्या मनुष्याबद्दल या रखवालदारास कांहींच वाटलें नाहीं. हसन व सख्या यांनीं आपणास आंत न घेतां दार लाऊन घेतलें यामुळें तो जळफळला. त्यानें विश्वासघात करण्याचा निश्चय केला. ज्या पापकृत्यास आपण साथी आहोंत असें त्यास उघड दिसले त्यांत विश्वासघातानें कांहीं विशेष भर घालतों असें मानण्यास त्याला कारण नव्हतें. त्यानें त्या महालाला बाहेरून कडी लावून हलकेंच पक्का टाळा ठोकला. व तेथून बलदेवाचे कानीं ही वार्ता घालण्याकरितां तो धांवला. चालू प्रकार

राजवाड्याच्या तळघरांत गुप्त जागीं चालू होता. इतक्या खोलांतून वर दिवाणखान्यांत येण्यास त्याला बराच वेळ लागला. हा खाजगीकडील हुजऱ्या असल्यानें त्याला कोठेंही मज्जाव नव्हता. बलदेव धुंद पडला होता. त्यास गदागदा त्यानें हलविलें. बऱ्याच खटपटीनें त्यास थोडेसें शुद्धीवर आणतां आलें. बलदेवानें हकीकत ऐकली. तो घाबरलासा दिसला. उभा राहिला. पाय आधींच लटपटत होते. आणखी एक नोकर बोलावून त्या दोघांच्या साह्यानें तो तळघरांत गेला. झोकांड्या जात होत्या. डोळे अर्धवट उघडे होते. कुलुप न उघडतां आंतील दोघांस पोलिसाकडून गिरफदार करावें अशी द्वारपालानें सल्ला दिली, पण तें बलदेवास मानेना. त्यानें कुलूप काढविलें व दारावर थाप दिली. थोड्याच वेळांत दार उघडून दोन गाठोडीं घेऊन दोघे बाहेर आले. "काय केलेंत हें?" बलदेवानें दीनवाणें अडखळत व कांपऱ्या आवाजांत विचारलें. "परत आल्यावर सांगतो." हसन म्हणाला. व ते दोघे पळाले. द्वारपाळ अडवूं इच्छीत होता. पण बलदेवानें त्यास तसें करूं दिलें नाहीं. तो खिन्न होऊन दिवाणखान्यांत येऊन बसला. थोड्या वेळानें सख्या व हसन आले ते दोघे पायांत डोकी घालून बलदेवाचे दोहो बाजूस बसले. कांहीं वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं.

"आतां बाबासाहेब काय म्हणतील?" कांहीं वेळानें कोचावर अंग टाकून बलदेव म्हणाला.

"आम्हीं केलं तें त्यांच्या नी आपल्या अपमानाचा सूड घेण्याकरितां केलं. आमचा कांहीं त्यांत स्वार्थ नव्हता. आपण सूड घ्यावा म्हटलं तें आपण केलं नाहीं. आम्ही खाल्लेल्या अन्नाला जागलों. आतां या गोष्टी बाबासाहेबांपर्यंत जाणार व तशा त्या जाऊन आपण आम्हांला पाठीशीं घालणार नसलां तर पुढें जे धिंडवडे व्हायचे त्यापेक्षां आपल्या चाकरीवर असतां आतांच आपल्याच हातून शेवट व्हावा. हसनभाई, घ्या आपल्या अल्लाचें नांव! जयशंकर!" असें मोठ्या अभिनयानें बोलून छाती उघडी करून गुडघे टेकून सख्या बलदेवासमोर खडा बसला व त्यानें त्यानें एक भरलेलें (?) पिस्तुल बलदेवापुढें केलें. संस्थानिकांच्या खाजगींत वाढल्यामुळें सख्या दरबारी भाषा, हावभाव यांत चांगला पटाईत होता. त्याचा तो अविर्भाव पाहून बलदेव गहिंवरला. त्यानें त्या दोघांस

हातीं धरून कोचावर बसविलें. आतां तो उलट त्यांचीच समजूत घालूं लागला. व जें दुष्कृत्य स्वतां करण्यासच नव्हे तर परभारें होऊं देण्यासही तो तयार नव्हता तें आतां स्वतांस मध्यें घालूनही पचविण्याचें त्यानें वचन दिलें.

दुसरे दिवशीं सकाळीं गंगाधर व देवकी यांच्या अनर्थकारक मृत्यूची बातमी हां हां म्हणतां गांवांत पसरली. हरवलेल्या दंपत्याचा शोध करण्याकरितां चाललेल्या गडबडींत भाग घेणाऱ्यांनीं मोटाळीं टाकणारी मोटार बलदेवाची आहे हें पाहिलें होतें. ही गोष्ट अर्थात् गांवभर झाली. वटपौर्णिमेचा प्रसंग जुना असला तरी ठळक म्हणून लोकांच्या स्मरणांतून गेला नव्हता. तो लोकांच्या स्मृतीवर उजळून दिसूं लागला. तो प्रसंग, गंगाधर-देवकीचें अकस्मात हरवणें, बलदेवांच्या मोटारींतून त्यांचीं गांठोडीं पडणें व भयंकर आत्महत्या या सर्व तुटक धाग्यांचा सरळ बनला तसा कथापट लोकांनीं आपल्या ठिकाणीं स्वतंत्रपणें तयार केला. प्रत्यक्ष कोणत्याच पुराव्याला तसें कांहीं साधन नव्हतें, व स्वतः रत्नाकरासारख्या अब्रूदारास असल्या प्रकारांत पुराव्याची विचिकित्सा किळसवाणीच वाटली. यामुळें लोकमतानें बलदेवावर सहज लादलेल्या संपूर्ण जबाबदारीची शहानिशा होण्यासारखी नव्हती. उलट अर्ध्यावरून सगळें बोलणाऱ्या लोकमतास अशी शहानिशा कधींच नको असते. सामान्य लोकांप्रमाणेंच अधिराजासही शंका आली. त्यांनीं बलदेवास विचारून पाहिलें, पण त्यानें कांहींच थांग लागूं दिला नाहीं. त्याच्या दुष्ट मंडळाचा संशय अधिराजास आला. पण हें बलदेवास कळतांच माझ्या मित्रांच्या केसासही धक्का लागला तर आपण प्राण ठेवणार नाहीं अशी बलदेवानें दहशत घातली, तेव्हां तो दुबळा धृतराष्ट्र डोळ्यावर झापड ओढून स्वस्थ बसला.

राजवाड्यांतली ही खाजगी वाटाघाटही लोकांत जाहीर झाली, व लोकांचा संशय दुणावला. घडलेल्या वस्तुस्थितीचा साक्षीदार परमेश्वराखेरीज कोणी मानव असता तर बलदेवास त्यानें पापकृत्याच्या आरोपापासून एकदम दोषमुक्त केलें असतें. पण ज्या तीन चार गोष्टींची संगति बांधून त्यावर लोकांचें अनुमान उभारलेलें होतें त्या इतक्या एकमेकांशीं संगतवार व लोकांच्याच

अनुमानाकडे बोट दाखविणाऱ्या होत्या, कीं त्यांच्याही आंत असलेले विरोधी सूक्ष्म धागे लक्षांत येण्यासारखे किंवा गृहीत धरणें इष्ट वाटण्यासारखें नव्हतें. आपल्यावर सर्वापराधाचें खापर लोक फोडतात हें बलदेवास कळून चुकलें होतें. त्यास असला आरोप खपत होता असें नव्हें, पण खऱ्या गुन्हेगारांना न्यायासनासमोर निदान लोकमताच्या ऐरणीवर आणण्यासही तो तयार नव्हता. त्यांचा संशयही येऊं नये याकरितां त्यानें त्यांना पूर्वीसारख्याच इतमामानें आपल्याजवळ ठेविलें, व उलट थोडा बडेजाव अधिकच वाढविला, तेव्हां खोट्या लोकमताविरुद्ध मनानेंही तक्रार करण्यास बलदेवास जागा नव्हती. गुन्ह्याची जी खरी गुन्हेगारी आबडत्यांवर येऊं न देण्याची त्यानें खटपट केली, ती अखेर आपल्या माथीं त्यानें येऊं दिली. आपली उघड निंदा परभारें व प्रसंगीं तोंडावरही वजनदार लोकांकडून त्यास ऐकून घ्यावी लागली. प्रेमळांच्या शृं ( अं ) गारलीलांनीं त्यांच्या अंगाचे चांगलेच पोपडे निघाले.

गुन्हा करणारा, करविणारा, तसाच जबाबदार असून दुर्लक्ष करणारा, व लपविणारा——सगळे सारखेच अपराधी !

: १ :

चालू व्यवहाराचा मोह मनुष्यास एवढा मोठा आहे कीं मृत्यूसारखें सर्वभयानक भवितव्य दृष्टीआड करून व्यवहारांत मनुष्य अमराप्रमाणें निर्भय गढलेला असतो. नेहमीं धगधगीत रसरसलेल्या भवितव्याची ही स्थिति तर पिचून क्षणोक्षणीं रक्षा होत जाणाऱ्या भूतकालास कोण कितीसा मानणार ? ज्या प्रतिकूल परिस्थितीचा प्रतिकार करवत नाहीं तीबद्दल निव्वळ असंतुष्ट न राहतां तीस मग मुकाट्यानें शरण जाणें हा जीवस्वभाव आहे. स्वातंत्र्य गमावूं नये म्हणून देतां आला तर धडाक्यासरशी प्राणही देणारीं माणसें पारतंत्र्याचे पाश, अचानक मानेभोवतीं बसून त्यांच्या प्रतिकार्यार्थ मरणेंही अशक्यप्राय होऊन गेल्यावर त्या पाशांचें दुःख हलकें हलकें विसरतात, इतकेंच नव्हे तर या नव्या परिस्थितींत आतां नव्या सोई पाहूं लागतात व त्या सोईकरतां ती नवी परिस्थितिही जतन करतात. निवळ अप्रतिकार असंतोष पत्करण्यास माणूस तयार नसतो. जिवंतपणांतील अनिवार असंतोषाच्या यातना मृत्यूपेक्षांही भयंकर असतात कीं काय कोण जाणे ! पण अशा सामान्यतः ढिल्या समाजांत विलक्षण ताणाची व अनन्य मनाचींही कांहीं विशेष माणसें असतात. या सामान्य-विशेषांत महदंतर असल्यामुळें एकमेकाची एकमेकास ओळखच पटत नाहीं. हीं अनन्य माणसें शीतल चालू व्यवहाराकडून दृष्टि काढून भूतकालांतील जळजळीत देखाव्यांत आग्रहानें स्नान करीत शरीर व मन जाळण्यांत रमलेलीं-निदान गुंगलेलीं असतात. यांच्या मनस्थितीच्या अनोळखीमुळें यास सहानुभूतीचा ओलावा कोठूनही मिळत नसून

प्रतिकाराचा मार्ग कोणत्याही कारणानें एकदां खुंटल्यावर सदा उफाळणाऱ्या बलवत्तर अशा हृदयस्थ प्रेरणेनें धडाडून पेटलेल्या स्मृतींत अहर्निश जाळून घेऊन हळूहळू रक्षा होत जाणें एवढेंच दुष्ट भवितव्य यांच्या नशिबीं असते

अहिल्यापुरस्थ नागरिक हळूहळू सर्व भयंकर प्रकार विसरत चालले. रात्रंदिवस विचारांचा एकच विषय होऊन राहिलेला हा विषय लवकरच विचारक्षितिजाखालीं बुडून गेला. लोकांचे व्यवहार यथापूर्व सुस्वस्थ सुरू झाले खरे. पण या सामान्य लोकांहून रत्नाकरांच्या घरची स्थिति निराळी होती त्यांच्या घरांतील स्वस्थता, सौख्य व संतोष हीं देवकी-गंगाधराबरोबर जीं एकदां नाहींशीं झालीं तीं कायमचीं. सगुणाबाईंनीं अंथरूण धरलें. रत्नाकर शांत, गंभीर, निग्रही पुरुष; आंतल्या आंत धुमसणारा त्यांचा संतापाग्नि त्यांचा जीवितरस एकसारखा कढवून आटवीत होता. या उभयतांना प्रभाकर हा आतां एकच आशेचा अंकूर त्यावर जीव लागून त्यांनीं झालेलें दुःख एकवार मागें टाकलेंही असतें. पण प्रभाकराच्या वृत्तीवर या प्रसंगानें जो परिणाम झाला त्यानें रत्नाकरांच्या उरल्या असतील त्याही कौटुंबिक आकांक्षा सर्व जळून खाक झाल्या. आधीं मुळचीच थोडी असलेली प्रभाकराची उल्हसितवृत्ति आतां अगदींच मावळली. त्याच्या चेहऱ्यावर आतां खिन्नताही दिसत नव्हती. त्याचा चेहरा निराश, पण उग्र व बेफाम दिसूं लागला. नेहमींचें शांत गांभीर्य आतां भयंकर व क्रूर दिसूं लागलें.

शाळेंत जाणें त्यानें एकदां सोडलें तें सोडलेंच. घरीं बसूनही आतां तो वाचीना. अगदीं पहाटे उठून आपल्या गजाननाजवळ जो तो एकदां बसे तों रात्रीं तेथेंच निजेपर्यंत. मध्यें भोजनादि शारीर कर्मापुरता तो उठे. पानावर बसून तो आतां स्वस्थपणें जेवेना. आवडनिवड त्याची पार नाहींशी झाली. येतां जातां आईच्या अंथरुणाशीं तो तिच्या शरीरावर डोकें टेकून बसे, पण कांहींही बोलत नसे. रत्नाकरांनींही स्नानसंध्या पार्थिवपूजा याखेरीज इतर सर्व व्यवहार बंद केला. प्रभाकरासही ते असें वाग किंवा अमुक कर असें म्हणत नसत. त्यांचें अंतःकरणच भंगलें होतें. भग्नपात्र ज्याप्रमाणें नादावरून कळतें त्याप्रमाणें त्यांचा कंपित शब्द व निश्वास हृदयभंगाची साक्ष देत होता. तेही सदा एकटेच ओसरीवर बसून असत. कोणी आलेंच

तर थोडें बोलून त्यास वाटेस लावीत, नाहीं तर स्वतःच उठून घरांत जात. सगुणाबाईजवळ ते मधून मधून बसत. पण सर्वांनीं बोलणें जणूं कांहीं वर्ज्य केलें होतें. तापानें सगुणाबाई नुसत्या फणफणत असत, पण त्यांनीं औषध कधीं मागितलें नाहीं किंवा त्यांना कोणी घे म्हटलें नाहीं. अशा मानसिक अशौच्यांत आणखी राहायचें तरी किती याचा कोणीही विचार करीसें दिसलें नाहीं. घरात कशाचकडे कुणाचें लक्ष नसे. मृत्युलोकांतील कोणत्याही विकाराची ओळखच विसरल्यासारखे सर्वजण वागत. मृत्यूची शिक्षा झालेल्या मनुष्याप्रमाणें त्यांस जगांत कांहीं आपलेपणाच वाटेनासा झाला. घरांतील नोकर माणसें सगळीं फार सज्जन, स्वामिनिष्ठ होतीं, तीं अशा स्थितींत मालकांची इमानानें सेवा करीत. व त्यास सुख वाटावें यासाठीं सर्वतोपरीं झटत. पण त्या सर्वांचा कांहीं उपयोग होत नसे. सगुणाबाईचें दुखणें जोरावलें. ताप दूषिक असावा असें सर्वांना वाटलें. डॉक्टर आणण्याची गोष्ट एका नोकरानें काढिली. पण 'मला डॉक्टर वांचवूं शकणार नाहीं' असें त्यांनीं सांगितलें. रत्नाकरानींही डॉक्टर आणला नाहीं, आणूं दिला नाहीं त्यांनीं पत्नीच्या उशाशीं आसन घातलें. तेथेंच सर्व दिवसभर बसून ते पत्नीची सेवा करीत. पत्नीस ऐकूं जावें अशाकरतां मोठ्यानें 'जयशंकर' 'जयशंकर' असें नामस्मरण करीत. सगुणाबाईही हळूहळू म्हणत, व हात उचलत ना तरी बोटांनीं टाळी वाजवीत. त्यांनीं अन्नोदक अगदींच सोडलें. आतां त्या फक्त शंकराचें तीर्थ घेत, व अखंड शिवनाम जपत. आईचें दुखणें वाढलेलें पहातांच प्रभाकरानें गजाननासह आईच्या अंतरुणाजवळ ठाणें दिलें, व तिघांनीं संथपणें शिवनामाचा जप सुरू केला. तिघेही दुसरें कांहीं बोलत नसत. मनांत, बुद्धींत व स्मृतींत अहोरात्र एकच एक चित्र त्यांना दिसे, दुसरा कांहींच विषय तेथें नव्हता. त्या चित्रास—त्या विचारास उच्चारावयासही त्यांची जिव्हा धजावत नव्हती, एकमेकाच्या दृष्टीशीं दृष्टिही त्यांना देववेना, इतकी त्यांची त्यांनाच लाज वाटत होती. शोकातिरेकानें त्यांचे अश्रूही वाळले होते. सर्वांचे डोळे सदां सुंद आणि तारवटल्यासारखे दिसत. त्यांच्या या वृत्तीचें प्रतिबिंब नोकर चाकरांतही दिसे. सर्वजण परस्पराशीं उदासपणें, खिन्नपणें वागत. माणसांनीं भरलेल्या त्या घरांत स्मशानांत

प्रेत पोंचविण्यास आलेल्या जमावाप्रमाणें दुःख, औदासीन्य व निराशा यांची छाया पसरली होती.

सगुणाबाईंची घटका भरत आली. त्यांना तीर्थ दिलें, तें प्राशन करून त्यांनीं रत्नाकरांच्या मांडीवर डोकें टेकलें. प्रभाकरानें आईचे दोन्ही हात आपल्या मांडीवर घेतले. त्याला उद्वेग असह्य झाला होता. पण तो त्यानें मोठ्या त्वेषानें आवरला. या निग्रहाचे श्रम त्याच्या मुखावर स्पष्ट दिसत होते. " देवा ! तुम्हांला अखेर हें आवडलें ना ? तुमची मर्जी ! " सगुणाबाईंच्या डोळ्यांतून एकच अश्रु आला. प्रभाकरानें तो इतका झटकन पुसला कीं पतिव्रतेचा एकही दुःखाश्रु धरणीवर पडेल तर धरणी जळूं लागेल असेंच जणुं काहीं त्याला वाटलें. त्यास पुन्हां उद्वेगाचा उमाळा आला. पण त्यानें तो पुन्हां आवरला. यावेळीं त्याला फारच परिश्रम पडले. डोक्याच्या शिरा तडातड उडूं लागल्या. शरीर कंप पावूं लागलें. त्यानें आईच्या अंगावर मस्तक ठेवलें. पण रडूं नाहींच येऊं दिलें. "बाळ" सगुणाबाईंनीं एकवार प्रभाकराकडे पाहिलें. एकवार पलीकडे पाहिलें. पुन्हां प्रभाकराकडे पाहिलें "मी सू—" तो अर्ध्यावरच थांबला. " देवी—बाळ—मी ऽ ऽ ही आऽ ऽ लें. " ते निःष्पाप नेत्र निस्तेज झाले. सगुणाबाई हात जोडून पतीकडे पहात असतां तो देह तसाच तेथें पडून राहिला व त्यांचा प्राण त्यास सोडून पार कोठें तरी निघून गेला.

मृताचा अंत्यविधी व उत्तरकार्य यथासांग उरकण्यांत आलें बापलेकाचा पूर्वीचा उदासवाणा कार्यक्रम यथापूर्व सुरू झाला. नोकरचाकर पूर्वीप्रमाणेंच कायम होते. घरांत चहूंकडे नेहमीं नितांत शांत असे. असे तीन चार आठवडे गेले. देवकी–गंगाधराचा शेवट झाल्यास आज तीन चार महिने झाले होते. दरम्यान दोन महिन्यांनीं सगुणाबाईंनीं इहलोक सोडला. आतां आपण दोघे उरलों, तेवढे गेलों कीं आटोपलें असेंच चिंतीत असल्यासारखें दोघे वागत.

पण प्रभाकराच्या वृत्तींत एकदम एक दिवस फरक पडलासें दिसलें. आज तो कांहींसा प्रसन्न होता. तो सकाळीं निजून लवकर उठला. स्नान तो हल्लीं घरींच करी. त्यानें स्नान वगैरे आन्हिक कर्म आटपलें. गजाननाची पूजा केली. नंतर त्यानें पोशाख केला. माडीवर जाऊन एका खोलीचें

कुलूप काढून तो आंत गेला व कोटाचीं बटणें नीट लावीत बाहेर आला. मधलें एकच बटण त्यानें मुद्दाम खुलें ठेविलेलें दिसलें. खोली बंद करून तो खालीं आला, व तसाच कोणास न विचारतां तो घराबाहेर पडला. प्रथम तो सरकारी मोटारच्या तबेल्याकडे गेला, तेथें मोटार नसून 'युवराज फिरावयास गेले आहेत ते आतांच परत येतील' असें दोघांचें संभाषण चाललेलें त्यानें ऐकलें. त्याजकडे इतक्यांत कोणी चमत्कारिक रीतीनें पाहिलें. पण तिकडे न पहातां युवराजाच्या फिरण्याच्या दिशेनें तो वळला. कांहीं वेळानें मोटार समोरून येत असलेली त्यास दिसली. ती अगदीं नजीक येतांच प्रभाकरानें एकदम हात पुढें केला, कांहीं अपघात असेल असें वाटून ड्रायव्हरनें मोटार थांबविली. तेवढ्या अवकाशांत प्रभाकरानें चटकन मोटारींत उडी मारली, व कोटाखालून खंजीर काढून गाडींत बसलेल्या बलदेवाच्या छातीवर नेम धरून त्यानें तो भोंसकला, बलदेवानें तेवढ्यांत चपळाई करून तो नेम चुकविला ती कट्यार त्याचे खांद्यांत घुसली. मोठी जखम होऊन रक्तास्राव सुरू झाल्यामुळें तो बेशुद्ध पडला. हसन व सख्या जवळ होते, पण प्रभाकरास पकडण्यास कोणीं धजावलें नाहीं, बलदेवाजवळ बसलेल्या कोणा अनोळखी मनुष्यानें प्रभाकरास पकडून पोलीसचे ताब्यांत दिलें व त्याचे हाल करूं नका म्हणून पोलिसास बजावलें.

देवकी व गंगाधर यांचा शोचनीय अंत झाल्याची बातमी ब्रिटिश पोलिटिकल एजंट यांचेही कानावर गेली. त्याचीं कारणेंही कर्णोपकर्णी त्यांनीं ऐकिलीं. रत्नाकरांचें त्यांचेजवळ चांगलें वजन होतें. झाल्या प्रकरणाचा रेसिडेंटलाही खेद झाला. पण सूड–प्रतिसूडाचे भयंकर प्रकार पुढें होतील ते टळावे. याकरितां तजवीज करणें त्यांचें काम होतें. प्रत्यक्ष पुरावा कांहीं नसल्यानें कायदेशीर सरकारी मार्ग खुला नव्हता. म्हणून गुप्तहेर खात्यांतील तीन चार इसम त्यांनीं संस्थानांत पाठविले होते. त्यांतील मुख्य इसम कांहीं निमित्त करून नेहमीं युवराजाजवळ असे. याच इसमानें प्रभाकरास यावेळीं पकडून त्याच्या सुरक्षिततेचीही काळजी घेतली व कायदेशीर न्यायाचा रस्ता साफ ठेवला.

वरील अत्याचाराची बातमी लागलीच कोणीं रत्नाकरास जाऊन सांगितली. तेव्हां "खरें कीं काय ? मग आतां मला तरी जगून काय करायचं ?" असें म्हणून ते आवेशानें उठले. हत्यारांचा परवाना असल्यानें त्यांचे घरीं हत्यारें असून त्यांच्या उपयोगाचीही त्यांना माहिती होती. कपाटांतून त्यांनीं एक मोठें पिस्तुल काढलें. बातमी सांगणारा हें पाहून भेदरला व ओसरीवरून धावत अंगणांत आला. दाराशीं येतो तों 'धाड्—धाड्—'आवाज! तो ऐकून चोहोंकडून नोकर धांवले. तों रत्नाकर केव्हांच पार गेले होते. प्रभाकराच्या घराची झडती घेण्यास पोलीस येतात तों कृतांतासही भिवविणारा भीषण देखावा त्यांनीं पाहिला. ज्या घरांत एक वर्षापूर्वी लक्ष्मी आपल्या ऐश्वर्यतेजानें घरभर विराजत होती तेथें आज सर्वत्र भयाण दिसत होतें. नोकर चाकरांनीं पुष्कळ आक्रोश केला. पण घडून गेलेल्या गोष्टींतून एकही परत दुरुस्त होणारी नव्हती.

रीतीप्रमाणें प्रभाकरास न्यायामनासमोर उभें केलें. पुराव्याची बचावाची कांहींच भानगड उरली नाहीं. प्रभाकरावर खुनाचा प्रयत्न केल्याचा आरोप होता. त्यानें तो एकदम कबूल केला व लहानशी लेखी कैफीयतही सादर केली. कैफीयत अशी होती.

" न्यायाधीश साहेब—

माझ्या घराण्यावर झालेल्या ज्या नीच अन्यायामुळें मी या आसुरी कृत्यास प्रवृत्त झालों त्याचा उच्चारही मी करीत नाहीं. मी आपणांस एवढेंच कळवितों कीं, एका अब्रूदार धनिकाचा मी पुत्र असून मॅट्रिकच्या वर्गांत माझा नंबर पहिला होता माझ्या शिक्षकांचेंही मजवर प्रेम होतें. दुष्ट, नीच बुद्धीनें अथवा मूर्खपणानें मी एखादें कृत्य करणें संभवनीय नाहीं. झालल्या घोर उपमर्दाचा सूड मी न घेतला तर दादांशीं मी कृतघ्न झालों, बंधुत्वाचें नातें विसरलों असें होईल असें माझ्या मनानें घेतलें. सूड घेण्याच्या एकाच कल्पनेखेरीज आज तीन साडेतीन महिने मला कांहींही दिसलें नाहीं अथवा सुचलें नाहीं, व मी सूड न घेईन तर मानसिक यातनांनीं होरपळत व कुचंबत मरण्याखेरीज मला सुटका नाहीं अशी माझी खात्री झाली. सर्व नागरिक झालेला प्रकार विसरत चाललेले पाहून मला चेव आला. अशा लोकांत जगण्यापेक्षां मरणें बरें

असें मला वाटलें, व गुन्हेगारास आपल्या हातानें कंठस्नान घालून मृत्यूच्या स्वाधीन होण्याचें मीं ठरविलें. माझ्या वडिलांनीं माझ्याही आधीं स्वर्गाची वाट धरल्याचें ऐकतों. रामशास्त्री कन्येच्या दुःखानें वेडे होऊन आधींच पुढें गेले आहेत. ज्याकरितां मी जगावें असें मला आतां कोणीही राहिलें नाहीं. आपण आपल्या अधिकाराचा उपयोग करून या जगांतून मला सोडवाल तर मी तो आपला अनुग्रहच समजे ."

पण असे सहज मरून जाणें त्याच्या नशिबी नव्हतें. त्याच्या नशिबाचा ग्रंथ अजून अर्धाच झाला होता. बलदेवाची जखम प्राणघातक ठरली नाहीं. तेव्हां खुनाचा प्रयत्न करून जबर जखम केली याबद्दल त्यास जन्मठेपीची शिक्षा सुनावण्यांत आली, व लगेच वेशीबाहेरील हायस्कूल समोरील–त्यानें हायस्कुलांत असतां भविष्य कालाची कांहींच कल्पना नसून बाहेरून नित्य पाहिलेल्या भव्य तुरुंगांत एका बाजूस एका स्वतंत्र कोठडींत प्रभाकराची दीर्घ कालापर्यंत अशा समजुतीनें अधिकाऱ्यांनीं स्थापना केली.

## : १० :

तुरुंगांत गेल्यावर पहिले तीन चार दिवस तेथील प्रवेशसंस्कारांत गेले, व पुढें तेथील ठराविक कार्यक्रम सुरू झाला. मानसिक व्यथेनें त्याच्या मनास धक्का बसून याचें काळीज अशक्त झालें आहे तेव्हां त्यास कांहीं तसदीचें काम देऊं नये असें डॉक्टरचें सर्टिफिकिट मिळालें होतें. रेसिडेंटाचे अंतस्थ समजेनें बेकायदा जुलूमही होऊं नये अशी तजवीज झाली होती. एकंदर राज्यांतल्या प्रमाणें येथील तुरुंगांतही अधिकाऱ्यांची शिस्त बेताची असे. पण स्वतां प्रभाकर शिस्तशीर असल्यानें बेकायदा मिळणाऱ्या सवलतीचाही त्यानें कधीं उपयोग केला नाहीं. यामुळें त्याचाच अधिकाऱ्यावर वचक राही.

तुरुंगांतील लहानमोठे अधिकारी संस्थानांतीलच असल्यामुळें रत्नाकराबद्दल त्यांना आदर होताच. तेंहि प्रभाकरास उपयोगी पडलें.

कांहीं कारस्थान न व्हावें म्हणून याची खोली तटाचे बाजूस अगदीं एकीकडे असलेली म्हणून निवडली होती. ती साधारण दोन खण लांबरुंद व पुष्कळ उंच असून तीस सळयांचें मजबूत दार होतें. दाराबाहेर लहानसा ओटा असून बाहेर सभोवार मोठें मैदान व मैदानाचे बाजूस तटाची भिंत दिसत होती.

या खोलींत प्रभाकराचा तुरुंगांतील आयुष्यक्रम सुरू झाला. सामान्य कैदी एकदां तुरुंगाच्या वेळापत्रकांत सांपडून यंत्राप्रमाणें फिरूं लागले कीं त्यांतच रममाण होतात. विचारसृष्टीपेक्षां प्रत्यक्ष सृष्टीच त्यांचेवर अधिक पगडा बसविते. प्रभाकरास हें अशक्य होतें. प्रत्यक्ष सृष्टीपेक्षां विचारसृष्टीनेंच त्याला नेहमीं ग्रासलेलें असे. यावज्जन्म त्याच्या मनास ग्रासून टाकील एवढी भयानक सृष्टि

त्याच्या स्मृतिपटलावर उभारलेली होती. आतां त्यांस विशेषसें कांहीं कामही नव्हतें. तेव्हां तुरुंगाच्या वर्तमानकालीन एकांतवासांतून त्यानें भूतकालीन कौटुंबिक आयुष्यांत प्रवेश केला. आपल्या खोलींत तो उगीच इकडून तिकडे येरझारा झाली. त्याचें सारें विश्व त्याला, आठवे. आई, बाप, दादा, वहिनी, त्यांचें तें सुंदर तान्हें बालक, तीं गडी माणसें, तो आपला गजानन, तें ऐश्वर्य सगळें त्याच्या मनश्चक्षूंपुढें उभें राहिलें. आपण कोठें होतों व काय स्थितींत आलों याचा त्यास आचंबा वाटला. आठवणींतील कल्पनासृष्टि त्यास प्रत्यक्षासारखी वाटे. पुनः पुनः भानावर येऊनसुद्धां त्याची कल्पना तुरुंगाच्या प्रत्यक्ष आयुष्यक्रमांत स्थिर होत नसे. प्रस्तुत हें स्वप्न नव्हे असें त्यानें आपल्या मनास कित्येकदां सांगितलें असेल, पण तें त्यास पटेचना—निदान आवडेना फार-दिवसांनीं त्यास एकदां वृंदावनांची आठवण झाली. वृंदावनांचीं पत्रें काढून वाचण्याची भाविक करमणूक आज त्याचे हातची नव्हती. तो पत्रें आठवण्याचा प्रयत्न करूं लागला. त्यांतील आपल्या देशभक्तीच्या ध्येयाच्या कल्पना त्याला आठवल्या, 'वृंदावनास ही सर्व हकीकत समजली असेल काय? त्यांना काय वाटेल! आपणासंबंधीं ते काय म्हणत असतील.' वगैरे विचार त्याच्या मनांत येऊन जात. आपल्या गजाननाचीही त्यास आठवण होई. त्याचेंही तो ध्यान करी भजन करी. 'देव आपल्या भक्तांस संकटांतून सोडवून सुखी करतो' हें सूत्र त्यानें वडिलांपासून ऐकलें होतें व त्यावर त्याची श्रद्धा होती. पण आतांशा हें सूत्र मनांत आणून तो घोटाळूं लागला. 'बाबांची श्रीशंकरावर पूर्ण निष्ठा होती तरी सुद्धां त्यांचा समूळ नाश कसा झाला? त्यांचा शंकर त्यांना आतां संकटांतून कसें सोडवील? आपला गजानन तरी आपणाला सोडवील म्हणावें तर आपलें आतां काय उरलें आहे? गेलेल्या माणसांपैकीं कोण कसा परत येऊन आपणास सुखी करणार?' क्षणमात्र त्याचें मन संशयग्रस्त झाले. पण लगेच 'पुनर्जन्म' असा ध्वनी त्याच्या अंतःकरणांत त्याला ऐकूं आला. त्यानें त्याचें शांतवन झालें असें नाहीं. त्याची स्वतःची शंकाच त्यास स्पष्ट समजेना. पुनः गजाननाचें भजन त्यानें सुरूं केलें. पण आतां पहिली निष्ठा न कळत थोडी ढळली होती. नामस्मरणानें पहिल्यासारखें समाधान होईना.

तुरुंगाच्या मुख्यधिकाऱ्याकडे त्यास एकदां बोलावणें आपल्यावरून हजर करण्यांत आले. पुढील पत्र अधिकाऱ्यांनीं त्यास वाचण्यास हातीं दिलें.

चि. प्रभाकर यास आ. वि—

चि. गंगाधर व त्यांचें कुटुंब यांच्या शोचनीय मृत्यूची हकीकत एका वर्गणीदारानें कळविली होती. पण मी राष्ट्रीय पक्षाचा पत्रकार. माझ्या मदतीनें अथवा सहानुभूतीनेंही तुमचीं संकटें वाढतील, असें वाटून तेव्हां कांहीं लिहिलें नाहीं. पुरावा कशास कांहीं नव्हता. म्हणून आत्महत्ये-खेरीज कांहीं छापतांही आलें नाहीं. त्यापुढील वृत्त व तुझी कैफियत वगैरे सर्व कळलें, तसें तें प्रसिद्ध केलें. तूं तुरुगांत असतां तुला विशेष कांहीं लिहितां येत नाहीं. तुला अखेरचें एकच सांगून ठेवतों कीं अशाही स्थितींत जी मदत तुला करतां येईल ती मी करीन. असें लिहिण्यांत कोणतेंही बेकायदाकृत्य करण्याचा माझा मानस नाहीं. तेव्हां सरकारनें दयाळु होऊन हें पत्र तुझ्या हातीं पडूं देऊन तुजबद्दलचें बंधुकार्य मला करूं द्यावें अशी सरकारास माझी विनंति आहे. गंगाधर किंवा तुझे वडील यांचे ठिकाणीं तूं मला समज. जन्मठेपीची शिक्षा असूनही तुरुंगाची शिस्त तूं उत्तम पाळशील तर दहा वर्षांचे आंतच तुझी सुटकाही होईल. तारुण्याच्या ऐन उमेदींत तूं मोकळा होशील. बाहेर आलास म्हणजे आपण एकत्र राहूं. धीर सोडूं नको. तुझीं वर्णनें मी घरीं करीत असतों. तुला सौ. ने डोळ्यांत आसवें आणून पुत्रवत आशीर्वाद सांगितले आहेत. प्रेमाच्या आशेवर मनुष्य जगांत दिवस कंठीत असतो. तुला प्रेमाचीं माणसें नाहींत असें कधींही समजूं नको. आम्ही उभयतां तुला सर्वस्व आहों. कांहीं झालें तरी धीर सोडूं नको. परमेश्वर आपणासर्वांस अशाही संकटांत हात देईल असा दृढ विश्वास ठेव. अधिक काय लिहूं ?

— — —पुणें सर्व प्रसंगीं तुझा बंधु **वृंदावन**

प्रभाकराचा कंठ सद्गदीत झाला. त्याचे नेत्रांतून आनंदाश्रु आले. त्याने तें पत्र पुनः पुनः वाचलें व तो तल्लीन झाला. रखवालदार घाई करूं लागला तेव्हां भानावर येऊन पत्त्याकडे त्याचें लक्ष गेलें. तो त्यानें वाचून चांगला घोकून पाठ केला व पत्र हवालदाराचे हातीं परत दिलें. पत्त्याकडे लक्ष जाऊन त्याचे मनांत कांहीं खळबळ उडाली. विचारांचे काहूर माजलें. त्याच्या मुखा-

वर निराशेंतली आशा डोकावूं लागली. त्यानें कांहींसा निश्चय केला असावा.

असेही चार आठ दिवस गेले.

एक दिवस अ रात्रीं गाढ अंधार पडला असतां त्याचे दाराच्या कुलुपांत कोणी हळूच किल्ली फिरविलेली त्यानें ऐकिली. तो अर्धवट झोपेंत होता, तो पुरा जागा झाला. बाहेर अंधार होता तरी आकाश स्वच्छ असल्यानें त्या स्वच्छ आकाश-पृष्ठावर त्याला कुलुप काढणाऱ्या माणसाची काळी प्रतिमा दिसली. त्यास दाढी होती व हातांत कांहीं लहानसें खंजीरासारखें हत्यार ही अगदीं सावधपणें त्यानें धरलें आहे असें त्याला दिसलें. या मनुष्याचा हेतू उघडच लक्षांत येणारा होता. खोलींत गडद अंधार असल्यामुळें आपण या मनुष्यास दिसूं शकत नाहीं असें प्रभाकरानें ताडलें. तो हलकेंच अंथरुणावरून उठून व पांघरूण अंथरुणावर माणसासारखें पसरून सावधपणें मागें उभा राहिला. इतक्या अव-काशांत बाहेरच्या इसमानें कुलुप काढून दार उघडलें, व तो पुढें आला. त्याचे पायास तरट लागतांच तो थोडा मागें सरला. प्रभाकर वाकून आकाश पृष्ठा-वर त्याची हालचाल टेहळत होता. त्या मनुष्यानें उगारण्याकरितां उजव्या हातांत खंजीर वर धरला, नंतर गुडघे टेकले व एकवार मागें वळून पाहिलें. वर केलेला त्याचा हात थरथर कांपत होता व त्याचें शरीरही कंप पावत असावें असें प्रभाकरास दिसलें. दुसऱ्या हातानें अंथरूण चाचपणार असावा असा प्रभाकरास संशय येतांच एकदम पुढें होऊन प्रभाकरानें त्याचा खंजीराचा हात बळकट पकडला व गरागर पिरगळून त्या मनुष्यास तेथेंच उताणें पाडून त्याच्या छातीवर तो बसला. खालचा मनुष्य बराच भेदरला होता. प्रभाकरानें खंजीर हिसकून घेऊन अगदीं त्याच्या छातीवर जरा जोरानें टोंचला. व ' कोण तूं काय हकीकत असेल ती चटसारी सांग, नाहीं तर भरलीं तुझीं शंभर वर्षे ' असें म्हणून त्यानें त्यास दटावलें. छातीच्या बरगडीस खोचून बसलेल्या खंजीरा-पुढें खालील मनुष्य अगदीं भिऊन गेला.

" मी हसन, सख्या तटाबाहेर उभा आहे. बाहेरून शिडी लावून मी तटावर आलों नी ती शिडी आंत लावून मी लिंबाच्याजवळ उतरलो. या कुलुपाची किल्ली मीं शिपायाला पैसे देऊन समजून घेतली व तशी नवी कर-वून आणली. तुम्हांला मारावं नाहींतर पुढंमागं पुन्हां धोका होण्याचा संभव

आहे असं वाटून युवराजानं आम्हाला थाडलं. पण मला आतां पश्चाताप होतो. मला जीवदान द्याल तर मी पुन्हां तुमच्या वाटेस जाणार नाहीं" वगैरे हकीकत हसननें त्यास सांगितली. पुन्हां एकदां खंजीर जोराने टोंचून त्यानें खात्री करून घेतली. वृंदावनांचें पत्रावरील पत्ता पाहून आलेली लहर आतां जोरावली. तो जिवावर उदार झालाच होता. त्यास पुन्हां वीरश्री चढली. मनांत आलेली इच्छा पूर्ण करून घेण्याचे त्यानें ठरविलें व हसनचें म्हणणें खोटें असून फसगत झाली तरी फिकीर नाहीं, पण प्रयोग करून पहायचाच असा निश्चय करून त्यानें खंजीरास जोर दिला. "तुला जीवदान दिलं तर अजून कुणाकुणाचं तुम्ही वाटोळं कराल कुणास ठाऊक!" असें म्हणून त्याने तो खंजीर तसाच जोरानें रेटून पुन्हां दोन तीनदां खसाखस चालविला. नंतर तसाच खंजीर घेऊन तो हसनच्या सांगण्याप्रमाणें लिंबाऱ्याजवळ आला. शिडी तेथून चार हात दूर नेऊन तो तटावर चढला व परत शिडी बाहेर सोडून तो खालीं उतरूं लागला. सख्या थोडा दूर पूर्वीच्या जागीं होता तो शिडी पाहून हलकेच जवळ येऊं लागला. प्रभाकराला चाहूल वाटली. पण कांहीं दिसेना. इतक्यांत अगदीं जवळ "काय भाई, झालं—?" शेवटच्या पायरीवरून जवळ शब्द आला. त्या रोखानें प्रभाकरानें न्याहाळलं व माणूस दिसतांच एकदन डाव्या हातानें मानेस वेढा देऊन उजव्या हातानें पोटांत खंजीर चालविला. सख्याचाही अशा रीतीनें मोक्ष करून मनःक्षोभ थांबविण्याकरितां तो शिडीच्या पायरीवर बसला. तों शिडीच्या पहिल्या जागीं त्याला कांहीं तरी पांढरें दिसलें. तो थोडा भ्याला. पण त्याला या वेळीं विलक्षण धैर्यबळ आलें होतें. तो त्या पांढुरक्याकडे वळला. तें एक गांठोडें होतें. तें त्यानें उघडलें. आंत रुपयांची थैली होती. त्याखालीं एक गोसाव्याचा पोषाख व त्या खालीं एक अपटुडेट साहेबी सूट होता. गोसाव्याच्या वाटेस त्या राज्यांत कोणी जात नसत म्हणून या दोघांनीं आपणास मारून पोबारा करायचा विचार केलेला असल्याचा त्यास संशय आला. त्यानें स्वतां लगेच गोसाव्याचा वेष घेतला. मध्यरात्रीचा सुमार होता. स्टेशन वीस पंचवीस मैल दूर. पहाडांतल्या रस्त्यांत या वेळीं वाघाच्या भितीनें माणसें, गाड्या वगैरे कांहीं जात नसे. पण प्रभाकरास तीच सोयीची वाटली, व

गाठोडें कांखेस मारून त्यानें स्टेशनची वाट धरली. साहसी उत्साहाच्या भरांत त्याचें देहभान हरपलेंच होतें. चालण्याचे श्रमही त्यास वाटले नाहींत. भराभर चालून धावून उजेडापूर्वी त्यानें स्टेशन गांठलें. पुण्याची गाडी तयार होती. तिकीट काढून तो गाडींत बसला. व संध्याकाळपर्यंत वेड पांघरून खालीं मान घालून त्यानें दिवस काढला. गाडी थेटची होती. रात्रौ अकरा वाजतां तो पुणें स्टेशनांत उतरला. तिकीट देऊन त्यानें विचारीत विचारीत धर्मशाळा गांठली. उत्साहाच्या भरांत खाण्यापिण्याचेंही त्याला भान नव्हतें. गोसाव्याचा वेष उतरून त्यानें तो साहेबी सूट अंगावर चढवला व गोसाव्याच्या वेषाचें गांठोडें घेऊन बाहेर आला. हलकेंच तें गांठोडें एका बाजूस टाकून धर्मशाळेंतून तो निसटला. पैसे त्यानें आठवणीनें जवळ ठेऊन घेतले होते. लगेच वृंदावनांच्या पत्त्यावर एक व्हिक्टोरिया ठरवून तींत बसला. कांहीं वेळानें वृंदावनांच्या अगदीं दाराशीं गाडी थांबली. गाडीवाल्याचे पैसे देऊन त्यानें त्यास वाटेस लावलें, व वृंदावनांच्या दारावर त्यानें हांक मारली. पहिल्याच हांकेस वृंदावनांनीं ‘ओ’ देऊन कडी काढली. प्रभाकर आंत गेला व झटकन् त्यानें दार लावून घेतलें. दिवा वर करून पहातात तों ‘प्रभाकर’! असें पाहून वृंदावन चकितच झाले. दोघेही तेथें कांहीं न बोलतां एकदम माडीवर गेले.

# भाग २ रा

## ११

डॉ. वामनराव पाटणकर हे मूळपासून श्रीमंतींत व सौख्यांत वाढलेले. त्यांचे वडील मोठ्या हुद्द्यावर कामदार होते व सरकारी नोकरींत राहून ते सामाजिक सुधारणेचा मोठा पुरस्कार करीत. वामनरावजींची आई सुधारक पंथीय नसल्यामुळें तिच्या भिडेस्तव वडिलांनीं वामनचा विवाह बालपणीं म्हणजे १५।१६ वे वर्षीच केला होता. तरी पण वामनरावांचे शिक्षण, संस्कार, अभिरुचि, रीत भात वगैरे सर्व सुधारकी थाटाची होती. मुंबईस ग्रँट मेडिकल कॉलेजांतील डॉक्टरची शेवटची पदवी मिळल्यावर वडीलांनीं वामनरावांना अधिक अभ्यासाकरितां विलायतेंत पाठविले. तिकडून तीन वर्षे अभ्यास करून व एक कायशीशी लांबलचक परीक्षा देऊन वामनराव परत पुण्यास आले. आधींच सुधारक, त्यांत विलायतेहून आलेले. वामनराव आचार, विचार, राहणी, पेहराव या सर्व बाबतींत प्रतिसाहेब झाले होते. यांच्या वैभवास येथून पुढें सुरवात व्हावयाची. पण ती पहाण्याचे भाग्य त्यांच्या मातापितरांच्या नशिबीं नव्हतें. वामनराव विलायतेहून आल्यावर थोड्याच दिवसांत त्यांच्या मातोश्री निवर्तल्या. वडिलांना वृद्धापकाळीं हा पत्निवियोग साहजिकच दुःसह वाटला, व तेही दिवसानुदिवस खंगूं लागले. वामनरावांनीं थोड्याच दिवसांत पुण्यास बुधवारांत एक मोठा दवाखाना थाटला. पहिल्यापासूनच त्यांच्या हाताला यश येऊं लागलें. पण असे वैभवाचे थोडे दिवस पाहून वडिलांनीं परलोकची वाट धरली. वडिलांच्या मृत्यूनंतर वामनरावांनीं जुने घर विकून टाकून भांबुर्ड्याच्या माळावर एक मोठा हवाशीर

छानदार बंगला बांधला, व गावांत दवाखान्यांत जाण्यायेण्यास व इतरत्र रोगी पाहाण्यास जाण्याकरितां त्यांनीं एक स्वतंत्र मोटार ठेवली.

डॉक्टरांच्या कुटुंबाचें नांव राधाबाई. डॉक्टर स्वतां कमालीचे सुधारक होते, तरी त्यांच्या पत्नीची निवड त्यांच्या जुन्या पद्धतीच्या मातोश्रींनीं केली होती. राधाबाईचें सर्व बालपण जुन्या पद्धतीच्या सासूच्या हाताखालींच गेल्यामुळें त्या आपल्यापरी आपली जुनी चालरीत पाळीत, आणि वामनरावही कधीं त्यांना हरकत करीत नसत. ते स्वभावानें प्रेमळ होते. घरांत कशाची ददात नसल्यामुळें या दंपत्याचा संसार सुखांत चालला होता.

पण सुखाला दुःखाचें गालबोट हवे म्हणूनच कीं काय राधाबाईंना पुष्कळ दिवस मूलच झालें नाहीं. याचें त्यांना फार वाईट वाटे. सुशील व तरुण स्त्रियांकडून विवाहोत्तर उत्सुकतेनें इच्छिला जाणारा मोठा लाभ म्हणजे अपत्य-लाभ होय. मूल हें तरुण व सुशील स्त्रियांना एकांतांत हृदयल्हादक व चार चौघांत भूषण वाटतें. अपत्यपूर्वकालीं असणारें पतिपत्नींचें शृंगारबहुल व तरल प्रेम अपत्योत्तर अधिक सात्त्विक होत असतें. बालकाची सेवा हाच गृहिणीची आवडता व्यवसाय होतो. त्याचे बोबडे बोल हेंच त्यांचें संसारांतील काव्य व त्यांच्या विविध क्रीडा हाच पतिपत्नींचा आनंद होऊन बसतो. अर्थातच अनपत्यता ही स्त्रियांना किती दुःखद होत असेल याची कल्पनाच केली पाहिजे.

फार दिवस मूल होईना म्हणून राधाबाईनीं नवस-सायास व्रते-उद्यापनें सुरू केली. पहिल्यानें कांहीं दिवस सर्व गुप्तपणें चाललें पण केव्हां तरी एकदां वामनरावास या गोष्टी कळल्याच. पत्नीप्रेमामुळें जरी त्यांनीं विरोध मुळींच के । नाहीं तरी स्वतांस मुळींच श्रद्धा नसल्यानें ते पत्नीची व तिच्या उपास्य-देवतांची नेहमी मनसोक्त थट्टा करीत. राधाबाईस हें आवडत नसे. त्यांना वाईट वाटे व क्वचित रागही येई. पण नवऱ्याचा उपमर्द त्यांच्यानें करवत नसे व 'आपली भक्ति खरीखुरी आहे इकडे देवराजांनीं पहावं' अशी त्या आपल्या देवतांची करुणा भाकीत असत.

अनेक व्रतें व अनेक नवस-सायास झाल्यानंतर फार दिवसांनीं सर्व व्रतांचें संकलित फळ मिळून त्यांना एक मुलगी झाली. मुळींच मूल नाहीं म्हणून हुर-

झुरणाऱ्या राधाबाईंना मुलगा न झाला तरी मुलगी झाली याचाही अत्यानंद वाटला. वामनरावांना तर आपल्याला मूल झालें याचा आनंद पोटांत माईना. नवस-सायासाकरितां बायकोची ते कितीही थट्टा करोत तरी पण आपल्याला मूल व्हावें याची उत्कंठा त्यांनाही कांहीं कमी नव्हती. तरुणपणीं पहिलें मूल झालें म्हणजे आईपेक्षांही कांहींसा अधिक आनंद बापाला होत असतो. काय असेल तें असो. त्याला कृतार्थतेच्या उकळ्यावर उकळ्या येत असतात. पूर्वीचे भिडस्त व मर्यादशील बाप आपला आनंदोद्रेक आवरून धरीत. पण पूर्वीच्या भिडस्तपणाला सोंग व मर्यादेला गुलामगिरी म्हणणारे आजकालचे तरुण बाप वडील माणसांदेखत दहा जणांत बसून सुद्धा लाडक्या बाळाचे मटामट मुक्यावर मुके घेऊन त्या पोराचा जीव अर्धा अर्धा करून सोडतात. आजकाल हा मनुष्यस्वभावच आहे. वामनराव कांहीं त्याला अपवाद नव्हते.

वडिलांनीं आपल्या हौसेनें मुलीचें नांव—अगदीं सुधारकी थाटाचें म्हणून—'किशोरी' ठेविलें. सुशील, कुशल व प्रेमळ माता आणि संपन्न, सुशिक्षित व रसिक पिता यांचे छायेंत किशोरीचें बालपण मोठें सुखांत गेलें. अजाण अर्भकाची हौस व चोज म्हणजे ती त्याच्या मातेचीच हौस व चोज असते. मृत्तिका व सुवर्ण सारख्या मापानें मोजणारें मूल एक प्रकारें योगीच. वस्त्रालंकारधारणानें त्यास आनंद होत असलाच तर तो मृत्तिकास्नानानें होईल तेवढाच. चांगले--वाईटाचा रजोगुणी विवेक सारा त्याच्या मातेचा. तिलाच बालक मातींत लोळल्यानें वाईट दिसतें व तें गोजिरवाणें दिसावें म्हणून माता त्याला भूषविते—नटविते. राधाबाईंनीं आपल्या चिरस्थलब्धबालि-केची सगळी सगळी हौस केली. राधाबाईंनीं जुन्या पद्धतीनें हौस करूं पाहावें व वामनरावांनीं मडमी थाटाची हौस करून पत्नीवर कडी करावी, असा हौसेचा दुहेरी मारा त्या अजाण बालिकेवर होत होता. स्वतांच्या पद्धतीनें बालिकेची हौस करतांना वामनरावांनीं पत्नीप्रेमानें पत्नीच्या हौसेंतही कोठें कांहीं कमी पडूं दिलें नाहीं. पत्नीनें मागितली ती ती वस्तु तात्काळ पुढें आणून उभी केली. तिनें कांहींही मागण्याकरितां उच्चारलेला शब्दन् शब्द अंतराळीं ओंजळींत धरून वरच्यावर खरा करून दाखविला.

राधाबाईंना किशोरीच्या पाठीवर पांच वर्षांनीं मधुकर झाला. तेव्हां तर उभयतां मातापितरास सौख्यगिरीवर आरूढ झाल्याप्रमाणेंच वाटलें. यापुढें त्यांना मूलबाळ कांहींच न झाल्यामुळें या दोन बालकांवर त्यांचें सर्व प्रेम एकवटलें गेलें.

डॉक्टरीची मिळकत चांगली वाढून संसार टाकठोक थाटल्यावर डॉक्टर वामनराव सार्वजनिक कार्यात लक्ष घालूं लागले. ते राजकारण, समाजकारण, धर्मकारण वगैरे सर्व बाबींत लक्ष घालीत. तथापि कोणत्याही विशिष्ट पक्षाचा अभिनिवेश त्यांनीं न ठेवल्यामुळें सर्व पक्षांत त्यांचे मित्र असत. स्वतः प्रत्यक्ष असे कांहींच जबाबदारीचें देशकार्य ते करीत नव्हते, तरी सर्व लहान मोठ्या कार्यास सढळ हाताने वर्गण्या देत व स्वार्थत्यागी, कर्तबगार, विद्वान, आणि कळकळीच्या देशभक्तांबद्दल त्यांना अतिशय आदर वाटे व अशांशी स्नेह असण्यांत ते बहुमान मानीत. याचमुळें वृंदावन गोखले यांच्याशीं त्यांचा चांगला स्नेह होता व परस्परांचें परस्परांकडे अगदीं घरोब्यानें जाणें येणें असे.

किशोरीस शाळेंत घातले तेव्हां चांगलें पुष्कळ शिकवावें असें वामनरावांनीं मनाशीं योजून ते पहिल्यापासूनच तिच्या शिक्षणाकडे विशेष लक्ष देऊं लागले. किशोरीनेंही अभ्यासांत चांगली हुशारी दाखवून वडिलांस तोषविलें. ती जशीं अभ्यासांत चांगली होती तशी इतर रीतींनींही ती फार सद्‌गुणी होती. खुद्द राधाबाईखेरीज इतर सर्वांचें देवधर्माशीं, जुन्या चालीरीतींशीं वाकडेंच होतें. तेव्हां रीतभात भीडमर्यादा यांनीं बायकांचे सद्‌गुण मोजण्याची इतर सुधारकी घराप्रमाणे येथेंही अर्थात चाल व सोय नव्हतीच. तरी पण किशोरी जातीचीच नम्र, प्रेमळ व खुल्या दिलाची होती. आईबापांवर तिचें अतोनात प्रेम होतें. वामनराव बायकोची देवदेवाबाबत थट्टामस्करी—क्वचित उपहासही करीत. पण किशोरीस समजूं लागल्यापासून ती त्यांत कधीं सामील होत नसे. तिच्या सर्व प्रेमाचा ठेवा मधुकर. ती त्याला क्षणभरही विसंबत नसे शाळेंतील अभ्यासांत ती हुशार असली तरी तिला वाचण्याचा नाद असा कांहीं नव्हता. एखादी चांगली किंवा वाईट गोष्ट मनाला लावून घेत बसणारी नव्हती. तिला एक मात्र छंद होता; तो मधुकरचा. त्याला जेऊं घालावें, हिंडवावें, खेळवावें, निजवावें यांतच तिचा पुष्कळ वेळ जाई. मधुकर शाळेंत

जाऊं लागला, तेव्हां किशोरी त्याला रोज शिकवूं लागली. शिकवितांना किंवा खेळतांना ती त्याची मर्जी कधीं मोडत नसे. ती मधुपेक्षां फार मोठी नव्हती. तरी वयाच्या मानानें अतिशय समजुतदार होती. त्याच्याशीं तो म्हणेल तें व म्हणेल तसें खेळे. खेळतांना डाव आपल्या अंगावर घेई व त्याला रिझवे. मधुकर जरासा हूड होता तो घरांत कोणाचें ऐकत नसे, पण किशोरीचें मात्र नेहमीं ऐके. कितीही रागावला तरी किशोरीनें समजावलें कीं तो लगेच शांत होई. तासन्तास तीं बहिणभावंडें एकमेकाशीं कांहींतरी बोलत बसत. समजूं लागल्यावर, पहिल्यानें मधु फारच रागावें तेव्हां किशोरीचे अंगावरही कधीं धावून जाई व वेळीं मारीही. पण ती म्हणून कधीं रागावली नाहीं. तिच्या या प्रेमळपणानें लाजून मधुकर पुढें पुढें बराच शांत स्वभावाचा झाला होता. किशोरीस पंधरावें वर्ष संपलें तेव्हां ती इंग्रजी सहाव्या इयत्तेंत होती. वामनराव सुधारक; म्हणून लग्नाचा विचार एव्हांच कोणापुढें नव्हता. किशोरीही असला कांहीं विचार करीत असेल असें दिसत नसे. दिवसांतून दोन तीन वेळ चहा घ्यावा, फराळआराळ करावे, शाळेंत जावें, घरीं कांहीं वेळ नेमानें अभ्यास करावा व उरलेला सारा वेळ मधुकराशीं खेळावें असा तिचा कार्यक्रम असे. ती मनाची अति मोकळी होती. किंवा मनांत लपवावे असे खोल विचारच कधीं तिच्या मनांत वावरत नसावे. ती फारशी गंभीरही नव्हती किंवा मोठीशी थट्टेखोरही नव्हती. बोलण्या चालण्यांत कधीं फारसा मार्मिकपणा तिच्यांत दिसून आला नाहीं. प्रेमळपणा आणि दयाळूपणा हे दोन गुण मात्र तिच्यांत उत्कंटतेनें दिसत. भावावर आईबापावर ती निस्सीम प्रेम करी. तशीच चाकरमाणसांशींही ती मोठ्या प्रेमळपणानें वागे. चिमण्यांना रोज पिण्याकरितां शिंक्यावर ताम्हनांत पाणी भरून ती बागेंत झाडाला लावी, आणि अंगणांत रोज नेमानें तांदूळ टाकी. मुक्या प्राण्याचे हाल तिला अगदीं पाहवत नसत दुसऱ्याचें मूल रडूं लागलें तरी सुद्धां तिला गहींवर येई आणि मधुकर रडूं लागला तर त्याला उगा केल्याशिवाय तिला कांहीं सुचत नसे. तिच्या या हळव्या स्वभावाची वामनराव नेहमीं थट्टा करीत. पण कधीं तिला राग आला नाहीं किंवा तिचा स्वभाव कधीं बदलला पण नाहीं.

## : १२ :

किशोरी साहावींत गेली तेव्हां मधु इंग्रजी दुसऱ्या इयत्तेंत होता. तो हूड होताच. अभ्यासाकडे त्याचें कधींच लक्ष नसे. वाढत्या धंद्याचे ओढीमुळें डॉक्टरांना त्याकडे लक्ष देण्यास सवड मिळेना. म्हणून त्यांनीं एक दोन खाजगी शिक्षकही नेमून पाहिले. पण एकानें मधुकराला भिऊन शिकवणी सोडली तर दुसरा शिक्षक थोडा अधिक कडक दिसतांच मधुकरानें त्याजवळ शिकायला बसायचें साफ नाकारलें. तेव्हां मधुकराचें प्रेम व विश्वास संपादून त्यास योग्य मार्गास लावील असा शिक्षक कसा मिळवावा या फिकिरींत वामनराव होते. सहज बोलतांना एक दिवस ही गोष्ट त्यांनीं वृंदावन गोखल्यांजवळ काढली.

योगायोग असा कीं अहिल्यापुरींत तसले ते भयंकर प्रकार करून याच सुमारास प्रभाकार पुण्यास वृंदावनाकडे आला होता. वृंदावनांनीं प्रभाकराची हकीकत ऐकली. ते आश्चर्यानें व उद्वेगानें स्तिमित झाले. पण अशा मनःक्षोभांत स्वस्थ बसण्याइतका तो काळ त्यांना सुरक्षीत वाटेना प्रभाकरानें केलें तें सर्व योग्य की अयोग्य याबद्दल त्यांचे मत कसेंही असले तरी त्यावरील त्यांचे प्रेम आतां तर उलट अधिकच वाढलें होतें. व त्याच्या संरक्षणाची त्यांना मोठी काळजी वाटत होती. कायद्याच्या दृष्टीनें प्रभाकराचा अपराध अगदींच भयंकर असल्यानें, वृंदावनासारख्या राष्ट्रीय संपादकाच्या घरीं–कीं जेथें सरकारचे दूत नेहमीं गुप्तपणें टेहळणी करीत असायचे, तेथें प्रभाकराचें राहणें सुरक्षित नव्हतें. शिवाय घडलेल्या प्रकारांनीं प्रभाकराचा स्वभाव चमत्कारिक झाला असून त्याच्या अज्ञातवासास ही मोठीच

अडचण होती. तेव्हां सरकारला संशय न येईल, सुखी, संभावित व प्रेमळ संगति मिळून प्रभाकराचा स्वभाव शांत व आनंदी होईल, जुन्या गोष्टींचा त्याला विसर पडेल, पुढें काय काय प्रकार घडतात त्यावर पाळत ठेवून प्रभाकराच्या बचावाची योजना करतां येईल व आपल्या राष्ट्रकार्यांत त्याचा योग्य वेळीं उपयोग करून घेतां येईल, इतकीं सर्व धोरणें साधण्याजोगें निवांतस्थान प्रभाकराकरितां कसें मिळवावें याचे शोधांत वृंदावन होते. वामनरावांनीं मधुकराच्या शिक्षकाकरितां वृंदावनाजवळ केलेली विचारपूस वृंदावनांना प्रभाकराचे दृष्टीनें अतिशय पटली; व 'ब्राह्मण विद्यार्थी आहे. माझ्या खालीवर ठेवून घेण्यास तयार असाल तर मनुष्य देतों' असें वृंदावनांनीं सांगितले. वृंदावनांच्या शद्बाला त्यांच्या सर्व स्नेही मंडळीत चांगलाच मान असें. डॉक्टरांनीं वृंदावनांचें म्हणणें एकदम मान्य करून 'ताबडतोब मनुष्य रवाना करा' असेंही सांगितलें.

वृंदावनांनीं ही सर्व हकीकत प्रभाकरास सांगितली. लगेच वामनरावांचे बंगल्यावर जाण्याकरितां प्रभाकरची तयारी करून देण्यांत आली. यापुढें एक वर्षपर्यंत वृंदावनाकडे प्रभाकरानें येऊं नये किंवा परिचयही दाखवूं नये, उलट वृंदावनांनींही प्रभाकराशीं प्रकट परिचय ठेवूं नये आणि अहिल्यापुरींतील वातावरणावर बारीक नजर ठेवून पुढें काय काय घडतें व प्रभाकराची व्यवस्था त्या धोरणानें पुढें कशी ठेवायची याचा त्यांनीं विचार करावा असें उभयतांत ठरलें, व जड अंतःकरणानें प्रभाकर जाण्यास निघाला.

माणसांनीं गजबजलेल्या असूनही स्वतांस शून्य झालेल्या जगांत आपला एकच एक बंधु असे जे वृंदावन त्यांच्याकडे प्राणसंकटांतही उडी घालून धाव घेतली, पण त्यांचाही आणखी एक वर्षपर्यंत वियोग होणार ही कल्पना प्रभाकरास अत्यंत दुःसह वाटली. पण वृंदावनांची योजना त्याच्या कल्याणाचीच होती, आणखी ती त्याला पूज्य वाटणाऱ्या वृंदावनांची योजना होती. तेव्हां मनानें सुद्धां तीस इनकार देणें त्यास पापवत् वाटलें.

प्रभाकर आतां सात आठ दिवस वृंदावनांचे घरीं होता. अन्नपूर्णाबाईशीं-ही त्याचा परिचय झाला असून तो त्यांना आईप्रमाणें मानूं लागला होता, व

अन्नपूर्णाबाईसही त्याजबद्दल प्रेम वाटत होतें. प्रभाकर जाण्यास निघाला तेव्हां सर्वांस गहिंवर आला. त्यानें अन्नपूर्णाबाईंच्या चरणीं मस्तक ठेविले. तेव्हां त्यांनीं त्यास ' दीर्घायुशी हो ' असा अशिर्वाद दिला.

" नको काकू, आतां दीर्घायुष्य घेऊन या जिवंतपणाच्या यातना किती सोसू ?" प्रभानें एक दीर्घ निःश्वास टाकला.

" अरे ! अरे ! असं काय बोलतोस वेडंवाकडं !" वृंदावन त्यास समजावीत म्हणाले "तुझा बचाव व्हावा म्हणून तर एवढी सारी खटपट ! तुझा तुला कंटाळा आला असेल पण मला तूं हवा आहेस. अशी नररत्नं जिथं उकिरड्यावारी फुंकली जातात त्या देशाचं दुर्दैव खरंच खडतर असलं पाहिजे !"

" वृंदावन " प्रभाकर गहिंवरून त्यांस नमस्कार करीत म्हणाला, "मलाही केवळ तुम्हासाठींच जगावंस वाटतं. म्हणून तुमची आठवण होऊन तुमचं पत्र येतांच जगण्याचं ठरविलं व असा आगीच्या डोंबळ्यांतून इकडे धांवत आलों. आई, बाबा, दादा, वहिनी, सर्व गेलीं. माझे आतां सर्व आप्त तुम्हीच आहां; माझे तुम्ही सद्गुरु आहांत. हें जीवित मी तुमच्या चरणीं अर्पण केलं आहे. सर्व आशा संपल्या होत्या तेव्हां तुमच्या नांवानं जीवित जतन करून ठेवलं. कोठल्याही सत्कार्यांत याची आहुति द्या. आतां तुमच्याच हातून माझं कल्याण होणार आहे. आईबाप प्रेमाचं जीवन घालून शरीर–मनाचं पोषण करतात. सद्गुरु देह सत्कार्यी लावून अंतःकरणास शांति देतो. जगांतील सर्व शारीरिक व मानसिक खटाटोपाचं हेंच साफल्य आहे. माझ्या मस्तकावर कोणीं निखारे उधळले तरी मी डगमगणार नाहीं. तुमचं प्रेम निरंतर असूं द्या !" प्रभाकरास उद्वेग व आवेश अनावर झाला. वृंदावनांनीं त्यास आपल्या बाहूत कवटाळून धरून धीर दिला.

" बाळ, तुला गुरु शोभावं अशी माझी योग्यता नाहीं. पण तुझा भावच तुला तारील. मी किंवा कोणीही निमित्तमात्र आहों. तुझ्या या आदरास पात्र होण्याचा मात्र मी शक्यतो प्रयत्न करीन. तुजसारखे वैराग्यवंत शिष्य असण्यानंही गुरूचा उद्धार व्हायचा " वृंदावनांनीं कष्टी मनानें प्रभाकरास निरोप दिला.

भांबुर्ड्याच्या माळावर डॉक्टर वामनरावांचा बंगला चांगल्या हवेशीर

जागेंत उभारीला होता. सभोंवार फुलाफळांची सुशोभित बाग होती. प्रभाकर बागेचे फाटकाशीं टांग्यातून उतरतो, तोंच मास्तरांचें स्वागत करण्याकरितां मधुकर विटी दांडू घेऊन बागेच्या फाटकांशीं उभाच होता. टांगा थांबतां थांबतांच टांग्यांतून चढून त्यानें मास्तरांची बॅग उचलली व तडक बंगल्याकडे धांवत त्यानें ओटीवर डॉक्टरांना मास्तर आल्याची वर्दी दिली. इतक्यांत प्रभाकरही बागेंतून बंगल्याकडे येतांना दिसला. पुढें होऊन वामनरावांनीं त्यास हाती धरून माडीवर नेलें. दुपारची भोजनाची वेळ झालीच होती. पाय धुवून लगेच मंडळी भोजनास गेली. वामनराव व प्रभाकर यांचीं पानें ओळीनें मांडली असून त्यांच्याच समोर किशोरी व मधुकर यांची पानें मांडलीं होती. पत्नीच्या भिडेस्तव घरचा जेवणाचा थाट वामनरावांनीं ब्राह्मणी पद्धतीचाच राहूं दिला होता. राधाबाई स्वतां वाढत असून सैंपाकीण सैंपाक करीत होती. प्रभाकरास यापुढें वामनरावांच्या घरच्या मंडळींतल्या प्रमाणेंच राहावयाचें असल्यामुळें खेळीमेळीनें व आनंदित वृत्तानें राहण्याबद्दल त्यास वृंदावनानीं बजाविलें होतें, आणि प्रभाकरानेही तसा निश्चय केला होता.

**डॉक्टर**—हा तुमचा शिष्य बरका मास्तर. फार हूडपणा करतो, चांगला चोप देत जा याला.

**मधुकर**—सगळेच मास्तर मारकट नसतात कांहीं. नाहीं काहो मास्तर ?

**प्रभाकर**—मी तुला कधींही मारणार नाहीं. पण तूं शिकशील ना आनंदानं ?

**मधु**—हो, न शिकायला काय झालं ? पण मागील मास्तर म्हणत कीं, ‘ छडी खाली म्हणजे विद्या येते. ’ आणि शिकायला आले कीं मारूं लागत आपले ! मी म्हणे ‘ मला ती विद्याच नको मुळीं ! ’ एक दिवस मग मार खातां खातां मी त्यांची छडी हिसकून घेतली आणि आईकडे ठोकली धूम् ! दुसऱ्या एका मास्तरनीं मला मारतांना मी रडलो तर रडतोस कां म्हणून त्यांनीं मला पुन्हां मारलं. मी मग पुन्हा त्यांचेकडे शिकायला नाहींच बसलों.

**प्र.**—पण तूं अभ्यास केला नसशील म्हणून मारलं असेल !

**मधु.**—पण मी केला होताच. हरिश्चंद्राचा धडा किनई, घोकून पाठ करायला दिला होता. ते म्हणत धडा पाठच असला असला म्हणजे वाचायला

सहज येतो. मी पाठ म्हटला देखील. पण त्यांतल 'तारामतीनें शोक केला' हें वाक्य मला नाहीं आठवलं. तेव्हां ते चवताळून माझ्या अंगावर धावले नी छडी मारीत मारीत 'थांब तुला शोक करायला लावतो' असें खेंकसून ओरडले. पुन्हां थोड्या वेळानं 'इतकं सुचवून मुद्दां नाहींना आठवत गाढवा!' म्हणून त्यांनीं आणखी चार पांच छड्या भराभर ओढल्या.

प्रभाकर अगदीं खदखदून हंसला. किशोरी, वामनराव, राधाबाई सर्वांनाच हंसू आवरेना. अशा विनोदांत जेवणें होऊन मंडळी माडीवर गेली.

आज रविवार असल्यानें मुलांना शाळा नव्हती. डॉक्टरही रविवारीं फक्त जरूरीचीच कामें करीत, म्हणून घरींच होते माडीवर एका बाजूस एक चार खणी प्रशस्त खोली त्यांनीं प्रभाकराकरितां सजवून दिली. तींत एक मोठा आरसा, एक बाक, एक टेबल, दोन तीन खुर्च्या, एक आराम खुर्ची व मधुकराकरितांही एक लहानशी टेबल खुर्ची ठेविली होती. शिवाय वृंदावनांच्या विशेष सूचनेवरून सर्व प्रकारचे सामाजिक, धार्मिक, ऐतिहासिक व तत्वज्ञानविषयक निवडक ग्रंथांनीं भरलेलें एक कपाटही तेथे ठेवण्यांत आलें होतें. निजण्याकरितां एक स्प्रिंगची कॉट त्यावर चांगल्या प्रकारचें अंथरुण व कॉटजवळ लहानशा स्टुलावर पाणी पिण्याची भांडीं असून मोरीचे बाजूस एक बकेट, तांब्या, टुवाल, टुथपावडर, साबण वगैरे साहित्य ठेविलें होतें. प्रातर्विधी, स्नान, भोजन इतक्या पुरतेंच प्रभाकरानें खालीं यावे व एरवीं सर्वकाळ नित्रस्तपणें एकांतांत त्यास राहतां यावें म्हणून तेथें सर्व सिद्धता केली असून खोलीही माडीवर व जरा बाजूस असल्यामुळें घरच्या मंडळीखेरीज तेथें कोणाचा संपर्क पोंहचणार नव्हता!

भोजनोत्तर वामनराव प्रभाकरास त्याचे खोलींत नेऊन म्हणाले.

"ही तुमची खोली मास्तर, अगदीं पृथक एका बाजूला मुद्दाम तुम्हांकरितां मोकळी करून घेतली आहे. इथें आनंदांत रहा. काय लागेल सवरेल तें मागून घ्या. कोणतंही कामधाम करण्याचं कारण नाहीं. गडीमाणसं आहेत त्याचे-कडून करून घ्यावं. ही आमची मुलगी किशोरी, मधु तर तुमचा शिष्यच, घरीं कुटुंबालाही सांगून ठेवलं आहे, तुमचं कोणी कांहीं कमी पडूं देणार नाहीं. तुमच्या इच्छेप्रमाणं कुणाशींही खुलेपणें बोलायचालायला माझी

हरकत नाहीं, अगदीं घरच्यासारखं निःसंकोच रहा. वृंदावनांचे प्रियशिष्य तुम्ही! मला त्यांच्याविषयीं अत्यंत आदर वाटत असतो. तेव्हां तुमची थोडी सुद्धां गैरसोय झाल्यास आम्हांला सर्वांना वाईट वाटेल. बरं, अर्जंट केस आहे. पहायला जायचंय. मी जातों. बसा तुम्ही " असें म्हणून खोली प्रभाकराचे हवाली करून वामनरावांनीं त्याची रजा घेतली. किशोरी वामनरावाबरोबरच खोलीबाहेर गेली. मधुकराने कांहीं वेळ इकडे तिकडे चार उडया मारल्या व तोही बाहेर निघून गेला.

आठ दहा दिवसांच्या अवधींत प्रभाकराच्या आयुष्यांत व मनांत एक-सारखी विलक्षण उलथापालथ होत असून आज आतां थोडीशी स्थिरावस्था त्यास प्राप्त झाली होती. व या स्थिरावस्थेशीं मनानें एकजीव होण्याकरितां खोलीचे दार ओढून घेऊन त्यानें आरामखुर्चीवर अंग टाकले. पण एवढ्या खळबळीच्या आयुष्यक्रमाला इतक्या लवकर विसावा कसचा मिळतो.! धडाडून पेटलेलें घर विझलें तरी आंतून किती तरी दिवस अग्निनारायण एकसारखा धुमसत असतो. तशीच आता प्रभाकराची स्थिती झाली. सर्वत्र यावेळीं स्तब्ध व शांत होतें. खोलीच्या खिडक्याउघड्या असून त्यांतून मधेंच वाऱ्याची एखादी झुळूक येई. उन्हाची वेळ म्हणून पक्षांचाही किलबिलाट नव्हता. वाऱ्याची झुळूक आली असतां झाडांच्या पानांचा मंदध्वनि केव्हां तरी होत असे. गाडीमाणसेंही उन्हाचीं ओसरीवर लवंडलीं होतीं. इतक्या नितांत शांततेच्या मध्यभागीं बसूनही प्रभाकर मात्र अगदीं अशांत होता. बाहेरच्या सृष्टीकडे त्याचें लक्ष नव्हतें. खुर्चीवर पडल्या पडल्या मनांतल्या मनांत आतां तो आपला भूतकालीन आयुष्यमार्ग आक्रमूं लागला. स्वतांलाच किळसवाणे वाटणारे अखेरचे प्रकार त्यानें झरझर दृष्टिआड केले. गंगाधर देवकींच्या मृत्यूचा प्रसंग तर त्यानें अगदींच बाजूस काढला. दुःखाचा अगदीं कडेलोट झाला असतांना मनुष्य हताश होऊन एकांतांत बसलेला असतो तेव्हां आठवणींत येऊं शकतील असे सुखाचे सर्व प्रसंग आठवून आठवून त्यांची गोडी चाखीत माणूस आपल्या प्रस्तुत दुःखांवर फुंकर घालीत असतो. तसेंच प्रभाकरानें अगदीं लहानपणाचे—अगदीं आईच्या अंकावर लोळून घालविलेले दिवस आठविले.

ते बाबा, ती आई, गाडीमाणसें, ऐश्वर्य, सर्व त्यानें क्रमाक्रमानें आठवणींत आणलें, गजाननाचीही पूजाही आठवली, वटपौर्णिमेचा प्रसंग, दादाचा पराक्रम व बलदेवाची फजीति हेंही सर्व त्यास आठवलें. पुढें दादाचें लग्न झालें. त्यांतला तो थाटमाट ती आईची धांदल ती आपली नवी वहीनी हेंही चित्र त्यानें रेखाटलें. पुढें दादा वहिनीशीं बोललेल्या गोष्टीही त्यास आठवल्या. पुढें देवकीचें तें सुंदर बालक--हाय हाय ! त्याचें तें फुटलेलें मस्तक मात्र आतां त्याच्या पुढून जाईना. पुन्हां आपल्या बालपणाकडे त्याने एक फेरी मारून पाहिली. पण तें हातभाग्य बालक त्यास आतां सोडीचना. आतां तर प्रेतवत झालेली दादा—वहिनीही त्याचेपुढें आलीं आणि डोळयांत प्राण शिल्लक ठेवून आपणाकडे पाहाणारी आई, पिस्तुलच्या धडाक्यानें परभारें कपाळमोक्ष करून घेणारे बाबा या सर्वांनीं आता त्याला अगदींच वेढलें. यांना दूर सारावें म्हटलें तरी आतां त्यालाच त्यांच्या दर्शनाचा मोह आवरेना. या सर्वांच्या सुखावस्था दृष्टीसमोर येणार नसत्याच व हींच त्यांची भयानक चित्रें पहावयाचीं असलीं तर तींही वरींच असें त्यास वाटलें असेल. तीं चित्रें दूर सारण्याऐवजीं त्या डोकें फुटलेल्या बालकाला आपण कडेवर घेतलें आहें असा भ्रम होऊन त्याचें दुःख अनवार झालें व आराम खुर्चीवर छातीशीं आडवे हात घेऊन व डोळे मिटून पडला असतां एकदम मोठा हुंदका येऊन त्याचे डोळ्यांतून एकसारखे अश्रु वाहूं लागले. संकटांचे एकावर एक प्रहार होऊन त्याची मनाची खंबीरी आतां शिथिल झाली होती. हुंदक्याच्या दचक्यानें तो सावध झाला, व गालांवरील कढत्त अश्रू पुसून खुर्चीवरून तो चटकन उठला. समोर पहातो तों—खोलीचें लावलेलें दार थोडेसें उघडून त्या दाराशीं, अर्धवट विणलेला गळपट्टा हातांतल्या सुयांनीं विणीत व आपणाकडे लक्षपूर्वक पहात उभी असलेली किशोरी !

दुपारीं जेंवतांना प्रभाकरासमोरच किशोरी जेवणास बसली होती. जेवतांना प्रभाकराची दृष्टि चुकवुन तिनें त्याकडे अनेकवार अगदीं टक लावून पाहिले होतें. प्रभाकरास सध्यां काळजीनें काळवंडला असला तरी जातीचें त्यांचें सौंदर्य तेवढ्यानें लोपलें नव्हतें. सुरूप, कुलवान व बुद्धिमान दिसणाऱ्या तरुणाकडे पाहण्यांत सामान्यतः सर्वांनाच वाटणाऱ्या कुतूहलानें तिनें

त्याकडे प्रथम पाहिले, तरी मग तिची दृष्टि त्यावरून निघेना. ती तेथे खिळ-ल्यासारखी झाली. कांहीं दृढभावनामय माणसांचा असा प्रकार असतो कीं त्यांची भावना तीं शद्बांनीं व्यक्त करीतच नाहींत, किंवा अधिक खरें म्हणजे त्यांच्या बुद्धींत भावना तीं शद्बांनी आकार पावलेल्याच नसतात. म्हणजे त्या भावनांची त्यांना बुद्धीने जाणीव नसते. त्यांच्या भावना हृदयांतल्या हृद-यांत गूढ व अव्यक्त असतात. तेथून वाचेनें, किंवा मनांतही शब्दाने म्हणजे स्पष्ट कल्पनेने व्यक्त न होता अंतःकरणांतील अंधारांतून एकदम कृतिरूपाने जगांत त्या अवतीर्ण होतात. असें कांहींसें किशोरीचें होत असें. तिचे, दया, प्रेम, वगैरे दृढसद्भाव कृतीवरून दिसून येत. पहिल्यानें सामान्य कुतूहलानें प्रभाकरा-कडे लागलेली दृष्टि तेथेंच कां खिळला हें तिला कळलें नसावें किंवा त्याचा तिनें कधीं विचारही केला नसावा. अशा गूढ विक्रिय माणसांना स्वतांच्या बऱ्या-वाईट वर्तनाची जाणीव नसल्यानें, वर्तन चांगलें असलें तरी अहंकारादि दुर्गुण जसे त्यांच्यांत शिरत नाहींत तसेंच पण वाईट वर्तन असलें तर त्याचें निय-न्त्रण करावें हेंही त्यांच्या कधीं लक्षांत येत नाहीं. अशा रीतीनें प्रभाकरा-कडे एकसारखें पाहाण्यांत किशोरीनें म्हणजे काहीं वाईट वर्तन केलें असें म्हणणें नाहीं. पण ज्याचें त्याला रुचिवैचित्र्यानें तें वाईट वाटणें शक्य आहे एवढाच मुद्दा. पण किशोरींत तें कांहींच नव्हते. प्रभा-करालाच चमत्कारिक वाटेल म्हणून तिनें त्याच्या दृष्टीशीं अगदीं सरळ दृष्टि भिडविली नाहीं इतकेंच. जेवतांना तर तिनें त्याकडे अनेक वेळां पाहिलेंच. जेवणें झाल्यावर वामनरावाबरोबरच ती प्रभाकरच्या खोलींत गेली. तेथेही ती त्याकडे पहातच होती. वामनरावांबरोबर ती बाहेर पडल्यानंतर प्रभा-करानें दार लावून घेऊन तो खुर्चीवर डोळे मिटून पडला असतां त्याचे समो-रील उघड्या खिडकीसमोरच्या तिच्या स्वतःच्या खोलीच्या खिड-कींत ती गळपट्टा विणीत बसली. गळपट्टा हातांत नांवाला मात्र होता. गळ-पट्टयाकडे तिचें लक्षच नव्हतें. हात चालतां चालतां मध्येंच चुके नाहींतर विणणेंच बंद पडे. खिडकीवाटें तिनें प्रभाकराकडे एकसारखी टक लाविली होती. तिला वाटणाऱ्या भावनेचें शब्दचित्र तिच्या मनश्चक्षूंपुढें नसल्यामुळें

तिचा चेहरा सर्व वेळ एकसारखाच शांत व निर्विकार होता. मधून मधून ती गळपट्ट्याकडे वळे, पण पुन्हां खिडकींतून न्याहाळून पहाण्याचा तिचा खेळ सुरू होई. प्रभाकर आपल्या मनांतील सुखदुःखस्वप्नांत दंग होता. पडद्याबाहेर प्रकाशांत हालचाल करणाऱ्या माणसाच्या छायेच्या हालत्या आकृति जशा पडद्याच्या मागील बाजूवर अंधारांत दिसतात, तशी प्रभाकराचीं मनांतील सुखदुःखें त्याच्या चेहऱ्यावर निरनिराळे विकार दर्शवीत होतीं, त्यामुळें तर किशोरीस तो विशेषच प्रेक्षणीय वाटला. हळू हळू त्याचा दुःखविकारच कायम राहून वाढूं लागलेला तिनें स्पष्ट पाहिला. तिचें तिचें दयाळू अंतःकरण हेलावलें व खिडकींतून उठून ती प्रभाकराच्या खोलीकडे वळली. दाराशीं जाते तोंच हुंदका ऐकूं आला. अर्धें दार उघडून वाकून पहाते तो प्रभाकरचे गौर कपोलावर मिटल्या डोळ्यांतून घळघळ अश्रु ओघळूं लागलेले तिला दिसले. हा सावध होण्याचे आंत आपण दार लावून परतावें असें एकवार तिला वाटलें. तिचे पायही मागें वळले, पण दृष्टि परतेना. इतक्यांत प्रभाकर उठलाच. आपणाच त्याचा मनक्षोभ दिसला त्याचें त्याला वाईट वाटलें असावें हेंही तिच्या लक्षांत आलें. तिला याचे वाईट वाटले व ती कांहीं न बोलतां तसेंच दार परत लोटून माघारीं येऊन आपल्या खोलींत मघाची खिडकी बंद करून बसली.

# १३ :

दुसरे दिवसापासून मधुकराची शिकवणी नियमितपणें सुरू झाली. पहिले दिवशीं एकंदर विषय कोणकोणते, पुस्तकें कोणतीं वगैरे माहितीं करून घेऊन प्रभाकरानें मधुकराच्या अभ्यासाची चाचणी पाहिली. अभ्यासांत त्याची विशेष तयारी दिसली नाहीं. जात्याच मधुकर अति धीट. शिक्षकाबद्दल त्यास विशेष आदर वाटत नसावासें दिसलें. पण हातीं घेतलेल्या कामाचा पिच्छा पुरविण्याचा प्रभाकराचा स्वभाव असल्यानें त्यानें मधुकराच्या मनांत खोल शिरून त्यास ओळखण्याचा निश्चय केला. उगीच फार बोलणें हा त्याचा स्वभावच नसल्यामुळें प्रभाकर कधीं परिणामकारक बोलेल असें कुणालाही वाटलें नसतें. पण उपयोग नसतांवेळीं सुप्तावस्थेंत असल्यानें नाहींतशा वाटणाऱ्या शक्तींचीं बीजें आयुष्याच्या निरनिराळ्या भागांत प्रसंगानें अकस्मात अंकुर पावतात व पुढें त्याचें मोठाले वृक्षहीं होतात असें पुष्कळदां आढळतें. तसें यावेळीं प्रभाकरचें झालें. मधुकरास शिकवून तयार करावयाच असा एकदां मनाचा निर्धार करून तो त्या कामास लागला, तेव्हां त्याची वाग्देवी प्रसन्न व प्रफुल्लित झाली. बुद्धिवान् व भावनामय मनुष्याला वाणी स्फुरण पावूं लागली कीं मग तो जसा कांहीं गंगेचा प्रवाह ! तेथें शुभ्र व शीतल जलाची कमतरता अथवा पात्रांत उथळपणा किंवा अडथळा असायचाच नाहीं. प्रथम प्रभाकरानें इतिहास व भाषाविषय शिकवायला घेतले. त्याची स्वतःची तयारी उत्कृष्ट होती. लहान मुलांना समजेल अशा सोप्या भाषेनें त्यानें एकेक मुद्दा विशद करून सांगण्यास सुरवात केली. त्याच्या अस्खलित, नादबद्ध व

गोड वाक्प्रवाहात मधुकर रमून गेला. गुरुशिष्यांची ती तल्लीन वृत्ति किशोरी आसपास हिंडून पुनः पुनः पाही, व तीही आ॑दे. कांहीं दिवस शिकविल्यावर प्रभाकरास आढळून आलें कीं मधुकर बुद्धिप्रेमी माणूस आहे, त्याच्या भावनेस जागृत करून बुद्धीचें समाधान करीत करीत शिकविणाऱ्या शिक्षकास तो अगदीं वश होतो. प्रभाकरास खरोखरच मधुकर फार लवकर वश झाला. मास्तराना बुजून शिकायला सुद्धां न बसणाऱ्या मधुकरास आतां मास्तराच्याशिवाय करमेचना.

प्रभाकर शिकवूं लागला कीं आपल्या विषयांत अगदीं समरस होत असे व विषयानुरोधानें अगदीं मोकळेपणें अभिनय करी त्याचा मधुकरवर फार उत्कृष्ट परिणाम होई. शाळा कॉलेजांत इतिहास काव्यें नाटकें वगैरे शिकविणारे शिक्षक तन्मय होण्यास विसरतातच: काहीं तर अभिनय करण्यास लाजतात. भाषेतील रहस्य सांगण्याचे निमित्तानें ते विद्यार्थ्यास व्याकरणांतच घोळवीत बसतात. मेघदूतासारखें कर्णमधुर काव्य पण त्यांना मद्यसुरांत वाचणेंच परवडतें. इंग्रजी काव्याची प्रासोडी शिकवितांना, एखाद्या संस्कृत काव्याची पृथ्वी, मंदाक्रांता, विरहिणी वगैरे सुस्वर वृत्तावरून—अर्थ न समजतांही -गोडी लागते व गाऊन दाखवून गोडी लावता येते तशी एखाद्या इंग्रजी काव्याची कोणा इंग्रजीच्या प्रोफेसरानें गाऊन दाखवून गोडी लावली असें कधीं आढळांत येत नाहीं वृत्तगायनांची जी कथा तीच भावनेचीही. उत्तर रामचरित नाटकाचा तिसरा अंक शिकवितांना शिक्षकाचे अश्रू आगाऊच वाळलेले असतात, आणि रामाच्या कारुण्यकोलाहलांतून परीक्षेजोगा प्रश्न हुडकून काढण्यांत गुरुशिष्य दंग झालेले असतात. शेक्सपीयरचा एक अतिविनोदी भाग शिकवीत असतां 'येथें कधीं तुम्ही हंसावे असे अपेक्षितो आहे' ( Here the poet eupects you to laugh ) असें एका प्रोफेसरांनीं एकदां गंभीरपणें सांगितलें. मुलें बिचारीं हें ऐकून हसलीही. पण ती शेक्सपीयरच्या विनोदाला नसून गुरुवर्यांच्या अरसिकतेला. बाकी गुरुवर्यांच्या लक्षांत कांहीं एवढा बारकावा आला नसावा. पोस्टमास्तरासारखे शाळा मास्तर निर्विकार असले म्हणजे विद्यार्थ्यांची असलेली बुद्धि अन्न नाहीं म्हणून सुकून जायची. असो.

पूर्वी न दिसलेले चांगल्या वक्त्याचे सर्व सद्गुण प्रभाकराठायीं दिसूं लागले. प्रिय वत्सास पाहून गोमातेस पान्हा अनावर व्हावा त्याप्रमाणें मधुकरांस पहातांच प्रभाकराची वाग्गंगा गंभीर अर्थानें भरून वाहूं लागे. साध्या मराठी कविता प्रभाकर अतिशय गोड म्हणे; आणि मधुकर त्याच्या स्वरांत स्वर मिळवून त्याचें अनुकरण करी. वाचून दाखवितांना प्रभाकर असें वाचून दाखवी कीं एकता ऐकतांही बहुधा सर्व अर्थ मधुकराचे लक्षात भरावा. एखादा रसाळ विषय समजून देतांना प्रभाकराची तन्मयता कांहीं विशेषच असे. मधूला हरिश्चंद्राची कथा फार आवडे व एक वेळीं 'ती गोष्ट मास्तर तुम्ही एकदां सांगा' असा त्यानें हट्ट धरला. ही शिकवणीची रोजची वेळ नव्हती, प्रभाकर खिडकीच्या गजाशी राहून कांहीं वाचीत उभा होता. मधु तेथेंच समोर स्टुलावर बसला होता. यावेळीं प्रभाकरास आपल्या वाचनांत कांहीं अडथळा नको होता. पण मधुकर कांहीं केल्या ऐकेना. तेव्हां त्याची जिज्ञासा भंग न व्हावा म्हणून प्रभाकरानें पुस्तक बाजूस काढून हरिश्चंद्राची कथा सांगण्यास सुरुवात केली. आर्यांच्या पुराणग्रंथांत हरिश्चंद्राचें आख्यान म्हणजे कर्तव्यनिष्ठेची सीमा व करुणरसाचा महापूर आहे. अशा कथानकास मूर्तिमंत कारुण्य असा प्रभाकर वक्ता लाभलेला! कथानक जसजसें पुढेंपुढें चाललें तसतसा प्रभाकराचा आवाज व विकार चढूं लागला, आणि रोहिदासाचे प्रेतास अग्नि देऊन शोकाकुल झालेल्या तारामतीस ओळखूनही मन कच खात असतां केवळ मालकाचा हुकुम म्हणून निष्ठुर कर्तव्यनिष्ठेनें तारामतीच्या वधास प्रवृत्त झालेल्या हरिश्चंद्राच्या मनःस्थितीचें प्रभाकर सहृदयतेनें वर्णन करूं लागला तेव्हां त्याचें शरीर कंप पावूं लागले, डोळयांत अश्रू आले, शब्द कांपरा झाला श्रोता मधुकर तर दुःखानें बेभान होऊन गेला व एकदम धावत जाऊन त्यानें प्रभाकराचे गळयास मिठी मारली व तो रडूं लागला. किशोरी खोलीबाहेरून हा देखावा पहातच होती तीही तितक्यांत आंत आली. प्रभाकर सावध झाला त्यानें बोलणें थांबवून मधुकरास शांत केलें.

या प्रसंगामुळें मधुकरला व त्याहीपेक्षां किशोरीला प्रभाकर फारच आवडूं लागला. प्रभाकर पुष्कळ खुलेपणानें वागत असे व केव्हांही आभ्यांतलें कांहीं विचारलें तर सांगे म्हणून किशोरी व मधुकर

दोघेही अभ्यासास त्याचेच खोलींत बसूं लागलीं. किशोरी प्रभाकरशीं बरीच धीट होऊं लागली होती. ती आतांशा त्याच्या नेहमीं कांहींना कांहीं बोलत असे. प्रभाकरालाही या मुलांनीं तेथेंच बसावें, आपल्याशीं मोकळेपणें बोला-चालावें हें आवडूं लागलें. किशोरी केंव्हां केव्हां अभ्यासांतील एखादा विषय प्रभाकराकडून समजाऊन घेई व प्रभाकरासही मनात आलेला एकादा विचार किशोरीजवळ बोलून दाखविण्यांत आनंद वाटूं लागला. वामनराव सवडी-नुसार प्रभाकराची भेट घेऊन विचारपूस करीत. त्याचें शिकवणे पाहण्याक-रितांही ते एकदोनदां येऊन बसले होते. त्यावेळीं त्यांचें पूर्ण समाधान झालें. आणि मधूलाही मास्तर फार आवडलेले पाहून वामनरावांना खूपच आनंद झाला.

तास दोन तास शिकवणीचें काम केल्यानंतर उरलेला सारा वेळ प्रभा-कर चांगल्या प्रकारें घालवी. अहिल्यापुरींत पूर्वीं होतें तें वेळावत्रक त्यानें आतां सुरू केलें. तो पहाटेस उठून स्नानासुद्धां सर्व प्रातर्विधि उरकी. निय-मित व्यायाम घेई. गजाननाची एक मूर्ति आतां त्यानें पुन्हां मिळविली. तिची पूजाअर्चा आरतीधूपारतीही तो नेमानें यथासांग करी. बाकीचा वेळ पुस्तके वाचीत, विचार करीत, अथवा मधु किशोरीशीं बोलत बसे. संध्याकाळी किशो-रीमधुकरांची शाळा सुटल्यावर त्यांना घेऊन तो जवळच्या टेकडीवर फिराव-यास जाई. त्यावेळीं तो मधुकराला वीर पुरुषांच्या गोष्टी सांगे. सृष्टीच्या देखा-व्याचें वर्णन करी अथवा शाळेंतील अभ्यासक्रम, बऱ्यावाईट माणसांचे स्वभाव, चालीरीती, हवापाणी वगैरे विषयावर किशोरीशीं बोलें. किशोरी फारच थोडे बोले. पण प्रभाकराचें भाषण मात्र फार लक्ष देऊन ऐके. तो कांहींही आणि कितीही बोलला तरी तिला त्याचा कंटाळा येतच नसे किशो-रीला आजवर देवदेवांची ओळखसुद्धां नव्हती. पण आतां ती तिन्ही सांजा फिरून घरीं येतांच हात पाय स्वच्छ धुवून प्रभाकराच्या गजाननाच्या धुपारतीची तयारी करी, व आरतीच्या वेळीं प्रभाकरासमवेत मोठ्यानें आरती म्हणून मग डॉक्टर आल्यावर सर्वजण जेवत. गजाननाच्या सकाळच्या पूजेची तयारी-ही किशोरी स्वतांच करूं लागली. प्रभाकरास दोन वेळ चहा वर आणून देण्याचेंही तिनें पत्करिलें, व तो खालीं गेला असला म्हणजे संधी साधून त्यास न कळत ती त्याचे कपडे शाफसूफ करून ठेवूं लागली. मधूचीही या सर्व

कामांत तिला मदत असे. प्रभाकराकरितां आपण कामधाम करावें, त्याच्याशीं पुष्कळ बोलावें, त्याजवळ शिकावें, त्यास आवडेल असें वागावें व त्याला आनंदांत पहावें याचा किशोरीला अगदीं नादच लागला. उलट प्रभाकराच्या अजून लक्षांत आलें नसलें तरी त्याचेंही मन किशोरीनें हिरावलें होतें.

वामनराव यांनीं प्रभाकरास ग्रंथसंग्रह अगदीं उत्कृष्ठ व निवडक दिला होता. मधुकर व किशोरी यांच्या संगतीत पूर्वीच्या दुःखाचा थोडासा विसर पडून मनाला आराम मिळतांच बुभुक्षितानें अन्नावर झडप घालावी तसा प्रभाकरानें ग्रंथवाचनाचा सपाटा चालविला. त्यानें पुष्कळ चांगलीं पुस्तकें वाचून अभ्यासिलीं. कांहीं राजकीय कांहीं सामाजिक कांहीं तत्त्वज्ञानविषयक असें विविध वाङ्मय तो वाची. संवयीनें अवघड विचार व इंग्रजी भाषा त्यास समजूं लागली. गीतरहस्याची १५।२० पानें तरी वाचल्याशिवाय त्यानें कधीं तोंडांत पाणी घातलें नाहीं. त्याच्या तरतरीत बुद्धीस विशेषच अवघड नसलेले विचार भराभर आकलन होत.

अशा रीतीनें ठरल्याप्रमाणे वामनरावांचे घरीं प्रभाकराचें एक संवत्सर फार आनंदानें गेलें. एवढ्या कालांत तो वामनरावांच्या कुटुंबांतलाच एक झाला. सर्वांचें त्याजवर प्रेम जडलें होतें. मधूला व किशोरीला तर तो अगदींच आवडता झाला होता, व मास्तरांनीं आपल्याकडेच पुढें सुद्धां राहावें. असें दोघांनीं वामनरावांना विचारून ठरवूनही टाकलें होतें. प्रभाकरासही येथें राहणें बरें वाटूं लागलें होतें. पण कायम राहण्यासंबंधी विचारतां वृंदावनांना विचारून काय तें ठरवावें असें त्याचें मत दिसलें. ही वाटाघाट चालू असतां वृंदावनच एक दिवस प्रभाकराचे भेटीस आले.

वृंदावन आले ते सरळ गड्यानें दाखविलेल्या जिन्यानें वर प्रभाकराचे खोलींतच आले. दुपारची वेळ असल्यानें मुलें शाळेंत गेलीं होतीं. डॉक्टरही जरूरीच्या कामाकरितां कोठें परगांवीं गेले होते. कदाचित एकांत मिळावा म्हणून मुद्दाम तशी वेळ पाहूनच वृंदावन आले असतील. ते आले तेव्हां प्रभाकर आराम खुर्चीवर वाचीत पडला होता. वृंदावनांना पहातांच तो उठला. त्याला फार आनंद झालासें दिसलें व त्याची ती आनंदी मुद्रा पाहून वृंदावनांनाही संतोष वाटला.

" काय प्रभा, बरे खुशाल ? " प्रभाकरानें पुढे केलेल्या खुर्चीवर बसत वृंदावनांनीं विचारलें.

" हो ठीक आहे. " प्रभाकर म्हणाला.

प्रभाकरची ती खोली, तेथील व्यवस्था, खिडक्यांतून दिसणारा सभोंवतालचा देखावा वगैरे पाहून वृंदावनांना बरें वाटलें. खुर्चीवरून अंमळशानें उठून ते पश्चिमेच्या खिडकीशीं बाहेर पडण्याकरितां गेले.

' गावापेक्षां इकडे हवा किती छान ! ' खिडकींतून येणाऱ्या वाऱ्यासमोर उभे राहून वृंदावन म्हणाले. प्रभाकराचें चित्त यावेळीं एकाएकीं कोणीकडे तरी गेलें होतें. वृंदावनांच्या बोलण्याकडे लक्ष न देतां ' तिकडील हकीकत काय ? ' असा त्यानें अकस्मात् चमत्कारिक चर्या करून प्रश्न विचारला. वृंदावनांनीं तें जाणलें व " हसन अपरात्रीं तुरुंगांत आलाच कसा ही गोष्ट प्रथम बलदेवाचे अंगाशीं येणारी असल्यामुळें तुझा शोध न करतां ' आरोपी बेपत्ता ' असा शेरा मारून प्रकरण तूर्त निकालांत काढावें व तुझा मुळींच शोधही करूं नये व कोणास कळलें तरी बोलूं नये असें अधिराजांनीं खाजगी रीतीनें ठरविल्याचें एक विश्वसनीय बातमीदार कळवितो " असे वृंदावनांनीं सांगितलें.

" तरी पण " ते पुढें म्हणाले " आजन्म निश्चित होतां येत नाहीं. आहे याच स्थितींत तूं आणखी कांहीं दिवस काढावेस असं मला वाटतें.

प्र.—माझी ना नाहीं. पण राहिलेल्या आयुष्याचं करायचं काय ?

वृं.—' राहिलेल्या ' असं काय बोलतोस प्रभा ? आतां तर तुझ्या आयुष्याला सुरवात होत आहे. तूं नांवाप्रमाणं तेजस्वी होशील असं मला नेहमीं वाटत असतं. दुर्दैवानं उगवतांच सूर्याला ग्रहण लागावं तशी कांहींशी तुझ्या मनाची अवस्था झाली आहे. पण हें ग्रहण लवकर सुटेल व आपणांस पुढें खचित कांहीं सत्कार्य करतां येईल. सध्यां येथें तुला थोडसं सुखांत राहतां आलं तर तुझ्या प्रकृतीच्या आणि मनाच्या दृष्टीनं मला तें हितकर वाटतं.

प्र.—छे छे ! वृंदावन ! मी येथें सुखांत आहे खरा, पण तुम्हांला पाहतांच मला मागली सर्व आठवण पुन्हां ताजी झाल्यासारखी वाटते. मी कित्येक दिवस जिवावर उदार झालों होतों हें मी विसरल्यासारखंच झालं आहे. मी

असाच सुखांत गुंतून तर नाहींना पडणार ?

या प्रकारच्या विचारास उत्तेजन देणें वृंदावनास योग्य वाटेना. " बरं आणखी कांहीं दिवस तूं येथेंच राहा. सध्यां मला गडबड आहे मी जातो." असं म्हणून वृंदावनांनीं तेथून पाय काढला.

मधुकराची परीक्षा नुकतीच होऊन तो तिसऱ्या इयत्तेंत पहिला आला. किशोरीही मॅट्रिकमध्यें गेली. त्यांच्या उभयतांच्या अभ्यासांत चांगली प्रगति झालेली पाहून वामनरावांची प्रभाकरावर फार मर्जी बसली. घरीं पत्नीजवळ ते त्याची प्रशंसा करीत. किशोरी तेथें असली म्हणजे ती प्रशंसा ऐकून तिला आंतल्याआंत अत्यानंद होई व तीही प्रभाकराच्या स्तुतदाखल एखादा शब्द बोले. राधाबाईनाही यामुळें प्रभाकर आवडूं लागला. सर्वांचें त्यावर प्रेम बसलें. किंबहुना त्याजवर प्रेम करण्यांत सर्वांची जणुं चढाओढ सुरू झाली.

पण एवढी मायेची पाखर अंगावर पसरत असतांही प्रभाकराचे चित्त वृंदावनांच्या दर्शनापासून कांहींसें चलबिचल पावूं लागलें. " खरंच एक वर्ष-भर मी येथें सुखानं राहिलों खरा, पण असं किती दिवस राह्यचं ? राष्ट्र-कार्यांत आत्मार्पण करून गीतारहस्यांत सांगितलेली चित्तशांति मिळवायची, किंवा मुंगीप्रमाणें तुरुंगाच्या कुजट वातावरणांत मरून जायचं नाहीं म्हणून तर एवढं धाडस करून तुरुंगांतून निसटून वृंदावनाकडे आलों. पण इथें आतां सुखात मरायचं माझ्या नशिबीं आहे काय ? दादा–वहिनींचा तसा अमंगळ शेवट झाला तरी बलदेव अजून जिवंतच आहे, मी सूडही घेतला नाहीं व राष्ट्रकार्यही केलें नाहीं......" त्याचे अंगावर एकदम शहारे आल्यासारखें झालें. त्याला सुखाची भीति वाटली. शतपावली घालतां घालतां तो पश्चि-मेच्या खिडकीशीं गेला व पुन्हां परत फिरला. दुपारची चहाची वेळ होती. आज शाळेला कसली तरी सुट्टी असल्यानें मुलें घरीं होती. समोरून किशोरी चहा घेऊन येतांना त्याला दिसली. तिला पाहतांच त्यास यापूर्वी आनंदाच्या लहरी येत. आजवर त्याच्या हें तितकेसें लक्षांत येत नसे. पण आतांच्या क्षणीं त्याला सुखाचा स्पष्ट विद्वेष वाटत होता. आतांही किशोरीला पहातांच त्यास सुख वाटले तरी

त्या सुखाची त्याला किळस वाटली. त्यानें तिजसमोर आपली मुद्रा गंभीर ठेवण्याचा प्रयत्न केला. ' यावेळीं तूं बाहेर जा ' असेंही सांगायचें त्याच्या अगदीं ओठाशीं आलें. पण तितक्या अवधींत किशोरी खोलींत येऊन "मास्तर, हा चहा आणलाय, घ्याना ! आणि आईनं हीं ताजीं बिस्किटं पण दिलीन्" असें म्हणून तिनें चहाचा कप टेबलावर ठेवून पुढें सारला. प्रभाकर टेबलाशीं आला. त्याचा हात्त चहाचा कप घेण्याकरितां पुढें झाला. किशोरीनें चटकन बिस्किटांची बशी त्यापुढे सारून त्यांतली दोन बिस्किटेंही त्याच्या पुढें आलेल्या हातावर दिलीं आणि दुसरा आणलेला कप स्वतां घेऊन व त्यांत दोन बिस्किटें टाकून मास्तरांनीं चहा घेण्याकरितां आपण चहा घेण्याचें खोळंबून ती उभी राहिली. प्रभाकराचे मनांत यावेळीं बाहेरच्या या प्रत्यक्ष सुखाशीं मनांतल्या स्मृतिदुःखाचा झगडा चालू होता. शरीरानें या झगड्यांत मनास बाजूस सारून चहा हातीं घेतला व त्यांत तीं बिस्किटें टाकलीं, आणि चहाच्या कपांत बिस्किटें जसजशीं विरघळत गेलीं तसतसा प्रभाकराचा मनःक्षोभही सुखसागरांत विरघळून गेला. हें अवस्थांतर प्रभाकराच्या स्पष्टपणें लक्षांत येत होतें. तेथे आपला इलाज नाहीं असेंही त्यास दिसलें. चहा घेतांना इकडच्या तिकडच्या कांहीं गोष्टी निघाल्या. चहानंतर कपबशा घेऊन जाण्याकरितां किशोरीनें हात पुढें केला. पण रोजच्याप्रमाणे आज प्रभाकरास तिच्या हातीं कपबशी देववेना. तो चाचरला, मागें वळला व बकेटांतील पाणी घेऊं लागला. तों किशोरीनें ' हें काय मास्तर ? ' असें म्हणून झटकन पुढें होऊन त्याचे हातून कपबशी काढून घेतली. त्यावेळीं ती आपल्या हातून कपबशी घेत आहे अशाच अवस्थेंत कपबशी न सोडतां बकेटावर वाकून तांब्यानें पाणी घेत घेत तो तिजकडे क्षणमात्र पहातांच राहिला. ती अवस्था त्याला एकदम प्रिय व अप्रिय वाटली. मनांत चाललेल्या रणकल्होळाची छाया चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होती. शेवटीं कपबशी त्यानें दिलीच. किशोरी बाहेर गेली. प्रत्यक्ष काहींच न करितां मनांतील अदृश्य झगड्याच्या श्रमानें त्याला दमल्यासारखें वाटलें. त्यानें एक दीर्घ निःश्वास टाकला. आणि एकंदरींत आपण दुर्बलतेनें सुखाला बळी पडलों याचें वाईट वाटून तो खजिल व खिन्न झाला आणि पुढें तरी सावध राहावें म्हणून तो मनास शिकवूं लागला.

यावेळेपासून त्याचा नेहमींचा उल्हसितपणा कमी झाला. जुन्या गोष्टींच्या आठवणी तो मुद्दाम पुनः पुनः आपल्याशी करी. त्या स्मृतीनें खिन्नता उत्पन्न करून तीच वृत्ति कायम ठेवण्याचा तो नेहमीं प्रयत्न करी. पण पुष्कळ वेळां त्यांस अपयशच येत असे. सुखाचा दंश दुःखापेक्षां खोल भिनणारा असेल काय? दुःखस्मृतींत रमला असतां मधुकर व किशोरी भोंवतीं आलीं कीं तीच दुःखस्मृती त्यास दुःख देईनाशीं होई. त्या वेळीं त्याला स्वःताच्या सुख मानून घेण्याच्या प्रवृत्तीचा संताप येई, आणि मुलांचे देखत दुःखी होण्याचा व दिसण्याचा तो फिरफिरून प्रयत्न करीत असे. या अंतःकलहामुळें त्याची वृत्ति अलीकडे क्षणोक्षणीं पालटे. किशोरी–मधुकरांना शिकवीत असतां किंवा खेळीमेळीच्या गोष्टी बोलत असतां त्याचा शद्ब केव्हां गळयांतल्या गळयांत विरून जाई केव्हां कारण नसतांही त्याचे डोळे अश्रूंनी भरून येत व कंठ गद्गद होई, तर केव्हां संतापानें लाल झालेला असूनही शांतपणें व प्रेमानें बोलण्याचा तो यत्न करतो आहे पण त्यांस तें साधत नाहीं असें उघड दिसे.

अलीकडे किशोरी व मधुकर यांच्या हें कांहींसें लक्षांत येऊं लागलें. एक दिवस मास्तरांना माडीवर चहा–फराळाचें देऊन किशोरी परत खालीं आली. मधु नुकताच मास्तराकडून येऊन आईजवळ चहा घेण्याकरितां बसला होता. सैपाकींण यमूनाबाई चहा व फराळाचें वाढीत होत्या. मधू आईकडे पाहून म्हणाला "आतांशीं मास्तर असे खिन्न कां असतात ग आई?" कोणीच कांहीं उत्तर देईना. यमूनाबाई राधाबाईकडे पाहून हंसत हंसत म्हणाल्या.

"सुख दुखत असेल! चार वेळां खाऊन सारा दिवस बंगल्यांत पडून राह्यचं, त्यांत दुःख कसलं असणार?"

"तुमचं तरी नाहीं ना कांहीं सरलं त्यांत यमूनाबाई?" किशोरी रागानें म्हणाली.

"म्हणजे मी त्यांना नांवं नाहीं ठेवलीं हो ताई! पण दिवस सारा एकच जागीं रिकामं बसून त्यांना करमत नसेल म्हटलं." यमूनाबाईनीं आवाज बदलून उत्तर दिलें.

"पण मधु, त्यांनाच कां नाहीं विचारीत खिन्न कां असतां म्हणून?" राधाबाईनीं यमूनाबाईकडे लक्ष न देतां विचारलें.

**मधु**—अग हो, आई ! मी एक दिवस त्यांना विचारलं सुद्धां कीं 'मास्तर, तुम्ही आजारी आहां कां?' म्हणून, पण ते एकदम रागावून 'तूं बाहेर हो' म्हणाले. मी तेव्हां भ्यालोंच अगदीं. पण लगेच पुढें होऊन त्यांनीं मला जवळ घेतलं. जवळच्या खुर्चीवर मी बसलों. त्यांनीं माझ्या अंगावरून हात फिरवला आणि म्हटलं ' कांहीं होत नाहीं मधु, पण मी तुला 'बाहेर हो' म्हटलं तें ताईला सांगूं नको हं ' असं त्यांनीं मला सांगितलं. ताई, मी तुझ्यापुढं बोललों हें मास्तरांना सांगूं नको हो !

किशोरी चहा न पिता बशी हातांत ठेवून मधूचें बोलणे ऐकत होती. त्याचा प्रेमळपणा आणि भाबडेपणा पाहून तिला हसूं आलें. राधाबाईही हंसल्या.

**राधा.**—बिचाऱ्याला प्रेमाचं कुणीं नाहीं म्हणून खेद होत असेल झालं ! लगीनतरी करून टाकावं बिचाऱ्याचं ! मी संभाळीन त्याच्या बायकोला.

**यम्ना.**—इश्श ! त्याला घरना दार, याला मुलगी द्यायला कुणाला पोटची पोर वरच आली असेल !

**किशोरी**—मुलगी जावयाला द्यायची कीं घराच्या आढ्याला नाहीं तर शेताच्या कुंपणाला बांधायची ?

**राधाबाई**—मिळेल तर काय झालं मुलगी ! नसलं म्हणून काय झालं घरदार ! मुलगा कसा हुशार आहे ! रुप तर कांय नुसतं सांडतंय ! आपत्काळ आला असला तर काय करील बिचारा ! पैसा काय नशीबाचं देणं-घेणं माहे ! हुषार, तरतरीत, कुलवान्, नी रुपानं सुरेख असला म्हणजे झालं. असलं. पोरीच्या नशीबीं तर वेळीं त्याच घरीं हत्ती झुलायला लागतील.

फराळ करायचें विसरून पानांवर बसून किशोरी आईकडे एकसारखीं लक्ष-पूर्वक न्याहाळून पहात होती. जणुं आईच्या अगदीं पोटांत शिरून ती तिचें बोलणें समजून घेत असावी.

"आई परवां ताईनं केलेलीं बिस्किटं मास्तरांना फार आवडली. आणखी देऊं का ग त्यांना नेऊन ? मधुकरानें विचारिलें. राधाबाईनीं ' होय ' म्हणायच्या आधींच किशोरीनें आलमारींतला डबा काढून मधुपुढें ठेविला.

" ताईसाहेबांना आपल्या बिस्किटांचा बराच अभिमान आहे हो ! " यम्नाबाईनीं किशोरीला खूष करण्यारितां म्हटलें. मधुकरानें सगळाच डबा काखेंत मारून हंसत खिदळत तो वर पळाला. किशोरीही त्याचे मागोमाग हलक्या पावलांनीं वर गेली.

: १४ :

अलीकडे प्रभाकर गांवांत वृंदावनाकडे कधीं कधीं जात असे. एरवी गप्पा गोष्टी पुष्कळ चालत. कांहीं वाचनांतला विषय चर्चेला निघे. पण याचें मन स्वस्थ नसावें असा संशय वृंदावनांना येई. ते आपण होऊन पूर्वेतिहासाचा उल्लेख अजिबात टाळीत. प्रभाकरासही आपण होऊन काय बोलावें हें सुचत नसल्यामुळें म्हणा किंवा दुसऱ्या कशामुळें म्हणा त्या जुन्या वृत्तांताचा उल्लेख करवत नसे. पण दोघेही आपल्या भेटींत जो विषय मुद्दाम टाळीत तोच विषय एकमेकांस पहातांच उभयतांचे मनांत येऊन तो छपविण्याचा परस्परांचा प्रयत्न परस्परांस उघड दिसे. पण उभयतांचाही जिव्हाळा ज्यांत गुंतलेला, असे विचार–विकार एकमेकांपासून छपून लपून किती दिवस रहाणार ? एक दिवस उभयतांच्या प्रगट गोप्यास अचानक वाचा फुटली.

एके दिवशीं प्रभाकर त्यांचेकडे गेला. वृंदावन माडीवर नव्हते. त्यांच्या वाचनाच्या खोलींत प्रभाकर गेला. टेबलावर एका बाजूस एक वर्तमानपत्रांचा व दुसऱ्या बाजूस एक पत्रव्यवहाराचा ढिगारा पडला होता. प्रभाकरानें वर्तमानपत्रें चाळलीं. सहज पत्रव्यवहाराकडे त्याचें लक्ष गेलें. तो वृंदावनांच्या विश्वासांतील असल्यामुळें संपादकाचा पत्रव्यवहार पहाण्यास त्यास संकोच वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें. त्यानें पत्रव्यवहार चाळण्यास सुरवात केली. एका पत्रावर वरचे बाजूस अगदीं ठळकपणें 'अहिल्यापुरी' अशीं अक्षरें त्यास दिसलीं, झटकन त्यानें तें पत्र काढलें व समग्र वाचलें. पत्र असें होतें–

**अहिल्यापुरी** ता. x-x-x

" संपादक ' प्रताप ' यांस—वि. वि.

महाशय, सहीचा हस्तलेख गुंतविण्यास भीति वाटते. तेव्हां सही करणार नाहीं. पण ' सही न केलेल्या पत्रांचा विचार केला जाणार नाहीं ' असा संपादक सरकारी शेरा मारून पत्रास कचऱ्याची पेटी दाखवाल तर आपलें कर्तव्य करण्याचें लंगड्या सबबीवर टाळलेंत असें मी समजेन. सहीचा हस्तलेख गुंतवून घरादारावर गाढवाचे नांगर फिरविले जाण्याचा संभव उत्पन्न करण्यास आम्हांस धैर्य नाहीं असें आपण खुशाल समजा. खालसातीच्या मुखशय्येवर पडून आमच्या अंगांत रुतणाऱ्या सराट्यांची बोच आपणांस कशी कळणार ? तरी पण खालसांतील वर्तमानपत्राखेरीज गाऱ्हाणें मांडण्यास दुसरी जागाच नाहीं तेव्हां आपणांपुढें गातों. आम्हां संस्थानी प्रजेची दया आल्यास आमची कांहीं दाद लावा.

अधिराज वसुदेव मरून बलदेव अधिराज झाला हें आपणांस कळलेंच असेल. अधिकार देतांना रेसिडेंटानें ' राज्यकारभारांत शिस्त ठेवून प्रेमानें व न्यायानें प्रजापालन कराल तर राज्यास धोका रहाणार नाहीं ' अशी धाकगर्भ सूचना बलदेवास दिली होती. पण तिचा कांहींच उपयोग न होऊन राज्यपद मिळाल्यापासून बलदेव अतिच उन्मत्त झाला आहे. रत्नाकरांची सर्व इस्टेट जप्त करून त्यानें त्यांचा खानदानीचा वाडा खणून काढला. त्याच जागीं आतां राजरखेल्यांची चाळ बांधण्याचें काम सुरू आहे. राजानें विवाह करण्याकरितां पुष्कळ खटपट केली पण कोणीही त्यास मुलगी देण्यास धजावत नाहीं, यामुळें तो फार चिडला आहे. याचें राज्य संकटांत आहे यास मुलगी देऊं नये अशी सर्व संस्थानिकांत व लोकांत हूल उठली असून ' कशी नाहीं मुलगी मिळत पहातों ' असा त्यानेंही उलट विडा उचलला आहे. कुलीन स्त्रियांना घराबाहेर पडण्याचीही चोरी झाली आहे. प्रभाकर गेला त्याचा कांहींच पत्ता नाहीं. कोणी म्हणतात त्यास तुरुंगांतच ठार मारलें. येथल्या या अंदाधुंद कारभारात कांहींच असंभाव्य नाहीं. खरें काय असेल देव जाणे ! प्रभाकराची लोक भारी आठवण काढतात. रत्नाकराच्या गल्लीकडे जाववतसुद्धां नाहीं इतकी सर्वांस हळहळ वाटते.

आपणासारख्यांनीं या संकटास कांहीं इलाज केला तरच कांहीं आशा आहे. कांहीं लोक संस्थान सोडून जावें असें सुचवितात. पण पिढ्यान् पिढ्यांच्या इस्टेटी सोडून जायचें कोठें ? कांहीं विचार व्हावा. सर्व नागरिक संकटांत आहों कळावें हे वि.

'अहिल्यापुरी' हीं अक्षरें वाचतांच प्रभाकराचे चित्तांत खळबळ उडाली होती. हें पत्र वांचूच नये असें त्यास एकदां वाटलें, पण निग्रहाचें एवढें धैर्य त्याजपाशीं नव्हतें. पत्र दिसतांच एकदम उचलून त्यानें सर्व वाचून काढले. वाचतां वाचतां तो लाल झाला, त्याच्या सर्व शरीरास घाम फुटला. स्वतःच्या वाड्याची ती शोचनीय हकीकत व शेवटीं स्वतांचा प्रेमळ उल्लेख यामुळें संताप, उद्वेग इत्यदि विकारांनीं आतिशय्य क्षुब्ध झाला. त्याच्या हातून तो कागद गळून पडला, त्याला उभें राहावेना व जवळच्या खुर्चीवर मटकन खालीं बसून त्यानें पुढील मेजावर डोकें टेकलें आणि हातांनीं तोंड झाकून तो लहान मुलासारखा ओक्साबोक्शीं रडूं लागला. अमळशानें वृंदावन घरांतून माडीवर येऊन खोलींत आले. त्यांनीं प्रभाकराची ती अवस्था व त्याचे पायाशीं पडलेलें तें पत्र पाहिलें. क्षणार्धात सर्व गोष्टींचा त्यांना उलगडा झाला. त्यांना अतिशय वाईट वाटलें. दुःखाचा एक सुस्कारा टाकून ते प्रभाकराजवळच दुसऱ्या खुर्चीवर बसले आणि त्याच्या खांद्यावर हात ठेवून त्यांनीं 'प्रभा' म्हणून प्रभाकरास हांक मारली. प्रभाकरानें जडपणें डोकें वर केलें. त्याचे डोळे सुजून उतू आल्यासारखे दिसत होतें त्यानें हताश व केविलवाण्या मुद्रेनें वृंदावनाकडे पाहिलें. त्याला कांहीं तरी बोलायचें असावें पण तो विचारमूढच झाला होता. वृंदावनांनींच बोलण्यास सुरवात केली.

वृं.—तुला हें पत्र दाखवायचं माझ्या मनांत नव्हतं.

प्र.— कां ? त्या पत्रानं माझ्यावर महदुपकार केले असंच मला वाटतं.

वृं.—तें कसं काय ?

प्र.—मी माझं कर्तव्य विसरलों होतों असं मला वाटलं. या पत्रानं मला पुन्हां सावध करून आठवण दिली.

वृं.—कोणतं कर्तव्य विसरला होतास आणि आतां करूं चाहतोस ?

प्र.—माझे ग्रामबंधु याझी प्रेमानं आठवण काढतात आणि मी मात्र अन्यायाचा सूड न उगवितां षंढासारखा स्वस्थ बसलों आहे. अगदीं प्राण कंठीं आले असतां दादांनीं डोळ्यांत आसवं आणून मला हाक मारली. मी 'सूड घेईन' असं त्यांस आश्वासन दिलं तेव्हां त्यांनीं प्राण सोडला. मी बोलल्याप्रमाणं कृतीही केली, पण तेव्हां ती सफल नाहीं, व आतां तो नाद सोडून दिलल्यासारखाच मी स्वस्थ बसलों आहे.

वृं.—मग काय ? तेवढं काम एकदां करून टाकावं म्हणतोस ?

प्र.—काय ! तुम्हीं सुद्धां तोच सल्ला देतां. मला वाटतं मी तुमच्याच शब्दां-करितां थांबलों होतों.

वृं.—नाहीं. सल्ला नाहीं देत. तुझं म्हणणं एकंदरींत काय आहे तें समजून घेतों. बरं, परिणाम काय होईल तो तुला दिसतो का ?

प्र.—हो ! मला फांशी जाऊन मरावं लागेल. कदाचित आधीं जिवंतपणीं हाल हाल होतील. माझी एक वेळ हें सर्व सोसण्याची तयारी होती. व पुनः ठरल्यास माझं मन तयार होईल असा माझा विश्वास आहे.

वृं.—बाकी तूं मरणाला भिणार नाहींस हें तूं सिद्ध करून दाखविलं आहेस. मी ती शंका घेऊंच नये. माझं तुला विचारणं आतां असं कीं, हा विचार तूं कधीं व का सोडला होतास ?

प्र.—कधीं सोडला हें नक्की माहीत नाहीं. मुद्दाम सोडला असेल असंही आठवत नाहीं.

वृं.—बरं, सध्यां तूं जें आयुष्य घालवीत आहेस याला कांहीं ध्येय ठरविलं असल्याचं तुला आठवतं कां ?

प्र.—नाहीं, निश्चित कांहींच नाहीं.

प्र.—बरं, सरळच विचारतों. माझं बोलणं कदाचित न पटावं असा दुर्दैवानं आज प्रसंग आहे. पण मला त्यालाही तोंड दिलं पाहिजे. मला सांग, माझ्यावर निष्ठा ठेवून आयुष्य कंठायचं ठरवुन तूं तुरुंगांतून निसटायचं धाडस केलंस हें खरं का ?

प्र.—होय, हें खरं आहे.

वृं.—ठीक, निव्वळ तात्त्विक चर्चेनं तुझ्या उद्दीपित भावनांना मी चिडवूं इच्छितों असं नव्हें. तूंच थोडा वेळ माझ्याकरितां आपला मनःक्षोभ आवरून माझ्याशीं बोल. मग त्यानंतर योग्य वाटेल तो रस्ता तुला मोकळा आहे. तुज-बद्दल व या अभागी राष्ट्राबद्दल वाटणाऱ्या प्रेमामुळें चार गोष्टी आज मी तुला सांगणार आहे. पटतील तर पहा. तूं जी माझ्यावर निष्ठा ठेवण्याचं ठर-विलंस तें मी तुला सुडास प्रवृत्त करीन असें वाटलं म्हणून का ?

प्र.—तसंच नसेल. तुरुंगांत तुमचं पत्र येतांच मला जो आनंद झाला त्यांत मी सुडाची कल्पना कांहींशीं मागं टाकली होती असं मला वाटतं.

वृं.—बरं आतां तरी माझ्यावर विश्वास टाकल्याबद्दल पश्चात्ताप होतो का ?

प्र.—नाहीं नाहीं ? अजूनही सुडास प्रवृत्त होण्यापूर्वी तुमची संमती मी घ्यावी असं मला वाटतं.

वृं.—पण मघां तुला शोक झाला हें खरं ना ?

प्र. हो !

वृं.—आणि तो आपण सूड घेण्याचं टाकून दौर्बल्यानं स्वस्थ बसलों असं वाटून झाला, होयना ?

प्र.—हो !

वृं.—उगीच प्रश्न विचारून मला तुझा छळ करायचा नाहीं. आपल्या भावनेंत व विचारांत दोष असतात यामुळें बहुधा जगांतील सारे अनर्थ ओढवतात म्हणून तुला नीट विचाराच्या रस्त्यावर मला आणायचं आहे. आतां मला पुन्हां सांग कीं माझ्यावर निष्ठा ठेवून तूं सूड न घेतां स्वस्थ र हि-लास हें खरं कीं सूडाची कल्पना बाजूस ठेऊन दौर्बल्यानं स्वस्थ राहिलास हें खरं ?

प्र.—पहिल्यानं तुम्हावर निष्ठा हें एकच कारण होतं, पण दौर्बल्यानं आतांशा मला ग्रासलं आहे असं पाहून वाईट वाटतं.

वृं.—ठीक आहे. मी तुला सांगतों कीं तूं दौर्बल्याला भिऊं नको. सन्मनो-विकार व असन्मनोविकार इतके एकमेकास निगडित असतात एकाच्या प्रेर-णेनं एखादी गोष्ट करीत किंवा न करण्याकरितां संयम करीत असतां तदनुकूल दुसऱ्याची प्रेरणा पहिल्याच्या मदतीस येतेच. दयाबुद्धीनं परोपकार करूं इच्छि-

णारा मनुष्य ऐन वेळीं कीर्तिलोलुप होतो. उलट चोराला सुद्धां नीतिदृष्ट्या आपल्या चोरीचं मनाशीं समर्थन करतां येईल तरें हवं असतं. शठ लोकांचा जगास शठ ठरविण्याचा नेहमीं प्रयत्न चालला असतो. माझं म्हणणं असं कीं आपण कोणतंही कार्य करतों किंवा करण्याचं टाळतों तेव्हां आपल्या मनाशीं सद्विचाराची प्रेरणा आहे कीं नाहीं हें निर्विकार मनानं प्रथम पाहावं–खात्री करून घ्यावी. सद्विचार आहे अशी खात्री झाल्यावर तदनुकूल असद्विचार नाहींसे करण्याचा प्रयत्न कोणत्याही साधनांनीं शक्य तर करावा, पण त्या-करितां सद्विचाराशींच द्रोह करणं योग्य नाहीं. असद्विचार मदतीस आला म्हणून सद्विचाराचं सत्—त्व कां नाहींसं होईल? माझ्यावर निष्ठा ठेवून तूं सूड घ्यायचा थांबला आहेस तसा दौर्बल्यामुळंही थांबला आहेस असं तुला वाटत असलं आणि तें दौर्बल्य घालविण्याकरितां मजवरील निष्ठा काढून घेऊन सुडास प्रवृत्त होणं हा एकच मार्ग यद्यपि उरला असला तरी तो स्वीकारूं नको असं मी तुला सांगतों.

प्र.—म्हणजे? मी सूड घेऊं नको तर?

वृं.—हो! नकोच! हेंच मला अखेरपर्यंत तुला सांगायचं आहे.

आंतूनअंतःकरणास प्रतिक्षण जाळणाऱ्या उद्वेग संताप या तीव्र भावना व बाहेर पूज्य वृंदावनांचें गंभीर, शांत, विचारमय पण अत्यंत प्रतिकूल व निष्ठूर भाषण यांच्या द्वंद्वांत प्रभाकरच्या मनाची चमत्कारिक अवस्था झाली. मनास वाट-णारा दुबळेपणा त्यास विषदिग्ध शल्यासारखा दुःख देत होता. आणि हें दुःख शमविण्याकरितां तो माणूस क्रूर कर्मास उद्युक्त करीत होता. पण वृंदावनाबद्दल वाटणारी भक्तिच त्याच्या दुर्बलतेस मदत करूं लागली असें त्यांस भासलें. तो चिडला, हताश झाला. व शेवटीं डोळ्यास रुमाल लावून रडूंही लागला. वृंदा-वनांना तो देखावा दुःसह वाटला. केवळ कर्तव्यभावनेनें निष्ठुर झालेल्या त्या पुण्य पुरुषाचें अंतःकरण द्रवलें. त्यांच्याही डोळ्यांत अश्रु आले. पण प्रभाकराचें म्हणणें कबूल करणें ही गोष्टही त्यास चुकीची, राष्ट्रघातकी व प्रभाकरावर निरर्थक येणाऱ्या अघोर प्रसंगाच्या कल्पनेनें अत्यंत दुःखदायक वाटत होती. तेव्हां या वेळीं निष्ठुर राहणेंच त्यास योग्य वाटलें व आपला शोकावेग आवरून ते शांतपणें प्रभाकराकडे पहात बसले. थोड्या वेळानें प्रभाकर पुन्हां बोलूं लागला.

**प्र.**—वृंदावन, माझ्या तुम्हावरील निष्ठेचा अंत पाहूं नका. मजवर झालेले अन्याय इतकें भयंकर आहेत कीं त्यानंतर कित्येक दिवस संतापानं मी नुसता वेडा झालों होतों. आणि अजूनही तें माझं वेड गेलं नाहीं असं मला वाटतं. मला जें करावंसं वाटतं तें करतांना तुम्हावरील निष्ठेचं मला आश्वासन हवं आहे. पण ती निष्ठा मला माझ्या कार्यांत जर मोडा घालणार असली तर तिचं बंधन तोडून टाकून माझं मन पार बाहेर पडेल, आणि तुफान सागरांत नावाड्या शिवाय नौकेची दशा व्हावी तसा मी या जगांत मनानं वाताहत होईन. दौर्बल्याचा वैताग येऊन त्याचा नाश करण्याकरितां मी तुमच्यावरील निष्ठेचा भंग करीन, पण त्यामुळंही मला जन्मभर पश्चातापांत होरपळावं लागेल. तुम्हावरील माझ्या निष्ठेवर माझं खरं खरं प्रेम आहे. ती मला खरोखर हवी आहे. पण काय करूं? या दौर्बल्याचा तिटकारा त्याहूनी अधिक वाटतो.

प्रभाकराचा स्वर सारखा चढत होता. त्याचे अंतःकरणापासून निघणारे उद्गार वृंदावनांच्या काळजाचें पाणी करीत होते. पण त्यांनीं आपले गांभीर्य रेसभरही कमी होऊं दिलें नाही. ते बोलूं लागले.

**वृं.**—बरं, तूं जें करूं इच्छितोस, त्यानं तुझ्या बुद्धिचं समाधान व्हावं अशी तुझी इच्छा आहे का?

**प्र.**—म्हणजे?

**वृं.**—सूड घेणं हें तुला जें कर्तव्य वाटतं तें काय म्हणून?

**प्र.**—माझ्या सर्व कुटुंबाचा जो भयंकर उपमर्द झाला तो सहन करून स्वस्थ बसणं हें मनुष्यास शोभणारं नाहीं. शिवाय दुष्टास दुष्ट कर्माचं शासन न मिळालं तर जगांत दुष्टावाच यशस्वी ठरेल.

**वृं.**—ठीक आहे. निवळ सुडाची बुद्धि व ही बुद्धि यांत तुलाच फरक वाटतो का?

**प्र.**—होय. पहिलींत नुसती विकारवशता आहे. दुसरींत सुविचार आहे.

**वृं.**—मग सुडाचा मुद्दा मी सध्यां सोडून देतों. शिक्षा किंवा शासन यापासून दुष्टाची सुधारणा व्हावी, निदान घडलेला दुष्टपणा पुन्हा कोणाकडून होईल त्यास आळा बसावा असा त्यांत उद्देश असला पाहिजे. पण मी तुला सांगतों कीं ज्या एका विशिष्ट परिस्थितीमुळं हे भयंकर अन्याय घडले ती परि-

स्थितिच मारून टाकणं तुझा हातीं नाहीं.

**प्र.**—तें कसें ?

**वृं.**—असं पहा, समज अपराध्यास तू देहांत शासन दिलंस तरी काय ? ब्रिटिश सरकारास संस्थान जगावयाचं असलं तर ते राजवंशाचा कोणीही नादान नातलग या राज्यावर बसवितील. तूंही नाहींसा होशील. आणखी मग पुढें प्रजेवर सूडबुद्धिनं जे अनन्वित अत्याचार होतील त्यांना अंतच नाहीं. त्यानं लोक मात्र अधिक दीन, दुबळे, हताश व निर्माल्यावत होऊन जातील.

**प्र.**--छे! छे! मला वाटतं ही संधि साधून ब्रिटिश सरकार संस्थान खालसा करील मग तिथें येथल्यासारखी सुयंत्र व्यवस्था सुरू होऊन लोक सुखी होतील तुम्ही तुमच्या सरकारविरुद्ध कितीही ओरड करतां तरी तुम्हाला भाषणस्वातंत्र्य असतं. सरकारही फिर्याद चालते. उठतां कायदा, उठतां कायता, कायद्याशिवाय पान हालत नाहीं. तुम्ही ज्या कायद्यांविरुद्ध नेहमीं तक्रार करीत असतां ते आम्ही संस्थानांत मुकाट्यानं सोसतों त्यांच्या शंभरांशही नसतील.

**वृं**—वा! खालसा सरकारची ही प्रशंसा ऐकून मला हसूं येत. पण अशीं तुझ्यासारखीं मतं बाहेर बोलून न दाखविणाऱ्या येथीलही पुष्कळ विद्वानांचीं असल्यामुळें मला तुझंच असं कांहीं आश्चर्य वाटत नाहीं. प्रभा हिंदुस्थानांतल्याच संस्थानाची आणि हिंदुस्थानांतल्याच खालसाची तुलना न करतां राष्ट्र या नात्यानं जगांतील इतर स्वतंत्र देशाशीं सगळ्या हिंदुस्थानची तुलना कर. देशांतलं सर्व कलाकौशल्य धुळीला मिळालं आणि हिंदुस्थान विदेशी मालाची बाजारपेठ होऊन बसला आहे. त्या मार्गे क्रोडो रुपयांची आवश्यक संपत्ति परके लोक धुवून नेतात. सारं जग आमच्या जिवावर संपन्न होत असतां दिवसानुदिवस आमची उपासमार होत असून आम्ही, दीन, दुर्बल बनत चाललों आहों. इंग्रजांना अन्न हवं, त्याकरितां हिंदुस्थानचें साम्राज्य हवं, म्हणून त्यांनीं हिंदुस्थानचं रक्षण करावं आणि म्हणून बायकासारखं आम्हां सर्व हिंदी पुरुषांना परक्याकडून रक्षून घ्यावं लागत आहे. कर्तृत्व, पराक्रम, संपत्तिमत्ता, यांचीं सर्व क्षेत्रं परक्यांनीं व्यपलीं असून या सर्व क्षेत्रांत आमच्या देशांत आम्ही निव्वळ हमाल झालों आहों. महत्वाकांक्षेस क्षेत्र नाहीं म्हणून तो अंकुर जळून जाऊन आपसांतील मत्सर, कलह, दुष्टपणा आणि हलकटपणा यांच्या विषारी वेली

या देशभर पसरल्या आहेत. न्याय व शांतता मिळाली खरी, पण पौरुष सद्गुण राहण्याची, वाढण्याची काय तजवीज आहे ? प्रभा वाघ जो असेल त्याला पिंजऱ्यांत सुरक्षित राहून मासाचा घांस नित्य नेमानं मिळण्यापेक्षां, जीव संकटांत घालूनही केव्हांतरी एखादं सावज मिळेल तेवढं मिळवून करवंदाच्या जाळींत अर्धपोटीही पण स्वातंत्र्यांत पडून राहणं आवडतं. आणि ही वृत्ति निव्वळ वेडी भावना नसून यांत सुविचार आहे. पारतंत्र्यांत आत्म्याचा अधःपात होतो. स्वातंत्र्य आत्म्याचं जीवन आहे. हल्लींच्या सुव्यस्थित गुलामगिरीपेक्षां मला मोंगलाई पुरवली. तेव्हां सरकारच्या मूर्खपणानं कां म्हणेनास पण प्रजेस सरकारपासून आपलं संरक्षण करण्याचाची तरी कुवत राहिली होती. तेव्हांचा जुलूम उघड उघड असून लोकांत चेव उत्पन्न करणें तरी शक्य होतं. आजच्या राज्यानं लोकांना सुखलोलुप करून नामर्द व कंगाल करून सोडलं आहे. प्रेमाच्या ढोंगानं गळयांत हात घालून ह्या कुलटा राजनीतीनं आमचं घर लुटलं तरी आम्ही तिला धर्मपत्नीप्रमाणं कवटाळतों आहों. आमच्या मूर्खपणास उपमाच नाहीं.

**प्र.**—पण वृंदावन, येथले सर्व अन्याय तर आमच्या तिथें होतातच, पण तिथं कोणाचं जीवित किंवा संपत्तिही सुरक्षित नाहीं. अब्रूदार बायकांचीं अब्रूही धोक्यांत आली आहे. या मानानं तुमचे अन्याय कांहींच नव्हत.

**वृं**—खोटं आहे. इंग्रजी अधिकारी यापुढं आमच्या घरादारावर जर सरळ दरोडे घालतील तर हल्लींच्याहून कांहीं अधिक अन्याय करतीलअसं मला प्रामांणिकपणें वाटत नाहीं. आणि राष्ट्राचं स्वातंत्र्य गमावूनही रक्षावी इतकी कांहीं बायकांची अब्रू पवित्र नव्हे. अरे, पारतंत्र्यांत स्त्रियांची अब्रू राहते हेंच मुळीं चूक आहे. परकीय अमलामुळं आपणांस नको असे पालट समाजव्यवस्थेंत होत असतात, व साऱ्याच समाजाचा नीतिदृष्टया विध्वंस होत असतो. मुंबईस जाऊन मजुरांच्या राहणीकडे पाहशील तर हें तुला सहज पटेल. तुझ्या मुलखांत याहून फारसा अधिक अन्याय असेल असं नाहीं-

**प्र.**—जरा मोकळेपणें बोलतों. सुव्यवस्थेंत, सुखागरांत राहून हे मार्मिक युक्तिवाद तुम्हांला सुचतात. माझ्या ठिकाणीं तुम्ही असतां तर आमच्याकडील राज्यपद्धतीवर दिवसां दुपारीं निखारे ठेवून तुम्ही खालसांत निर्माण केली

असती, तेव्हां तुम्हांला हायसं वाटलं असतं.

वृं.—तुझ्या अवस्थेंत मी नसल्यानं सत्य काय आहे हें पहाण्यास माझं मन समर्थ आहे इतकंच तुझं म्हणणं असेल तर तें खरं आहे. पण मी म्हणतो तें सत्य आहे एवढंच मला तुला सांगायचं आहे. आणखी तुझी दृष्टि घेऊनही मी सांगतो कीं संस्थानांतील सर्व अन्यायास पर्यायानं ब्रिटिश अंमलच जबाबदार ठरतो. हातीं सत्ता असून जबाबदारी मात्र कांहींच नसली तर उन्मत्त होणं हा मनुष्यस्वभावच आहे. इंग्रजांनीं संस्थानांच्या संरक्षणाची जबाबदारी पत्करली, पण त्यांनीं संस्थानिकांनीं राज्य कसं चालवावं याविषयीं कांहीच बंधनं घातलीं नाहींत. संस्थानिकांनीं इंग्रजांविरुद्ध जरा कांहीं खटपट केली कीं ब्रिटिश समशेर मेणांतून खसकन् बाहेर निघते, पण संस्थानी प्रजेच्या माना संस्थानिकांनीं अंधारांत बसून चराचर चिरल्या तरी ब्रिटिशांच्या निद्राभंग होत नाहीं. संस्थानी प्रजेनं कोठें तक्रार करण्यास जागा नाहीं व प्रत्यक्ष प्रतिकार करावा तर संस्थानिकांचे रक्षणार्थ कर्तव्यनिष्ठ (!) इंग्रजांचा जागता पहारा! तहाअन्वयें संस्थानांच्या कारभारांत हात घालतां येत नाहीं हें ब्रिटिश सरकारचं निवळ ढोंग आहे. आपल्या गरजेस्तव आडव्या हातानं संस्थानिकास ब्रिटिश अधिकारी किती पिळून काढतात हें खुद्द संस्थानिकांना विचारून पहावं. संस्थानिकांनीं राज्यव्यवस्था सुधरावी याकरितां खालसा नोकरशाही आपलं वजन खर्च करील तर सर्व हिंदी प्रजा त्यास दुवाच देईल. पण ब्रिटिशांना तें करायचंच नाहीं. मनुष्य तुलनेनं जगत असतो हें इंग्रज सरकार चांगलं जाणतं. ब्रिटिश प्रजेनं संस्थानी प्रजेवरील जुलुमांकडे पाहून ब्रिटिश अमलावर खुष राहावं; व संस्थानी प्रजेनं संस्थानापेक्षा ब्रिटिश अंमल स्पृहणीय मानावा आणि एकंदरीनं सर्व हिंदी लोकांनीं ब्रिटिश अमलावर संतुष्ट राहावं असा हा डाव आहे.

प्र.—पण अखेर मजवर झालेल्या अन्यायाचा मी सूड घेऊं नको तर तर काय करूं?

वृं.—सध्यां आधीं सुडाचा विचार सोडून दे. तूं म्हणतोस तसा प्रतिकार केल्यानं उपयोग न होतां अनर्थ होईल. एकंदर प्रजेचे हाल अधिकच वाढून प्रजा निस्त्राण होईल.

प्र.—पण यानं मीच माझ्या स्वाभिमानाचा केवढा उपमर्द करीन याची तुम्हास कल्पना आहे का ?

वृं.—होय, कां नसेल ? पण त्यास इलाज नाहीं. सूड न घेतां आहे याच अज्ञातवासांत तुला कदाचित् आणखी कांहीं वर्षंही खितपत पडावं लागेल. दुर्बलतेचा जाचही सोसावा लागेल. पण धर्मराजानं भीमसेनादिकांस धैर्यानं व आत्मविश्वासानं जें सांगितलं तें तसं तुला सांगण्यास मी माझं धैर्य व आत्मविश्वास एकवट करीत आहे.

प्र.—पण शेवटीं रक्तपातास धर्मानं परवानगी दिलीच—

वृं.—तशी मात्र मी देणार नाहीं हें खरं आहे. म. गांधीप्रमाणं एकान्त-अहिंसावादी मी नाहीं, तरी पण सशस्त्र प्रतिकाराची कोणत्याही तऱ्हेची तयारी मला आज संस्थानांत किंवा खालसांत अशक्य दिसते. हातीं हत्यार असलं म्हणजे आपोआप सामर्थ्य येतं खरं; पण शस्त्र हातीं येणं व सामर्थ्य निर्माण होणं यांच्या दरम्यान पुष्कळ काळ व क्रिया असतात. येथें आमच्या हातीं शस्त्र पहातांच इंग्रज झडप घालणार तर जरूर तो अंतरकाल आपणांस कसा मिळावा ? याकरितां शस्त्राखेरीज अन्यमार्गांनीं हें सामार्थ्य लोकांत निर्माण केलं पाहिजे. एखादं मत तात्त्विक दृष्टया खरं ठरल्यानंतर परकीयांस त्याची किंमत पटविण्यास मतवादी किती स्वार्थत्याग करतो व प्रतिकार किती परिणामकारक करतो यावर त्या मतांचं यशापयश अवलंबून असतं—

प्र.—पण ब्रिटिश अमलांत शारीरिक व मानसिक सुख खरोखर इतकं पुष्कळ आहे कीं, तें धोक्यांत घालून कोणीही प्रतिकारार्थ स्वार्थत्याग करण्यास तयार होणार नाहीं. या अमलांत लोकांचं दारिद्र्य वाढून लोक अन्न अन्न करूं लागतील तेव्हांच त्यांचे डोळे उघडतील. माझंच पहा. कित्येक दिवस वीरासन बांधून मृत्यूस आव्हान करीत सूडाच्या भावनेनं नखशिखांत पेटलेला मी डॉक्टरांचे घरीं येऊन सुखांत पडल्यावर माझा वैरवन्हि पार विझून चालला आहे, माझं सूडाचं ध्यान मोडलं व पुस्तकालयांतील पुस्तक वाचणारा बायकी वाङ्मयसेवक मी बनून गेलों आहे. कोण विसंगति ही ! माझा मजवर विश्वास बसेनासा झाला आहे.

वृं.—तूं असा स्वतांबद्दल वारंवार शोक करूं नको. तुझ्या वृत्तीस मी खचित अवसर देईन. पण हातांत शस्त्र घेऊन शत्रूचा माना चिरणं एव ढंच वीरवृत्तीचं क्षेत्र आहे असं समजूं नको. संतापाच्या उसळणाऱ्या वृत्तीस आळा घालून शांतपणें व धैर्यानं लोकमतांत जोर उत्पन्न करण्याचे मार्ग शोधावे, त्यांचा अवलंब करावा, निराशेचे पर्वत अंगावर कोसळून पडले तरी धैर्यभंग न होऊं देतां यत्नवादीच राहावं, यांतही शौर्य आहे. क्षणार्धांत भडका उडून देदीप्यमान दिसणाऱ्या वीरत्वाइतकंच, प्रतिक्षण अपयशानं पिचत असतां व कर्तव्यमूढ होत असतांही धीर, आशा, विचार व यत्न न सोडणारं वीरत्वही श्रेष्ठ आहे व हिंदी तरुणांत तरी आज तेंच अभिप्रेत आहे. मी म्हणतों या प्रकारें वीर होऊन देशोद्धार करण्यास तयार हो. बुद्धिवान, कर्तबगार, स्वार्थत्यागी, ध्येयवादी व यत्नकारी असा एक मनुष्य लक्ष लोकांस भारी होतो, लक्ष लोकांस प्रिय होतो, लक्षांचा नेता होतो आणि लक्षांत कर्तृत्व निर्माण करतो. ईश्वरानं मला तुजसारखा पाठीराखा वीर बंधू देऊन माझं राष्ट्रकार्य यशस्वी करण्याचं ठरविलेलं दिसतं. मी जर अनन्य भावानं ईश्वराचं चिंतन करीत कर्तव्यरत असतों तर प्रभु माझा योगक्षेम का चालविणार नाहीं ? असो.

लोक कंगाल होतील तेव्हांच स्वार्थत्यागास तयार होतील हें तुझं म्हणणं खरं नाहीं. कंगाल लोक लोभी किंवा अनीतिमान होऊन जीव संकटांत घालून दरोडे घालतात. त्या स्वार्थत्यागानं राष्ट्रोद्धार होणार नाहीं. शिवाय कंगाल झाले तरी लोक प्रतिकार करतीलच असं नाहीं. जगाच्या आरंभापासून आपण ज्यांना अस्पृश्य मानीत आलो, ते लोक कंगाल नाहींतर काय आहेत ? पण तीच अवस्था आपणांस योग्य असं स्पष्ट तत्त्वज्ञान, अस्पष्ट भावना त्यांच्यांत वावरत असल्यामुळं त्यांना कधीं उचल करावीसं वाटलंच नाहीं. पूर्वी साधुसंतांनीं व आतां इंग्रजी अमलांत त्यांच्यांत स्वस्थितीबद्दल तिरस्कार व उच्च आकांक्षा उत्पन्न झाल्यानं तेच लोक आज डोकीं वर काढूं लागले आहेत. माझं म्हणणं असं कीं, आज लोक स्वस्थ व सुखरत दिसतात याचं कारण तात्कालिक व्यवहाराच्या नफातोट्यांत त्यांची दृष्टि गुंतली आहे व अधिक गुंतवली आहे. उच्च आकांक्षा व तेजस्वी तत्त्वज्ञान त्यांचेपुढें जोरानं व कळ-

कधींनं मांडलं जात नाहीं. सत्कार्यनिष्ठेची अभिरुचि उत्पन्न करण्याचे प्रयत्न शरम वाटण्याइतके अपुरे होत आहेत. मला वाटतं तेजस्वी तत्त्वज्ञानाचा प्रसार होईल तर आजही वीर निर्माण होऊं लागतील. उद्यां काय होईल हें आज नक्की काय सांगावं? मी मात्र एवढंच एक कार्य, त्यापायीं सर्वस्वही अर्पून, करायचं ठरविलं आहे. माझ्यासारखे कितीतरी याकार्यीं खपून जातील. माझा सहकारी होण्यास ईश्वर तुला बुद्धि देवो. तूं मूर्तिमंत 'प्रभाकर' आहेस. तुला उदयाचलीच लागलेलं हें ग्रहण लवकर सुटेल आणि नंतर आपल्या या अभागी राष्ट्रांतील जीवांना आपल्या प्रकाशानं मार्गदर्शक हो, तुझा गजानन तुला सद्बुद्धि देईलच.

प्रभाकराचें अंतःकरण वृंदावनांचे ठिकाणीं क्षणमात्र तल्लीन झालें. त्यांचा उदात्त उपदेश तो भक्तिभावानें ऐकत होता. तरीपण त्याचा कांहीं निश्चय झालेला वृंदावनांना दिसला नाहीं. कांहींच न बोलतां क्षुब्ध मनानें तो वृंदावनांचा निरोप घेण्यास उठला. तेव्हां वृंदावनांचें अंतःकरण शोकावेगानें भरून आलें. यास कसें सुखवावें, यास काय सांगावें हें त्यास सुचेना. आपल्या शब्दासरशीं प्राणार्पण करण्यास तयार असणाऱ्या या धीरोदात्त तरुणास त्याच्या या भयंकर मनःस्थितींत आपण कांहींही मदत करूं शकत नाहीं याचा त्यांना फार खेद झाला. पण वस्तुस्थिति अनिवार होती. "सध्यां तूं जा! सृष्टीच्या भवितव्यतेवर ईश्वरी सत्तेचा ताबा असतो. न्याय व सत्य यांची जबाबदारी सर्व त्याजवर आहे. आपल्या सृष्टीचं परमोच्च हित कसं घडवून आणायचं त्यानं ठरविलं असेल तें त्याचं त्याला माहीत. तोच सर्वकर्ता सर्वद्रष्टा आहे. आपण त्याचे सेवक आहों. आपल्या-एक--कष्या दृष्टीस जेवढं सरळ दिसेल तेवढं करीत असावं. यापरतां ज्याचा तो पहातो आहे."

## : १६ :

प्रभाकर वृंदावनांच्या घरांतून निघाला तो थेट बंगल्यावर गेला. वृंदावनांच्या सांगण्याप्रमाणें वागावे तर सूडाच्या भावनेचें काय होणार ? तिच्याशींच लढत राहावें तर तो निखाऱ्याशीं खेळत होता, आणि लढून सुडाच्या भावनेचा पराभव करतां आला तरी काय ? सुखाच्या जाळ्यांत गुरफटून जाऊन आपादशीर्ष सुखाच्या वेढ्यांनीं जखडून जात असतां वाटणारी लज्जा व आत्मतिरस्कार तर अधिकच दाहक होता वैरवन्हीशी झगडावे तर सुखवन्हींत लोळावें लागणार होतें. पण वृंदावनांचें मन मोडून कांहीं तरी सोक्षमोक्ष करून घ्यावा यालाही त्याचें भक्तिमान अंतःकरण धजेना, आणि सुखाचा त्रास तरी नको म्हणून वामनरावाकडे न राहतां इतरत्र कोठें राहण्याचें वृंदावनांना विचारण्यासही त्याचें मन तयार होईना. सुख नको पण सोडवत नाहीं अशी त्याची चमत्कारिक अवस्था झाली. अन्यायाच्या प्रतिकाराची भावना तत्क्षणीं दग्ध होती तरी तो शांत झाला असता. सुखाभिनिवेश तरी जायला हवा होता. निदान वृंदावनांवरील भक्ति सुकून जाती तर मनांत घोळणारें भयंकर कृत्य करून त्यानें आपला मार्ग खचित मोकळा करून घेतला असता. पण मानसिक झगड्यांत कोणत्याही एकाच अवस्थेस शरण जाणें त्यास साधेना. तो क्षणोक्षणीं बेफाम होऊं लागला. वृंदावनांच्या घराहून डॉक्टरांच्या बंगल्यावर जातांना तो स्वप्नांत चालल्याप्रमाणें चालला होता. आपले पाय जमिनीस लागत आहेत याचें त्यास भानच नव्हतें. बंगल्यावर आपल्या खोलींत जाऊन त्यानें बिछान्यावर

अंग टाकलें तेव्हां वृंदावनांच्या घरांतून आपणांस कोणीं अचानक येथें फेंकून दिलें असा त्याफ भास झाला.

'सृष्टीच्या भवितव्यतेवर ईश्वरी सत्तेचा ताबा आहे. ईश्वर, कर्ता, भर्ता, द्रष्टा आहे ' हें वृंदावनांचे अखेरचे शब्द त्याच्या कानांत गुणगुणत होते. त्याला थोडा डोळा लागला. तोंच, दादा, वहीनी, बाबा, आई, बाळ, सर्वजण आपल्याभोंवतीं घिरट्या घालीत आहेत, आपण मध्यें चौरंगावर बसलों असून किशोरी आपणांस सुगंधी पदार्थ लावून स्नान घालीत आहेत, असा देखावा त्यानें पहिला. भोंवतीं हिंडणारांचीं मुखें म्लान असून सर्व एकमेकाकडे व आपणाकडे पहात आहेत असें त्यास दिसलें. त्यास वाटलें कीं वहिनींनीं ' भाऊजी ' म्हणून आपणास हांक मारली. ओलेत्यानें चौरंगावरून उठून वहिनीकडे धावावें असा स्वप्नांत त्यानें निश्चय केला व मिटल्या डोळ्यांना खाटेवरून उठून तो जोरानें धांवला. तों समोरच्या खांबाला तसबिरीचा भली मोठा खिळा होता त्यावर फाडकन् कपाळ आपटून कपाळावर चांगलीच खोक पडली. थोडी भोंवळही आली व तो खालीं वाकला. अमळशानें डोळें उघडून पहातो तों–जिच्या हातावरून रक्ताचे ओघळ सारखे चालले आहेत. जी जवळच्या मधुकरास घाबरून कांहीं सांगत आहे, जी एक हात डोक्यावर व दुसरा हात जखमेवर ठेवून रक्त थांबविण्याचा प्रयत्न करीत आहे. अशी किशोरी त्यास दिसली. इतक्यांत राधाबाईही वर आल्या. गाडीमाणसेंही आली.

" किशोरी तूं दूर हो ! " प्रभाकरानें किशोरीचा हात बाजूस काढीत म्हटलं, " मला कांहीं झालं नाहीं, तुम्ही सर्वजण खालीं जा " मनांतील विकार आणि कपाळावरील जखम व रक्तस्राव यांनीं प्रभाकर भयंकर दिसत होता. एका गड्यानें त्याचें न ऐकतां जखमेस औषध लावून पट्टी बांधली. प्रभाकरानें हात काढतांच किशोरीनें त्याकडे साशंक पाहिलें. पण त्याची चर्या तिला कांहीं निराळीच दिसली. ती थोडी भ्याली व समोरच्या आपल्या खोलींत जाऊन तिनें दार ओढून घेतलें.

" झोपेंत भ्यालांत वाटतं मास्तर ! " राधाबाई म्हणाल्या.

" काय झालं कुणास ठाऊक ! " असें म्हणून प्रभाकर पुन्हां अंथरुणावर निजला. राधाबाई मधुकर दार हळूच लोटून खालीं गेलीं. जातांना त्यांनीं

किशोरीच्या खोलींत सहज वाकून पाहिलें. पदर मोकळा सोडून ती आराम खुर्चीवर दुसरीकडे पहात स्वस्थ पडली होती.

प्रभाकरास पुन्हां झोप लागली. ‘ ईश्वर कर्ता भर्ता द्रष्टा आहे ’ हे शब्द त्यानें पुन्हां ऐकले. पुन्हां त्यास स्वप्न पडूं लागलें. स्वप्नांत, गजानन महाराज सिंहासनावर बसले आहेत, शारदा वामांकीं बसली असून ऋद्धिसिद्धि चौऱ्या ढाळींत आहेत असा देखावा त्यानें पाहिला. स्वतः आपण कोठें आहों हें त्यास कळेना. “ देवा ! ” अंतरिक्षांत त्याचाच शब्द त्यास ऐकू आला, “ मी आपणांस हांक मारतों आहें ! मी आपला भक्त ना ? मग या संकटांत---” ऋद्धिसिद्धि हंसल्या, शारदा हसली, विनायकही हसूं लागले. “ देवा हें संकट कसे तरूं ? ” पुन्हां सर्व देवता हंसल्या. प्रभाकर दचकून उठला. “ काय माझ्या दुःखांत देव मला हसले ! ”

प्रभाकराचा स्वप्नावर मोठासा विश्वास होता असें नाहीं. पण अशक्त शरीरांत कोणत्याही रोगानें सहज बिऱ्हाड करावें, तसे अनिश्चयाच्या हेलकाव्यांत जेरीस येऊन निमित्तास टेकलेल्या त्याच्या मनास अगदीं साध्या गोष्टीने धक्का बसूं लागला होता. “ देवास माझ्या दुःखाचें हसूं आलें ! आधींच चिरडीस आलेल्या त्याच्या मनास हा उपमर्द वाटला. परमेश्वर खराच न्यायी आहे कां ? ही शंका त्यास तुरुंगांत एकदां ओझरती आली होती तीच आतां बळावली.

“ काय ! माझ्या पुण्यशील बाबांवर दादांवर दुःखाचे डोंगर कोसळावें, हा न्याय आहे काय ? पूर्वजन्मांतील पापांचं हें प्रायश्चित असेल. पण जो अपराध केलेला स्मरत नाहीं त्याबद्दल शिक्षा देऊन काय उपयोग ? शिक्षा देऊन अपराध्यास सुधारणं हे नीतीचं तत्त्व असं वृंदावन म्हणाले ना ? मग--मग--काय देव न्यायी नाहीं ? अन्यायी आहे ! ” त्याचे समोरच श्री गजाननाची मूर्ति होती तिकडे त्याची नजर गेली. त्याचा भक्तिभाव पुन्हां जागृत झाला. आपण मनांत आणतों हा विचार ठीक नाहीं असें त्यास वाटलें असावें. त्याची चर्या रागीट व त्रासिक होती ती पुन्हां गंभीर झाली. तो उठून गजाननापुढे गेला, व त्यानें त्यास साष्टांग वंदन केलें. जमिनीस मस्तक टेकतांच जखमेस धक्का लागला. आपणांस जखम झाली आहे हे त्यास

आठवलें. किशोरीस आपण दूर हो म्हटलें तेव्हां तिनें आपणाकडे पाहिलें, आपण तिचा तिरस्कार करतों असें तिला वाटावें असें आपण तिच्याशीं वागलों हेही त्याच्या लक्षांत आलें व किशोरीस पाहण्याकरितां समोरच्या खोलीकडे तो वळला.

इकडे, खुर्चीवर स्वस्थ पडूनही मनास बरें वाटेना म्हणून खुर्चीवरून उठून किशोरी इकडे तिकडे फेऱ्या घालूं लागली. मधून मधून ती पंख्यानें वारा घेई, पुस्तकांच्या शेल्फकडे वळे. व्यवस्थित लावून ठेवलेल्या पुस्तकांतून एखादें पुस्तक काढून घेई, पुन्हां तें परत पण अव्यवस्थित टाकी. एका अर्ध्या घटकेंत पंचवीस एक पुस्तकें तिनें शेल्फांतून काढून इतस्ततः टाकून दिलीं. मध्येंच ती आरशाजवळ गेली. त्यांतील आपलें प्रतिबिंब पाहून तिला राग आला असावा असें तिच्या चेहऱ्यावर दिसलें. ती रूपानें अगदीं सुरेखांतली नसली तरी एकंदरींत नाकाडोळयांनीं नीटस होती. बांधा जात्या सुंदरांतलाच होता. सुशील, सुस्वभाव व सुशिक्षण यांनीं येणाऱ्या देखणेपणानं तिच्या सौंदर्यांत भर पडली होती. पुणेरी पद्धतीचें ठाकठीकीचें नेसणें, बोलणें व हावभाव या सर्वांमुळें एकंदरींत ती मोठी मनोहर दिसे. प्रेक्षणीयत्वाच्या बलावर रूपवंतास चार मंडळींत जो मान मिळतो तो आपणासही सहज मिळूं शकेल अशा आत्मविश्वासानें ती चार मंडळींत जाई, बसे, वागे व धिटाईनें बोले. पण आज तिचा आत्मविश्वास डळमळला होता. तिला आपल्या रूपाबद्दल आज तिरस्कार वाटला. मास्तरांनीं 'दूर हो' म्हटलें म्हणून तिला त्यांचा राग आला नाहीं; पण 'प्रिय जनांस न संतोषवील तर तें सौंदर्य कसलं?' असेंच कांहींसें तिला वाटलें. 'मी त्यांना आवडत नाहीं का?' असें ती आरशांत पाहून मोठ्यानें स्वतांशीं म्हणाली आणि डोकींत आकड्यांत घातलेलें फूल काढून तिनें आकड्यामुद्दां तिरस्कारानें दूर फेंकून दिलें. इतक्यांत आरशांतील प्रतिबिंबांत मागील अर्ध्या उघड्या खिडकीच्या बाहेर कोणी उभें आहे असें तिला दिसलें. तिनें मागें वळून पाहिलें. प्रभाकर परत फिरून आपल्या दाराशीं गेलेला तिला दिसला. पुन्हां तो वळला. तितक्यांत ती थोडी दाराआड होऊन पाहूं लागली. तो थोडा पुढें येई व पुन्हां परते. एकदां अगदीं दाराशीं आला. दारही त्यानें थोडें उघडलें.

" कि—अहं "

तो पुन्हां परतला. किशोरी आडून पहात होती. त्याचे नेत्र उघडे असूनही बाहेरच्या सृष्टींत त्याचें लक्ष नव्हतेंसें दिसलें. तो कांहीं अस्पष्ट पुटपुटूं लागला. दाराशीं उभा राहून हावभाव करूं लागला. त्याचा शब्द आतां स्पष्ट झाला. हात उभारून कपाळास आठ्या घालून तो बोलत होता.

" मला तिच्याबद्दल आदर वाटतो कीं प्रेम वाटतं ? छे ! छे ! आऽऽदऽर प्रे—छे ! नकोच तें ! "

आतां मात्र तो एकदम परतला व आपल्या खोलींत नीट गेला. किशोरी ओशाळली; पण प्रभाकरानें त्याच्या खोलींत शिरून दार लावून घेतलेलें पाहून आतां मास्तर काय करतात तें पहाण्याकरितां ती चोरपावलांनीं बाहेर येऊन त्याच्या खिडकीच्या फटींत पहात उभी राहिली. तिला नीट कांहीं दिसेना.

" सुखाच्या चिखलांत मी रुतत चाललों का ? दादा ! दादा ! " त्यानें धाडकन् खाटेवर अंग टाकलें. किशोरी तो आवाज ऐकून एकदम आली. त्यानें तिच्याकडे पाहिलें. पण आतां तो रागावला नव्हता. दुःखी दिसत होता. दृष्टींत प्रेमळपणाही होता.

" कसं वाटतं, मास्तर ?" किशोरीनें हलकेच खाटेजवळ जाऊन बोलण्याचें धैर्य केलें. त्याचें आधींच गोरेंगोमटें तोंड लाल होऊं लागलें होतें. किशोरीनें बाजूस पडलेल्या हातास स्पर्श करून पाहिलें तों ताप बळकट भरला होता. त्याला ग्लानी येऊं लागली.

" मास्तर, पांघरूण घ्याना ! ताप भरलाय केवढा तरी ! " असें म्हणून तिनें पायाजवळ पडलेला रंग त्याच्या अंगावर नीट घातला. त्यानेंही अडथळा न करतां नीट पांघरूण घेतलें.

रात्रीं डॉक्टर घरीं आले तेव्हां ताप फारच वाढला होता, असें त्यांस आढळलें. जखमेचीही हकिकत त्यांस कळली. तपासून पाहिल्यावर ' भिण्यासारखं कांहीं नाहीं. डोकं हलकं झालं आहे. कोणी तरी जवळ असा. २।३ दिवस त्यांना अगदीं विश्रांति मिळाली म्हणजे भागेल. वृंदावनांना कळवण्याचं कांहीं कारण नाहीं. ' वगैरे सांगून डॉक्टरांनीं औषधाचें टिपण किशोरीजवळ दिलें.

रात्रभर किशोरी, मधुकर व एक गडी प्रभाकराच्या शुश्रुषेकरितां त्याच्या खोलींतच दिवा ठेवून पाळीपाळीनें जागत राहिलीं. सकाळीं ताप थोडा उरला; पण दुपारीं पुन्हां वाढला. भ्रम व्हावा तसा प्रभाकर बरळूं लागला.

" सगळा गुन्हा ईश्वराचाच ! सौजन्यानं वागणं ही सुनीति ! पण सज्जनांना या जगांत दुःख—ईश्वर जर सर्वकर्ता, सर्वधर्ता तर त्यानं दुःखच जगांत ठेवायला नको होतं.—दुःखाशिवाय सुखाची गोडी नाहीं हें खोटं आहे.—खडीसाखरेचा खडा तोंडांत घातला तर होणारं सुख दुःखनिरपेक्ष असतं असं टिळक म्हणतात तें अनुभवसिद्ध आहे. " असाच पुनः पुनः कांहीं बोले. त्याचें सर्व भाषण सुसंगत असल्यामुळें ' हा भ्रम नव्हे, विचारांची कांहीं अनिवार खळबळ याच्या मनांत चालली आहे ' असे डॉक्टरनीं सांगितलें. वृंदावनांना बोलवावें असाही विचार एकदां त्यांच्या मनांत आला; पण आणखी एक दिवस वाट पहावी असें त्यांनीं ठरविलें.

रात्रीं प्रभाकरास प्रथम चांगली झोंप लागली. आदल्या रात्रीप्रमाणें मधुकर, किशोरी आणि एक गडी सोबतीस निजलीं होतीं. दिवा जळत होता. मध्यरात्रीस प्रभाकर एकदम दचकून ' किशोरी, किशोरी ' म्हणून ओरडत उठला. किशोरी झटकन उठून थोडी जवळ गेली. प्रभाकराचा ताप बराच वाढला होता. म्हणून गडी खालीं डॉक्टरना बोलावण्यास गेला. प्रभाकर पुन्हां अंथरुणावर पडला. मधूला झोंप लागली होती. गडी गेला हें नीट पाहून प्रभाकरानें पुन्हां एकदां इकडे तिकडे पाहिलें व किशोरीकडे वळून म्हणाला, "किशोरी, रागवूं नको. माझी कांहीं शुश्रूषा नको करूं आतां ! माझ्या प्रकृतीवरून मी आतां फार दिवस जगेन असं मला वाटत नाहीं. " किशोरीनें पदर डोळ्यास लावला. ती रडते आहे असें पाहून प्रभाकरासही वाईट वाटलें. तो कांहीं बोलणार इतक्यांत डॉक्टर वर आले. त्यांनीं प्रकृति तपासली.

" भिण्यासारखं कांहींच नाहीं. मनःक्षोभ कसला आहे याची आतां मात्र वृंदावनांकडून चौकशी व्हायला हवी" असें डॉक्टर म्हणाले. त्यांनीं ताबडतोब त्यास झोंपेचें चांगलें औषध दिलें व गड्यास सावधपणें निजण्यास सांगून ते खालीं गेले. प्रभाकरास त्या औषधानें चांगली झोंप लागत आहे असें पाहून किशोरीही आपल्या अंथरुणावर जाऊन पडली. तिला नंतर रात्रभर

झोंप मुळींच आली नाहीं आणि सारा वेळ आंतल्या आंत रडून तिनें सारी उशी अश्रूंनीं भिजवून काढली. सकाळीं प्रभाकराचा ताप उतरूं लागला होता. तो उठला तेव्हां किशोरी तोंड धुऊन वर आली होती. प्रभाकरानें तिजकडे पाहिलें. तिचें मुख म्लान झालेलें दिसलें. कोणीच कांहीं बोललें नाहीं.

एकदोन दिवसांत प्रभाकराचा ताप नाहींसा झाला. जखमही बरी होऊं लागली. तरीपण तो उल्हसित दिसेना. किशोरीशीं तर त्यानें बोलणेंच सोडून दिलें. यामुळेंच कदाचित् किशोरीही नेहमींच खिन्न राहूं लागली. अभ्यासाकडे तिचें लक्ष लागेना. ती खोलींत असतां खिडक्या घट्ट लावून घेऊन बसूं लागली. प्रभाकराकडे चहा वगैरे देण्यापुरतीच येई. त्याची बोलण्याची इच्छा नाहीं असें तिला अगदीं उघड दिसे. मग आपणही प्रयत्न न करितां ती परत जाई व आपल्या खुर्चीवर पडून राही. स्वरूपाचा तर तिला राग आलाच होता. आरशांत आपणाकडे पाहून ती रागीट मुद्रा करी. रूपाची जोपासनाही तिनें अगदीं बंद केली. थोडेफार जेवावें, शाळेंत जाऊन यावें व आपल्या खोलींत अहोरात्र पडून असावें असा तिचा क्रम चालला होता. बिचाऱ्या मधूला ही तिची वृत्ति आवडणारी नव्हती. तो नेहमी तिचा एकांत मोडी. तिच्या अंगाशीं झोंबे, त्रास देई. तरी त्याकडेही तिनें अलिकडे लक्ष देण्याचें सोडलें होतें.

प्रभाकराची अवस्थाही कांहींशी अशीच झाली होती. वृंदावनांकडे जाण्याचें आतां त्यानें बंदच केलें होतें. मधूच्या शिक्षणाची काळजी त्यानें सोडली, त्याचा नेहमींचा नियमितपणा सुटला. गजाननाची पूजाअर्चा अगदीं बंद पडली. अभ्यासही बंद झाला. मनांत विचाराची मात्र फार मोठी खळबळ चालू असावी असें त्याच्या हावभावावरून, वागणुकीवरून, चर्येवरून, एकांतांत आपल्याशीं जोराजोरानें पुटपुटण्यावरून, कोणासही सहज कळलें असतें.

## : १७ :

पुण्यास वसंत-व्याख्यान-माला ही मे महिनाभर गाजत असणारा एक उच्च दर्जाचा महोत्सव असतो. गणपति-उत्सव पुष्कळ खळबळीचा खराच; पण तो मुख्यतः धार्मिक असून त्यांत सर्वसामान्य समाजांत हुरूप उत्पन्न व्हावा असे विविध कार्यक्रम असतात. गणेशोत्सव सार्वजनिक वक्ते व सार्वजनिक कवि यांच्या तावडींत सांपडल्यामुळे, राजकीय, सामाजिक मतभेद, पक्षद्वेष, परस्परांच्या कुचाळक्या, यांनींच तत्कालीन वातावरण दरवळून जातें व उच्चाभिरुचीस त्यांत करमणूक होणें शक्य नसतें. शिवाय तत्कालीन क्षणिक लोकमताच्या विरुद्धांस–ते विचारवंत व थोर असले तरी–या उत्सवांत फारसा वाव मिळत नाहीं. पण वसंत-व्याख्यान-माला ही सुशिक्षितांची सुशिक्षित करमणूक असते. सर्व काळ विद्याव्यासंगांत दंग असणारीं एकांतप्रिय माणसें परिश्रमसंचित ज्ञानाचा रसास्वाद बहुजनांस देण्याकरितां विद्यामंदिरांतून 'या वेळीं बाहेर पडत असतात. या व्यासंगशीलांत पुण्याबाहेरचे महाराष्ट्रीय व परप्रांतीय, क्वचित् परदेशीयही असतात. कांहीं वक्ते एकदीड तासांत सांगतात. त्या विषयांत त्यांनीं आपल्या आयुष्यांतील बहुतेक काल वेंचिलेला असतो. बहुतेक वक्त्यांनीं आपले विषय पुष्कळ काळ अभ्यासिलेले असतात. निदान तशी अपेक्षा असते. वक्ते सर्व पक्षांतील व मतांचे असतात व प्रतिपादनाचा भर विषयांच्या तात्त्विक बाजूवर असतो. पुण्यांतील नेहमींच्या श्रद्धाळू श्रोत्यांहून या वासंतिक महोत्सवाचे श्रोतेही वेगळे असतात. शाळा-कॉलेजांतील अध्यापक, जिज्ञासु विद्यार्थी व विद्वत्तेतर

व्यवसायांत पडूनही विद्याभिलाष बाळगणारे लोक पुष्कळ अभ्यासानें येणारें ज्ञान थोडक्यांत समजून घेण्यास येत असतात. विशिष्ट विषयांतच खोल शिरणारे अभ्यासक इतर विविध विषयांची थोडथोडी आयती रुचि मिळविण्याकरितां या सभांस येत असतात. तसेंच नेहमींच्या सभांच्या धकाधकीला अपात्र असे वृद्ध पेन्शनर उन्हाळयांत संध्याकाळच्या वेळीं शिवाजी मंदिरांतली मोकळी गार हवा खाण्याकरितां हक्काच्या खुर्च्यांवर येऊन बसतात. "आम्ही सार्वजनिक कार्यांत पडत नसतों" असा आढ्यतेनें टेंभा पाजळणारे वडिलार्जित इस्टेटीवरील फुकट-चर गृहस्थही, बासनांतल्या चौघड्या अंगावर उलगडून येतात. श्रोत्यावक्त्यांप्रमाणें इतरही हौशी श्रोते व वक्ते शिवाजीमंदिरांत या वेळीं जमत असतात. मालेच्या व्याख्यानाशीं यांना कांहीं कर्तव्य नसतें. मालेच्या रंगणाबाहेर सर्वत्र अशा श्रोत्यावक्त्यांचे लहान लहान थवे जमून आपापल्यापरी मालेंतील व्याख्यानाशीं स्पर्धा करीत असतात. प्रत्येक थव्याचा विषय वेगळा असेलच; पण एका थव्यांत व एकाच समयीं अनेक विषय चालू असूं शकतात. वक्तेही एकदम अनेक असतात. या थव्यांतून कोठें मालेंतील चालू वक्त्याच्या चांगल्या अभिनयाची वाईट नक्कल सगद्गद हास्यपूर्वक चाललेली असते. तर कोठें व्याख्यानास येणाऱ्या स्त्री-समुदायाची नांवनिशीवार टवाळी चालते; वक्ते अनेक व एकदम बोलणारे असल्यामुळें बरीच गजबज होते व रंगणाभोंवतालच्या मालेच्या श्रोत्यांचें अवधान पुष्कळदां संकटांत येतें. प्रतिष्ठित श्रोत्यांनीं भरलेलें प्रशस्त वर्तुळाकृति सभास्थान व त्याच्या भोंवतीं पटांगणांत बसलेले अथवा उभे असलेले अध्यामध्या प्रतिष्ठितांचे लहानमोठे थवे यांनीं शिवाजीमंदिरास या वेळीं चांगली शोभा आलेली असते.

अशा या वसंत-व्याख्यान-मालेंत आज श्रीक्षेत्र काशी येथील कोणा विद्वान् पंडिताचें 'मायेचें कोडें' या विषयावर व्याख्यान होतें. वृंदावन गोखले अध्यक्षपदीं विराजमान झाल्यावर व्याख्यात्यांनीं व्याख्यानास सुरवात केली. 'शून्यांतून ही सर्व सृष्टि उत्पन्न झाली हें केवढें कूट आहे, या सृष्टिकर्त्याचें घटनापटुत्व केवढें थोर आश्चर्योत्पादक आहे' याचें वर्णन करून 'कर्मयोग आम्हांस मान्य आहे तरी 'नासतो विद्यते भवो नाभावो विद्यते सतः' हें खरें असेल

तर कामक्रोधादि सत्–षड्रिपूंचा निरास कर्मयोगांत कसा होणार ? ' असली कायशी शंका वक्त्यांनीं मांडली. त्यांचें भाषण विद्वत्तापूर्ण पण दुर्बोध झालें. नंतर अध्यक्षांनीं व्याख्यात्यांची प्रशंसा करून कोणी उपवक्ता असल्यास त्यास पाचारण केलें. बराच वेळ कोणी पुढें येईना. तेव्हां अध्यक्ष समारोपास उठले. इतक्यांत गर्दीच्या मागून 'मला बोलायचं आहे ! ' अशी मोठी आरोळी आली व पाठोपाठ गर्दी दुभंगून रंगणांतील खुर्च्यांतून भराभर वाट काढीत एका तरुणानें घाईघाईनें पुढें येऊन व्यासपीठावर ताडकन् उडी मारली व क्षणभरही न थांबतां अथवा अध्यक्ष, श्रोते यांचें औपचारिक आवाहनही न करतां अधीरपणें व अतिश्रम झाल्याप्रमाणें उसासे टाकीत तो तरुण भराभर बोलूं लागला. त्याची ती धांदल, तो आवेश, तो आविर्भाव पाहून श्रोतृसमुदाय स्तिमितच झाला. तो तरुण म्हणाला,

" मायेचं खरं कोडं काय आहे तें मी सांगतों. सृष्टीच्या निर्मात्यास या जगांत दुःखाची गरजच कां भासली ? हा माझा पहिला प्रश्न आहे. दुःखावांचून या जगाचं कांहीं अडलं असतं असं नाहीं. सुखभोगक्षमता दुःखसापेक्ष आहे हें खरं नाहीं. सुखाकरितां दुःखाची कांहींच गरज नाहीं. पण समजा असली, तरी सुखाची दुःखसापेक्षता तरी मग कोणीं केली ? सृष्टीच्या कर्त्यानंच ना ? असं तरी त्यानं कां केलं ? कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं समर्थ अशा ईश्वरास दुःखावांचून सुखाची उत्पत्ति करतां आली नाहीं असं म्हणणं हा ' वदतो व्याघात ' आहे. प्राणिमात्रांत दिसून येणारे असद्भावही त्यानंच–ईश्वरानंच–निर्मिले. एरवीं सर्व सृष्टि जर त्याचीच व तदितर कांहींच नाहीं, तर असद्भाव आला कोठून ? एखाद्या राजानं आपल्या प्रजेवर लांडग्यांचं सैन्य चरायला सोडलं तर आपण त्यास सज्जन म्हणूं काय ! हरप्रयत्नांनीं त्यास पकडून आपण शासन केल्याशिवाय कधींही राहणार नाहीं. ईश्वराच्या या सृष्टींत राईएवढं सुख तर पर्वतप्राय दुःख डोक्यावर कोसळत आहे. ईश्वर आपल्या हातीं सांपडत नाहीं, त्यास शासन करण्याची शक्यताच नाहीं. पण निदान तो करतो तें दुष्कर्म करतो असा मनमोकळा अभिप्राय निस्पृहपणें आपण कां देऊं नये ? शंकराचार्य म्हणतात, सृष्टि ईश्वराची लीला आहे. फुलपांखराच्या पायांस दोरी बांधून लहान मुलं त्यास हिसके देतात, खेळतात,

तेव्हां त्यांस आपण क्रूर म्हणतों. मग पापड परतावा तसं सर्व जगास निखाऱ्यावर परतून पोपडे काढणारा परमेश्वर मात्र दयाळू कसा? साधुसंत सुखदुःख खोटं म्हणतात. त्यांच्या मनास इतकी श्रेष्ठावस्था प्राप्त झाली असेल कदाचित्! पण तें आम्हांला काय होय? दुष्काळानं पोटांत अग्नि भडकून पंचप्राणांची लाही उडत असतां खुशालचेंडू राजपुरुषांनीं तूपसाखर खाण्याचा उपदेश करून भुकेल्यांची निर्भत्सना करावी तसाच साधुसंतांचा इतरे जनांस उपदेश निर्दयतेचा व उपहासाचा असतो. साधुसंत असतील सुखाच्या गिरिशिखरीं निवास करणारे! पण जगाच्या आरंभापासून कोट्यावधि साधुसंत या भूतलावर आले, खाल्लेजेवले व गेले. तरी जगाचं दुःख रतिमात्र कमी झालं आहे काय? मग साधुसंतांचं कौतुक कसलं करतां? या संतांपैकीं बहुतेक पूर्वावस्थेंत आम्हांप्रमाणं दुःखानं तळमळून तळमळून मगच सुखैक पदवीस पोचलेले होते. पण मग मात्र ईश्वराच्या खास वशिल्यास पोंचल्यामुळं पूर्वावस्थेंतील आपल्या बंधूंचीं दुःखं विसरून ईश्वराला फितुर होऊन ईश्वरपीडित दुःखी जनांना मूर्ख, अज्ञ, वगैरे शेलक्या शिव्यांनीं संबोधतात. अशा फितुरांना न ओळखून आपण त्यांच्या भजनीं लागतों. माझा आपणांस यापुढें प्रश्न असा कीं, ईश्वराच्या या सृष्टींतील व्यवस्थेवरून दुःख अनिवार आहे असं दिसतं. निदान आजवर दुःख खेळून ईश्वरानं करमणूक करून घेतली, हें उघड दिसतं. तर त्याची ही सृष्टि चालावी याकरितां कर्मयोगाचं आचरण करावं म्हणजे ईश्वराची जुलुमशाही चालण्यास मदत करावी असाच अर्थ नव्हे काय? त्यापेक्षां या दुःखलीलामय सृष्टीचा शेवट करण्याचा एखादा मार्गच अधिक श्रेयस्कर कां नव्हे? खरोखर सृष्टीच्या बुडाशीं तिच्या कर्त्याचा सद्धेतु आहे हें सिद्ध झाल्याशिवाय कर्मयोगाची भाषा बोलणं आत्मघातकी होईल. हा हेतु काय आहे हेंच खरं मायेचं—या सृष्टीचं कोडं आहे."

भाषण करणारा हा तरुण प्रभाकर होता. बोलत असतां त्याचा आवाज एवढा मोठा व आवेशयुक्त झाला कीं, शिवाजीमंदिराच्या पटांगणांत चहूंकडे पसरलेले सर्व लहानमोठे समुदाय त्याच्या व्याख्यानास लोटले. लोक अगदीं आश्चर्यचकित होऊन त्याचें व्याख्यान ऐकत होते. वृंदावनांनीं शेवटीं समारोप केला. ते म्हणाले:—

" तत्त्वज्ञानासंबंधीं तीव्र तळमळीची जिज्ञासा झाली म्हणजे मनुष्य मुक्ति-सोपान चढूं लागला असं समजावं. उपवक्त्या तरुणानं काढलेल्या शंका निव्वळ तात्त्विक चर्चेनं सुटण्यासारख्या नाहींत. ज्याचा त्यानं शांतपणें विचार करून हे प्रश्न आपापल्या पुरते सोडवून घ्यावे एवढाच एक मार्ग येथें दिसतो. तेव्हांही सर्व प्रश्न सुटतीलच असं नाहीं.

' असें कां असें कां असें शोधण्यांत
विरे दुःख सुस्वस्थता ये मनांत ॥

एवढं निदान शक्य असावं असं वाटतं. या करितां तत्त्वज्ञानाच्या मुळाशी हात घालण्याचा प्रयत्न करूं पाहणाऱ्या या तरुणाचें मी मनःपूर्वक अभिनंदन करतों. "

# : १८ :

अमूर्तपणें मनास अस्वस्थ करणारे विचार आतां मूर्त व व्यक्त झाल्यामुळे प्रभाकरास अधिकच जाचूं लागले. त्याची स्वस्थता पुरी भंगली. तो एकांतांत असतां कांहींसा भीषण व क्रूर दिसूं लागला. इतरांपुढे मात्र तो आतांशा आनंदी दिसे. त्याला सुखाचा वैताग आला होता तरी डॉक्टर, राधाबाई, मधु, किशोरी, या सर्वांच्या प्रेमळपणाबद्दल त्यास कृतज्ञता वाटे. आपल्या मानसिक खिन्नतेनें मधु व किशोरी यांना वाईट वाटतें हें पाहून प्रभाकरासही वाईट वाटलें व आपल्या दुःखानें त्यास दुखवूं नये म्हणून तो त्यांच्याशीं व इतरांशीं बाह्यतः आनंदानें व प्रेमाने वागण्याचा यत्न करूं लागला. किशोरीच्या मनावर याचा फार चांगला परिणाम होऊन तिची खिन्नता मावळली व ती पूर्वींहून अधिक प्रफुल्लित दिसूं लागली. चहाफराळावेळीं मधुकर-किशोरी माडीवर मास्तरांबरोबर फराळ करण्याकरितां येऊं लागली. त्या वेळीं त्यांचें मोकळेपणें संभाषण, चर्चा, थट्टाविनोदही चाले. एकांतवासांतली सचिंतता या वेळीं प्रभाकर दिसूं देत नसे.

एक दिवस मधु घरीं नव्हता. किशोरी आपला व प्रभाकरचा चहा घेऊन वर गेली. किशोरी चहा घेत खिडकीशीं बाहेर पहात उभी राहिली. प्रभाकर टेबलाशीं टेकून चहा घेत होता. या वेळीं बाहेर वृक्षावर किशोरीच्या दृष्टीस एक दृश्य पडलें, तें ती पहात होती. दोन सुंदर सजातीय पक्षी एका फांदीवर समोरासमोर बसले असून एक दुसऱ्याच्या चोचींत आपली चोच घालीत होता व दुसरा परत पहिल्याच्या चोचींत आपली चोच घाली. मध्येंच आनंद-

त्याप्रमाणें प्रत्येकजण पंख फडफडावी. तितक्यांत त्यांतील एक दुसऱ्यानें पुढें केलेली चोच चुकवून भर्कन दुसऱ्या फांदीवर पळाला. तेव्हां पहिला पक्षी रागावल्यासारखे पंख आपटून तोंड फिरवून तिसऱ्याच फांदीवर दूर उडून जाऊन बसला. त्यावर पहिला पुन्हां दुसऱ्याकडे त्या तिसऱ्या फांदीवर आला. प्रथम थोडा दूर बसला व हळू हळू पावलें टाकीत व शब्द करीत दुसऱ्याकडे येऊं लागला. तो कांहीं पावलें चालल्यावर दुसरा एकदम उडी मारून पहिल्यासमीप आला व पुन्हां त्या उभयतांनीं पूर्ववत् आपली क्रीडा केली. त्या मनोहर बिहंगमांची ती रम्य चञ्चुलीला पाहून किशोरी आनंदली. आनंदाचा आस्वाद प्रियजनासमवेत घेण्यानें रसवत्तर होत असतो.

"मास्तर, ती पाहिलीत का पांखरं कशीं खेळताहेत तीं ?" किशोरीनें स्मितपूर्वक कप घेतलेल्या हातानें दाखवीत म्हटलें.

किशोरीचें लक्ष कोणीकडे आहे हें प्रभाकरानें आधींच पाहिलें होतें.

"ती पति-पत्नी असतील." थोडें हसून किशोरीकडे निरखून पहात प्रभाकर म्हणाला.

किशोरीच्या तें लक्षांत येऊन ती लाजली. तिचा कपोलप्रदेश आरक्त झाला. इतक्यांतच चहा पिऊन झालेली कपबशी प्रभाकरानें पुढें केली. ती घेतांना तिचा हात कांपूं लागला. कपबशी पडते कीं काय असेंच तिला वाटलें. प्रभाकराची दृष्टि एकसारखी तिच्यावर खिळली होती. तिला मात्र त्याच्या दृष्टीला दृष्टि देववेना. ती खालीं, मागें बाजूस पाही. हळूच प्रभाकराच्या तोंडाकडे पाही. तों त्याची दृष्टि आपणाकडेच आहे असें पाहून पुन्हां दृष्टि दुसरीकडे नेई. वास्तविक नेहमींप्रमाणें म्हणजे चहाचीं भांडीं घेऊन तिनं जायला हवें होतें. पण भांडीं तशीच हातांत घेऊन ती तेथेंच त्याच्यासमोर उभी राहिली. प्रभाकरालाही तिनें तेथून जावें असें वाटेना. प्रत्येकास कांहीं बोलायचें असावें अशा रीतीनें त्यांचे ओठ स्फुरण पावत; पण कांहीं उमटेना. किशोरी या वेळीं आनंदित व लज्जारक्त मुखानें अवर्णनीय सुंदर दिसत होती. तिची ती शोभा पाहून प्रभाकरास आनंद झाला. शेवटीं किशोरीनें धैर्य धरून स्तब्धतेचा भंग केला.

"आतां प्रकृति अगदीं चांगली आहेना ? त्या दिवशीं आजारीपणांत कसलं वाईट बोललां तुम्ही !"

प्रभाकरानें मनापासून स्मित केलें. त्याचीं पावलें किशोरीच्या दिशेनें थोडीं पुढें सरलीं. किशोरी भिंतीशींच उभी असल्यानें तिला मागें सरतां येत नव्हतें. बाजूस टांगलेल्या मोठ्या आरशांत दोघांचीं प्रतिबिंबें प्रभाकरास एकदम दिसलीं. तों—तो सर्कन मागें सरला, त्यानें तोंड फिरविलें, नेत्रांत अश्रु चमकूं लागले. तो घाबरल्यासारखा दिसला. तसाच घाईनें जाऊन कॉट-वरील अंथरुणावर त्यानें अंग टाकलें. किशोरी चकित झाली. हातांतलीं भांडीं खालीं ठेवून ती खाटेजवळ गेली. प्रभाकरानें डोळे मिटून तोंड पलिकडे केलें होतें. किशोरीनें कॉटवर एक हात टेकून त्याच्याकडे निरखून पाहिलें. प्रभा-करानें डोळे उघडून तिच्याकडे तोंड फिरविलें. ती कॉटवरील हात उचलूं लागली तेव्हां त्यानें तिचा हात आपल्या हातीं घेतला. तिनेंही त्यास अडथळा केला नाहीं. तो अगदींच खिन्न दिसत होता. पुन्हां किशोरीचा हात त्यानें सोडला व तोंड वळविलें. परत किशोरीकडे वळला व म्हणाला, " किशोरी, मला मनापासून तूं इथून जाऊं नयेस असं वाटतं; पण मी सांगतों कीं तूं या-पुढं एक क्षणभरही येथें राहूं नको, एकदम खालीं जा. "

किशोरीच्या डोळ्यांत अश्रु आले. तिनें आपला हात प्रभाकराच्या अंगावर ठेवण्याकरितां पुढें केला. पण प्रभाकरानें चटकन उठून कॉटच्या दुसऱ्या बाजूस उडी टाकिली. किशोरीच्या डोळयांतून एकाएकीं अश्रूंच्या धारा तिच्या कपोलप्रदेशावरून अंगावर घळाघळ ओघळूं लागल्या. तिचा चेहरा संतापानें लाल झाला. अश्रु पुसण्याचाही ती प्रयत्न करीना. ती एकदम उसळून म्हणाली—

" काय ? मी अगदींच आवडत नाहींना ? "

" छे—छे—किशोरी माझं तुझ्यावर खरोखर प्रेम आहे. पण—पण—पण थांब जरा—नको सध्यां खालीं जा. मी तुला सगळं सगळं सांगेन" असें बोलून बळेंच प्रेमादरपूर्वक तिच्याकडे पाहून तो हसला. किशोरीही शांत होऊन थोडें हंसल्यासारखें करून खालीं निघून गेली.

पुढें एकदोन दिवसांनीं किशोरीनें वामनरावांची एकांतीं गांठ घेऊन मास्तरशीं आपला विवाह व्हावा असा आपला मनोदय सुचविला. वामनरा-वांनीं तात्काळ प्रभाकरास एकीकडे बोलावून विचारलें. प्रथम त्यानें थोडें

आढेवेढे घेतले; पण शेवटीं ही गोष्ट त्यानें कबूल केली व "वृंदावनांना मात्र सध्यां कोणी कांहीं सांगूं नका. योग्य वेळीं मी सर्व सांगेन. मला दोन दिवस आधीं परगांवीं जाऊन यावें लागेल. मग पुढील उद्योगास लागूं." असें त्यानें सांगितलें व लगेच त्याच दिवशीं परगांवीं जाण्याकरितां त्यानें वामनरावांचा निरोप घेतला.

कित्येक दिवसांत न झालेला आनंद आज किशोरीला झालेला होता. सध्यां प्रभाकर परत येईतों घरांतसुद्धां कोणास कांहीं कळवायचें नाहीं असें तिनें बापाशीं ठरविलें होतें. त्यामुळें मनांतून वाटणारा उल्हास व्यक्त करण्याला तिला कोणाच्या थट्टामस्करीची मर्यादा येणारी नव्हती. भावी सुखमय आयुष्याच्या सुखमय मनोराज्यांत ती गुंग झाली. आतां आरशांतील प्रतिबिंब तिला आवडलें. ती नाना तऱ्हेचीं फुलें वेणींत घालूं लागली. दिवसांतून तीनतीनदां तिनें तऱ्हेतऱ्हेचे पोषाख केले. अंगावरचा पदर अस्ताव्यस्त टाकून ती आतां साऱ्या घरांतून लहान मुलाप्रमाणें सगळीकडे धांवे. बागेंतील वेलीवरील, झाडावरील झाडून सारीं फुलें काढून निरनिराळे देशी विदेशी अलंकार तिनें करून या दोन दिवसांत दिवसभर अंगावर घातले. मधुकरास फुलांच्या माळांनीं, गजऱ्यांनीं आणि ऐटदार कपड्यांनीं तिनें खूपच नटविलें. त्या तीन दिवसांत तिनें आपला व मधूचा इतका उत्सव केला कीं उरलेल्या सर्व जन्मांतला आनंद एकदांच भोगून तिला संपवायचा आहे कीं काय, असें कोणास वाटलें असतें.

चवथ्या दिवशीं सकाळीं प्रभाकर गांवाहून आला. गाडीची वेळ प्रभाकरानें आगाऊ सांगून ठेवल्यावरून साधारण माहीत असल्यानें मधु व किशोरी बागेच्या फाटकाशीं येऊन वाट पहात उभीं होतीं. एक टांगा बराच लांबून येतांना दिसला. अतिउत्कंठेमुळें हा मास्तरांचाच टांगा अशी मधुकरानें अटकळ बांधली. टांग्याइतकी दूर गेलेली त्यांची दृष्टि टांग्याबरोबर जवळ येत चालली. टांगा जवळ जवळ आला तों प्रभाकरही दिसला. मधूनें आरोळी दिली. टांगा फाटकाशीं येतांच बॅग हातांत घेऊन प्रभाकर खालीं उतरला. गडी बॅग घेण्याकरितां पुढें आला; पण " कशाला ? मी नेतों ती. " असें म्हणून त्यास बॅग न देतांच ती घेऊन तो माडीवर गेला.

त्याची चर्या आज प्रफुल्लित दिसत होती. पण सूक्ष्मपणें पाहणाऱ्यास हे सर्व वरकांती असेल अशी शंका आली असती. प्रभाकरानें प्रातर्विधि, स्नान वगैरे उरकलें. डॉक्टरांची गांठ घेतली व 'उद्यां वृंदावनाकडे जाऊन त्यास कळवून येतों.' असें त्यानें त्यांस सांगितलें. किशोरी आज त्याच्या खोलींत गेली नाहीं. त्याला चहाही तिनें आणून दिला नाहीं. पण आपल्या खोलीच्या खिडकीचें दार अर्धें उघडून समोरच्या खोलीच्या खिडकीच्या मागें ती डोळ्यांनीं एकसारखा त्यास शोधीत होती. तो आपल्या खोलींत शतपावल्या घाली, तेव्हां मध्येंच तो दृष्टीस केव्हां पडतो या उत्कंठेनें तिला डोळ्यांची उघडझांप करणेंसुद्धां अवघड वाटूं लागलें. दुपारचीं जेवणें झालीं. भोजनोत्तर प्रभाकर वर खोलींत आला. लगेच किशोरीही आपल्या खोलींत आली व खिडकींत तिनें प्रियदर्शनासन मांडलें. थोडी शतपावली झाल्यावर प्रभाकर खुर्चीवर बसून कांहीं लिहूं लागला. लिहि-तांना त्याची चर्या कांहीं चमत्कारिक झाली होती. पण त्याचें लिहिणें लवकर संपलें. नंतर कागदावर नीट वजनें ठेवून तो उठला व दाराकडे वळला. तेव्हां किशोरी खिडकींतून उठली व आराम खुर्चीवर जाऊन पडून राहिली. खुर्ची पाठमोरी होती. प्रभाकराचे पाय दाराबाहेर वाजले. त्यानें दार उघडलें व पुन्हां लावलें. आंत आपण नाहीं असें पाहून तो परतला असावा असें तिला वाटलें. ती हळूच उठली. दाराशीं जाते तों प्रभाकराच्या खोलीचें दार थोडें उघडें दिसलें. कांहीं काम अस-ल्यानें तो येऊन परत गेला असेल अशी शंका येऊन ती हलकेच त्याच्या खोलीशीं गेली; पण तो आंत नव्हता. आपणास पाहण्यास तो खालीं गेला असावा असें तिनें ताडलें. तो वर येण्याच्या सुमारास आपण त्याच्याच खोलींत असावें व तो वर आला म्हणजे धांदलून निसटून जावें, असला विचार तिला सुचला आणि ती तेथेंच थांबली. तिची नजर टेबलाजवळ गेली. तों नेहमी-पेक्षां बऱ्याच मोठ्या अक्षरांत कांहीं लिहिलेलें दिसलें म्हणून सहज जिज्ञा-सेनें पाहूं लागली. त्या लिहिलेल्या कागदावर अगदीं वरतीं तिचेंच नांव तिला दिसलें. झटदिशीं वजनाखालून ते दोन कागद उचलून तिनें वाचले. तिला त्यांत असें काय आढळलें ? एकाएकीं उद्वेग अनावर होऊन

ती खुर्चीवर टेकून घाबऱ्या घाबऱ्या रडूं लागली. तोंच दार वाजलें. पहाते तों 'तुला हुडकीत बाहेर गेलों तर तूं इथंच भेटून ऐन वेळीं माझा घात करणार काय?' असें ओरडत प्रभाकर खोलींत घुसला व त्यानें आंतून दाराला कडी लावली. तो कडी लावीत असतां ती जोरानें किंचाळून दाराकडे धांवली. पण त्यानें तितक्यांत दारास कुलूपही लावलें. तो मागें फिरला तेव्हां 'अहो, कुणी तरी या हो! मास्तर, नका हो, नका हो' अशा तिनें मोठ्यानें दोनतीनदां किंचाळ्या फोडल्या. नुकतींच जेवणें झालीं असल्यानें डॉक्टर घरींच होते. राधाबाई, गडीमाणसें वर धांवलीं. दार उघडूं पहातात पण दार बंद! खिडकी त्यांनीं उघडली. तों किशोरी व प्रभाकर एकमेकांचा रस्ता अडवून झोंबत आहेत असें त्यांस दिसलें. किशोरीनें लगट करून प्रभाकराच्या हातांतील किल्ल्या हिसकल्या. पण प्रभाकरानें त्या परत काढून घेऊन तिची दोन्ही मनगटें आपल्या एका हातानें पक्कीं धरलीं व दुसऱ्या हातानें तो किल्ली चालवून सकाळीं आणलेली बॅग उघडूं लागला. किशोरी दुसऱ्या हातांत धडपडत होता. एका हातानें बॅग लवकर उघडेना. बाहेरचे लोक स्तिमित होऊन खिडकीच्या गजांशीं व्यर्थ धक्काधक्की करीत ओरडत होते. किशोरीही आरडत होती. बाहेरच्या मंडळीस कांहींच उलगडा होईना. डॉक्टरांना कांहीं वाईट शंका आली; पण इतक्यांत किशोरीनें हात सोडवून घेऊन प्रभाकराच्या गळ्यास एकदम मिठी मारली. तेव्हां तर हें कोडें बाहेरच्या लोकांस अधिकच अवघड झालें. किशोरी गळ्याभोंवतींच असतां प्रभाकरानें दोन्ही हातांनीं बॅग उघडली व एक पिस्तुल बाहेर काढून दूर हातांत धरलें. मग तिच्यासह तो टेबलाजवळ आला. "अहो, नको, नको ना! बाबा पहा, पहा हो!" किशोरी मोठ्यानें किंचाळली. बाहेर लोक धडपड करीतच होते. प्रभाकरानें टेबलावर हलकेंच पिस्तुल ठेवलें. मग दोन्ही हातांनीं त्यानें किशोरीची मिठी सोडविली व तिला एका हातानें दाबून धरलें. मग त्यानें पुन्हां पिस्तुलाकरितां दुसरा हात पुढें केला; तोंच—

"आधीं मला मारा हो!"

असें म्हणून तिनें पुन्हां त्याचा हात सोडवून घेऊन त्याच्या गळ्यास पुन्हां मिठी मारली व दोनतीनदां तिनें त्याचें चुंबन घेतलें. "छे! हें ठीक

नव्हे, माझं दुर्दैव आणखी काय काय करणार आहे तरी ?" असें म्हणून त्यानें पुन्हां तिची मिठी सोडवली व आतां त्यानें तिला एकाच हातांत पण अधिक मजबूत पकडून दूर खेंचून धरलें. मग उजव्या हातानें त्यानें तें पिस्तुल पुन्हां उचललें. किशोरीनें आतां निसटण्याची शिकस्त केली. पण प्रभाकराची पक्कड या वेळीं कांहीं विलक्षण बळकट होती. मग प्रभाकरानें वर दृष्टि करून कपाळ चांगलें उताणें केलें व पिस्तुलाचें टोक आपल्या कपाळावर नीट चांगलें टेकलें. किशोरी आतां अगदींच अधीर होऊन ' देवा देवारे !' म्हणून मोठमोठ्यानें किंचाळूं लागली व सुटण्यासाठीं धडपडूं लागली. बाहेर ' हें काय ? हें काय मास्तर ?' असें ओरडत बाहेरचे लोक खिडकीच्या गजांशीं, दाराशीं झोंबत होते. एवढें सर्व होण्यास एकदोन मिनिटेंही लागलीं नव्हतीं. किशोरीच्या झोंबाझोंबीमुळें शरीर अस्थिर होऊन कपाळावर पिस्तुल स्थिर राहीना. पुन्हां एकदां त्यानें किशोरीस घट्ट धरलें. हिसकाहिसकीनें खिडकी हालूं लागलेली पाहून तो घाबरला. मग त्यानें टेबलाशीं किशोरीला खेटून धरून तिची धडपड थांबविली. आतां मात्र त्यानें कपाळावर तें पिस्तुल नीट टेकलें व तो बोलूं लागला—

" किशोरी, मला क्षमा कर. तुला फशीं पाडण्यापेक्षां तुझ्या वाटेंतून मी दूर होतों. खेरीस तुझं एकवार दर्शन घ्यावं असं वाटलं तों तो प्रसंग अखेर असा यायचा होता ! दुर्दैव माझं ! मी आतां जातों. या कपाळकरंट्यापेक्षां अधिक भाग्यशाली पति वरून सुखी हो ! मी मेल्यावरही मजवर प्रियबंधू-प्रमाणं प्रेम कर. आणि बंधु या नात्यानं, तुझ्या पतीशीं तुझा संसार सुखाचा होईल असा माझा तुला आशीर्वाद आहे ! मरतांनासुद्धां तुझ्याशीं अधिक बोलावं असं वाटतं. पण मी जातोंच आतां. दादा, वहिनीऽऽबाळ—"

धडाड्............

प्रभाकराचा देह धाडकन् जमिनीवर कोसळला. किशोरीस क्षणमात्र भोंवळ आली. बाहेरील माणसांची धडपड, आरडाओरड सुरूच होती. किशोरी साबध झाली. तिनें खालीं बसून एकवार प्रभाकराकडे पाहिलें. त्यास मांडीवर घेऊन आलिंगन दिलें. त्याचें कपाळ छिन्नभिन्न झालें होतें. तशाच त्या अवस्थेंत तिनें त्याचें अनेक वेळां भराभर चुंबन घेतलें. ती विकटपणें हसूं

लागली. बाहेरच्या लोकांस हा तिचा प्रकार पाहून भीति व उद्वेग अनावरच झाला. खिडकी चांगलीच हलूं लागलेली किशोरीला दिसली. दार मोडणार असें तिला दिसलें. 'बाबा, थांबा जरा' असें म्हणून तिनें तें प्रेत मांडीवरून खालीं ठेविलें. ही आतां दार उघडील असें वाटून बाहेरच्या लोकांनीं गडबड थांबविली. किशोरीनें उठून प्रभाकराची मघांची बॅग उघडली व कांहीं वस्तु पदराखालीं लपवून ती प्रभाकराच्या लांब पसरलेल्या प्रेताशीं येऊन बसली. पुन्हां तिनें त्या प्रेताचें चुंबन घेतलें. बाहेरच्या लोकांची धडपड पुन्हां सुरू झाली. शेवटीं दाराची एक फळी मोडली व गडी तींतून आंत येऊं लागला. तें पाहून पदराखालून खंजीर काढून 'अग आई, आलेच मी!' असें ओरडून तिनें तो खंजीर आपल्या वक्षःस्थलांत जोरानें भोसकून घेतला व तिचें शरीर प्रभाकराच्या शवावर कोसळलें. इतक्यांत लगट करून गडी आंत आला. इतर मंडळीही आली. तीं दोन्ही शरीरें रक्तानें भिजून चिंब झालीं होतीं. जमिनीवर रक्ताचें नुसतें तळें झालें होतें. एक दीड मिनिटांचा हा काल सर्वांना अतिशय दीर्घ व अतिशय भयंकर वाटला असल्यास कांहींच नवल नव्हतें. आंतील तो देखावा पाहून राधाबाईंना मूर्च्छा आली. डॉक्टरांनीं उभ्याउभ्याच त्यांस सांवरलें. येथें आणखी अनर्थ होणार तरी काय काय, अशी त्यांना भीति वाटली. वृंदावनांच्याकडे मोटारवाल्यास पाठविण्यास त्यांनीं गड्यास सांगितलें व मेलेल्यांचीं प्रेतें सोडून आधीं ते राधाबाईंस शुद्धीवर आणण्याचा यत्न करूं लागले. मध्येंच एकदां किशोरीकडे धांवले पण तेथें सर्व प्रकार आटोपलाच होता. मधु बिचारा गोंधळून जाऊन मोठमोठ्यानें रडत होता. शेवटीं राधाबाई कांहीं शुद्धीवर येत ना. एक गडी त्याच्या डोक्यावर पाणी मारूं लागला. डॉक्टरांनीं खालीं जाऊन कांहीं हुंगण्याबिंगण्याचीं औषधें आणलीं. पण राधाबाईंना बसलेला धक्का फार भयंकर होता. मूर्च्छा कांहीं उतरेना. वामनरावांसही शेवटीं रडूं येऊं लागलें. इतकें होत आहे, तों वृंदावन येऊन पोचले. मोटारवाल्याकडून त्यांना कांहीं हकीगत कळलीच होती. खोलींत शिरून तो देखावा पाहतांच त्याची कंबरच खचली. ते खुर्चीवर बसले. समोर टेबलावर मघांचे तें पत्र पडलें होतें. त्यांतील अक्षरांवर त्यांची नजर गेली. 'किशोरी' या शब्दानें

त्याची दृष्टि खेचून धरून तें सर्व पत्र त्यांना वाचायला लावलें. त्यांच्या डोळ्यांवर अंधेरी आली. आतां राधाबाई सावध होऊं लागल्या होत्या. तेव्हां डॉक्टर वृंदावनांकडे वळले व त्यांनींही तें पत्र हातीं घेतलें. वृंदावनांनीं पत्र डॉक्टरकडे दिलें 'अरे अरे! प्रभा! जगास प्रकाश देण्याचं सोडून लागलेल्या ग्रहणांत कायमचा खग्रास झालास! हाय! हाय! गोपाळकृष्णा, तुझी मर्जी!' असें मोठ्यानें उद्गारून आपलें तोंड उपरण्यानें झांकून घेतलें. त्या सुधीर पुरुषासही या वेळीं शोक अनावर झाला होता.

प्रभाकराचें तें पत्र खालील प्रमाणें होतें

## कि शो री—

माझा नाद सोड—तुझें माझ्यावर प्रेम आहे त्याहीपेक्षां माझें तुजवर अधिक प्रेम आहे. पण मी असें प्रेमांत गुंतून सुखी होणें मला आवडत नाहीं. माझ्या प्रियजनांचा घोर उपमर्द व भयंकर अंत होऊनही त्याबद्दल सूड न उगवतां मी सुखाच्या पाशांत सांपडलों याबद्दल मला विषाद वाटतो. खरोखर सुखांत गुरफटून मोहावें अशी माझी कधींही इच्छा नव्हती. पण सुखापुढें मी हतबल झालों. सुखपाशांत न सांपडण्याची मी शिकस्त केली. थोडें यशही मिळविलें; पण माझ्या खिन्नतेनें तुला दुःख होतें असें पाहून मला प्रेमामुळें तुझी दया आली व चेहऱ्यावर मी खोटा आनंद दाखवूं लागलों. पण त्यानेंच तुला उत्तेजन आलें. व वरकरणी आनंद दाखवीत असतां प्रेमानें व सुखलालसेनें मजवर पुन्हां छाप टाकली. छे! छे! या सुखाचा मी कायमचा शेवट करणार!

जगून तरी काय करायचें? दुःखानें बुजबुजलेल्या या जगांत मला कोठेंही चिरशांति लाभणारी नाहीं. ईश्वराचा अन्याय हवेच्या अणूरेणूंतही भरला आहे. दुःख, अन्यायच सटकन विसरून लोक सुखामागें लागतात. मला त्यांची कींव येते. अशा अंतरित सुखांत मी रमूं नये. सूडही मला घ्यावासा वाटत नाहीं. सृष्टींतील सर्व अन्यायांचा जबाबदार जर एकटा परमेश्वरच; तर सूड तरी कुणाचा घ्यायचा?

जगायचें तरी कशाकरितां? जगणारा प्रत्येक मनुष्य अखेर केव्हां तरी मरतोच. मग एकदम सर्वांनीं मरून ईश्वराच्या दुःखक्रीडेचा हा सर्व पट एकदम उधळून कां न द्यावा?

मला तरी आतां अधिक जिवंत राहवत नाहीं. दुःखाच्या तशाच सुखाच्याही वेदना मला असह्य होत आहेत. जगण्यांत कांहीं ध्येयही दिसत नाहीं. आज मनोनिग्रह करून जगेन तर उद्यां विवाह होणारच. मग पुन्हा ही मृत्यूची इच्छा कधीं तीव्र झाल्यास माझ्या हातून दुसऱ्यावर अन्याय होईल! म्हणून वेळींच मी मृत्यूच्या भेटीस जातों.

किशोरी, मधू, डॉक्टर, वृंदावन, सर्वजण मजवर प्रेम ठेवा. तुम्ही सर्वजण मजसाठीं झटलांत! पण मी तरी काय करूं? मी यापुढें जगेन तर——पण छे! जगण्याची कल्पनाही मला असह्य होत आहे. मला क्षमा करा. मी तुमची अखेरची रजा घेतों.

तुम्हां सर्वांचा प्रेमाकांक्षी,
**प्रभाकर.**